हे सपत्नीक नेष्टृदेवा, आमच्या यज्ञाची प्रशंसा कर आणि ऋतूसहवर्तमान सोमपान कर. उत्कृष्ट रत्नांचा निधि[1] तुझेचजवळ आहे. ३

हे अग्निदेवा, देवांस इकडे घेऊन ये, आणि तिन्ही ठिकाणच्या आसनांवर त्यांस विराजित[2] कर. त्यांस विविध अलंकार[3] दे, व ऋतूसहवर्तमान तूं सोमपान कर. ४

हे इंद्रा, ऋतूंनीं सोमपान केल्यानंतर ह्या सुंदर पात्रांतून[4] सोमरसाचें प्राशन कर. तुझेंच सख्य चिरकाळ[5] टिकणारें आहे. ५

हे विधिपरिपालक मित्रवरुण हो, तुह्मी दोघे ऋतूसहवर्तमान ह्या यज्ञाचा अंगीकार[6] करीत आहां. येथें सर्व सिद्धता उत्तम करून ठेविली आहे, व ह्यास विघ्न करण्यास[7] कोणीही समर्थ नाहीं. ६ ( २८ )

हा पहा **द्रविणोदा**. ह्याचेसाठीं ह्या यज्ञांत सोमरस काढण्याकरितां, वैभवांची इच्छा बाळगणारे हे ऋत्विर्ज हातांत ग्रावा घेऊन बसले आहेत. ह्या देवाचें पूजन प्रत्येक यज्ञांत करीत असतात. ७

ज्या वैभवांची महती फार दूरवर ऐकूं येते तीं हा **द्रविणोदा** आह्मांस देवो. सर्व देवसमुदायांजवळ आह्मी त्यांच्या प्राप्तीबद्दल प्रार्थना[9] करीत असतों. ८

---

१ रत्नधाः ।

२ सादय ।　　३ भूष ॥

४ राधसः ।　　५ अस्तृतम् ॥

६ आशाथे ।　　७ धूतव्रता

८ द्रविणसः ॥

९ वनामहे ॥

नेष्टा व ऋतु ह्यांच्यापासून पुढें चला; उठा, सोमरसाचा आणखी एक हवी तयार करा. कारण ह्या **द्रविणोदा**ला सोमरसाची इच्छा[१] झाली आहे. ९

हे **द्रविणोदा**, तू अनुक्रमानें चौथा देव आहेस, आणि आह्मी **ऋतूं**सहवर्तमान तुला हवि अर्पण[२] करीत आहों. तेव्हां आह्मांवर मनःपूर्वक प्रसाद कर. १०

हे देदीप्यमान[३] व पुण्यव्रत अश्विन हो, यज्ञ सिद्धीस नेणाऱ्या[४] या **ऋतूं**सहवर्तमान तुह्मी मधुर सोमरसाचें सेवन करा.

हे उदार देवा, खरा गृहस्वामी तूंच असल्या कारणानें **ऋतू**प्रमाणें तुझ्याकडेही यज्ञाचें अध्वर्युत्व[५] आलेलें आहे. माझ्या विनतीस मान देऊन हा यज्ञ[६] सर्व देवांना पोहोंचीव. १२ (२९)

## सूक्त १६.

ऋषि—मेधातिथि काण्व ॥ देवता--इंद्र ॥

हे इंद्रदेवा, तूं वृष्टि करणारा[७] आहेस व तुझेकरितां सोमरस तयार करून ठेवला आहे. ह्यासाठीं तुझे हरिद्वर्ण अश्व[८] सूर्याचे दर्शन करीत करीत[९] तुला घेऊन येवोत. १

---

१ पिपीषति ॥

२ ददिः ॥

३ दीद्यग्नी । ४ यज्ञवाहसा ॥

५ सन्त्य । ६ यज्ञन्नीः ।

७ वृषणम् । ८ हरयः । ९ सूरचक्षसः ॥

ह्या लाह्यांत इतकें तूप घातलें आहे कीं, त्या जशा कांहीं निथळत आहेत. त्यांचें सेवन करण्याकरितां सर्व सुखसामग्रीनीं सज्ज अशा रथांतून इंद्राचे हरिद्वर्ण अश्व त्यास घेऊन येत आहेत.

ह्या प्रातःकालाचे समयीं आह्मीं इंद्रास बोलावतों. यज्ञास आरंभ झाला आहे म्हणून आह्मी इंद्रास पाचारण करितों. सोमरसाचें पान करण्याकरितां आह्मी इंद्रास हाक मारितों. ३

इंद्राच्या अश्वाची आयाळ कशी दीर्घ आहे पहा ! इंद्रा, हे अश्व जोडून तूं आमच्या सोमरसाच्या प्राशनाकरितां ये. सोमरस पिळून ठेवूनच आह्मी तुला बोलावीत आहोंत. ४

तो तूं आमची प्रार्थना श्रवण करण्याकरितां इकडे आगमन कर. आह्मीं काढलेल्या सोमरसाचा स्वीकार करण्याकरितां इकडे ये. एखाद्या तृषाक्रांत हरणाप्रमाणें[5] उत्सुकतेनें हा सोमरस पी.

हे सोमरसाचे बिंदु दर्भावर पात्रें ठेऊन त्यांत ठेवले आहेत. हे इंद्रा, श्रमपरिहारार्थ[6] ह्यांचें प्राशन कर. ६

ह्या आमच्या स्तुतीनें तुला समाधान वाटो. ही फार सुंदर आहे. ही तुझ्या अंतःकरणांत जाऊन भिडो. आह्मीं तयार करून ठेविलेला सोमरसही तूं पी. ७

हा शत्रूंचा संहार करणारा इंद्र ज्या ज्या यज्ञांत ह्मणून सोमरस काढला असेल त्या त्या सर्व ठिकाणीं त्याचें प्राशन करण्याकरितां जातो. ह्यांत त्यास फार आनंद वाटतो. ८

हे सामर्थ्यवान् इंद्रा, आह्मांस धेनु, अश्व, इत्यादि वैभव प्राप्त व्हावें हीच आमची इच्छा आहे. तेवढी तूं परिपूर्ण कर. आह्मांला एकाग्रबुद्धीनें तुझें स्तवन करतां येवो. ९ ( ३१ )

---

१ धानाः । २ घृतस्नुवः ।
३ गौरः ।
४ सहसे ।
५ मदाय ।
६ स्वाभ्वः ।

## सूक्त १७.

ऋषि—मेधातिथि काण्व ॥ देवता—इंद्रावरुण ॥

जगतांवर साम्राज्य चालविणाऱ्या इंद्रवरुणांची मी करुणा भाकतो. त्यांस असें शरण गेलें ह्मणजे ते आपणांस सुख प्राप्त करून देतात. १

इंद्र–वरुण हो, माझ्यासारख्या भाविकांनीं हांक मारली ह्मणजे त्यांचे रक्षण करण्याकरितां तुह्मी नेहमींच उडी घेतां. अखिल प्राणिमात्रांचे पोषणकर्ते तुह्मीच आहां. २

इंद्र–वरुण हो, आमची तृप्ति होईपर्यंत आह्मांस संपत्ति द्या. तुह्मी दोघांही उदार देवांनीं आमच्या अगदीं सान्निध असावे अशी आमची इच्छा आहे. ३

सामर्थ्याचा लाभ करविणाऱ्या आपल्या कृपेचे आह्मी खरोखर विभागी होणार आणि उत्कृष्ट कार्यक्षमतेसही आह्मी पात्र होणार. ४

सहस्रावधि दानकर्मे करणाऱ्यांत इंद्रच श्रेष्ठ आहे, व जे अत्यंत स्तुत्य आहेत त्यांत वरुणाचाच मान पहिला आहे. ह्या दोघाचेंही सामर्थ्य प्रशंसनीय आहे. ५ ( ३२ )

आह्मी त्याच्या कृपेमुळे संपत्ति प्राप्त करून घेऊं, आणि ती मनमुराद संग्रहासही टाकूं; तथापि त्याचे जवळील संपत्ति पुनः जशीची तशी भरपूरच रहाणार. ६

इंद्र वरुणहो, अपूर्व सौख्याच्या इच्छेनें मी तुमचा धांवा करितों. आह्मांस सर्वत्र विजेयशाली करा. ७

---

१ अवः । २ ईदृशे ॥

३ गन्तारा । ४ चर्षणीनाम् ॥

५ ईमहे

६ वाजदाव्नाम् । ७ युवाकु ॥

८ सहस्रदाव्नाम् ।

९ नि-धीमहि । १० प्ररेचनम् ॥

११ सु-जिग्युषः

जे द्वेषविकारांपासून सर्वथैव मुक्त आहेत व ज्यांस अगाध अशा रजोलोकाचें ज्ञान आहे अशा त्या मरुद्देवांसह, हे अग्निदेवा, तूं इकडे ये. ३

जे उग्रकृति मरुत् आपल्या तेजानें कोणाच्याही पराक्रमास न जुमानणारे असून अर्काची अर्चना करितात त्यांसह हे अग्ने येथें ये. ४

जे अत्यंत शुभ्रवर्ण आहेत, ज्यांचीं शरीरें फार धिप्पाड आहेत, जे महापराक्रमी ह्मणून गाजले आहेत, व जे दुष्टांचें उन्मूलन करण्यांत कुशल आहेत त्या मरुतांसह हे अग्ने इकडे ये. ५ (३६)

जे मरुद्देव स्वर्गाचे वरती देदीप्यमान द्युलोकांत वास करितात, त्यांसह हे अग्ने, इकडे ये. ६

ओतप्रोत भरून उचंबळणाऱ्या समुद्रांत जे पर्वतास उलटे सुलटे फेंकून देतात त्या मरुतांसह हे अग्ने येथें ये. ७

जे आपल्या सामर्थ्यानें आपल्या किरणांनीं सर्व समुद्र आक्रमून टाकतात त्या मरुतांसह हे अग्ने इकडे ये. ८

हा मधुर सोमरस मी तुला अर्पण करीत आहे. सर्वांचे अगोदर तो तूं प्राशन करावा अशी माझी इच्छा आहे. तर हे अग्निदेवा मरुद्गणांस घेऊन तूं इकडे ये. ९ (३७)

---

१ घोरवर्पसः । २ सुक्षत्रासः । ३ रिशादसः ॥

४ रोचने ॥

५ अर्णवम् । ६ तिरः । ७ ईंखयन्ति ॥

८ तन्वन्ति ॥

९ पूर्वपीतये ॥

॥ पहिला अध्याय समाप्त. ॥

# दुसरा अध्याय.

## सूक्त २०.

ऋषि–मेधातिथि कण्व । देवता–ऋभु ॥

जन्मासे येण्याच्या यातायातीतून ज्या देवांची सुटका झाली नाही त्यांचे प्रीत्यर्थ विद्वान् उपासकांनी ही स्तुति स्वमुखानें गाइली होती. ह्या स्तुतीच्या योगाने उत्कृष्ट वैभवाची प्राप्ति होण्याजोगी आहे. १

ह्या देवानी स्वतःच्या कल्पनेनें, हुकूम केल्याबरोबर रथास आपण होऊन नियुक्त होणारे दोन अश्व, इंद्रासाठी निर्माण केले. त्यानी आपल्या अद्भुत कृत्यानीं यज्ञातील सन्मानास स्वतःस पात्र करून घतले. २

आणि ह्यानी अश्वीदेवांकरिता सर्वत्र सचार करणारा असा सुखकारक रथ तयार केला व दुग्ध देणारी धेनूही उत्पन्न केली. ३

ऋभु हे असे आहेत की ज्यांस उद्देशून केलेल्या प्रार्थना निःसंशय सफल होतात. त्याची वृत्ति अगदी सरळ आहे. ह्यानीं आपल्या सामर्थ्यानें मातापितरास पुन्हां तरुण केले. ४

---

१ मूळमंत्रात हा शब्द एकवचनीच आहे. परंतु पुढे अनेकवचनाचा उल्लेख केल्यामुळे येथे अनेकवचन घेतले पाहिजे । २ जन्मने ॥

३ शमीभिः ॥

४ परिज्मानम् ॥

५ विष्टी ॥

मरुद्गणांसहवर्तमान इंद्र, आणि वैभवश्रीनें मंडित असे आदित्य, ह्यांच्या समुदायाकडे येण्यासाठी, हे ऋभु जाऊन पोंचले आहेत. हे मूर्तिमान् आनंदच आहेत. ५ (१)

शिवाय त्वष्टादेवानें तयार केलेल्या त्या प्रसिद्ध चमसाचे ह्यांनींच पुन्हां चार चमस केले. ६

तुह्मी असे पराक्रमी असल्यामुळे आपले उत्तम आशीर्वाद, व एकवीस प्रकारची रत्ने, एकएका भक्तास एकें एक अशा रीतीने, आह्मांस द्या. ७

इतर देवास जसा यज्ञाचा भाग मिळतो तसा भाग ह्यांनीही आपणास प्राप्त करून घेतला. हे श्रेष्ठ आहेत. यज्ञहवींचा ह्यांनी स्वीकार केला. ८ (२)

## सूक्त २१.

ऋषि-मेधातिथि काण्व । देवता-इंद्र आणि अग्नि ॥

इंद्र आणि अग्नि ह्या देवांस मी येथे बोलावितो. त्यांच्याच स्तवनाची आह्मास इच्छा आहे. ते सोमाचे प्राशन करोत. त्यास सोमरस आवडतो. १

मानवहो, इंद्र व अग्नि ह्यांचे यज्ञांत स्तवन करा, त्यास स्तुतींनी अलंकृत करा, गीतांमध्यें त्यांचें गायन करा. २

---

१ मदासः ॥
२ एकमेकम् ॥
३ अभजन्त ॥
४ उश्मसि । ५ हें क्रियापद अध्याहृत आहे. ।
६ शुम्भत ॥

मित्राच्या गौरवा[1]र्थ त्यांस—त्या सोमप्रिय इद्राग्नींस—मी सोमपानार्थ पाचारण करितों. ३

त्या उग्र पण उदा[2]र देवास, तयार करून ठेविलेल्या हवीनें संनिध, आम्ही बोलावितो. हे इद्राग्नि इकडे येवोत. ४

सर्व लोकस[3]मुदायाचें रक्षण करणारे असे सर्वश्रेष्ट इद्राग्निदेवहो, राक्षसांस शासन करा. दुष्ट लोकांचें निसतान होवो. ५

हे इंद्राग्निदेवानो, [4]चैतन्यतेजानें अतिशय उज्ज्वल झालेल्या अशा स्थानांवर विराजमान होऊन तुह्मी त्या तुमच्या सर्व प्रसिद्ध सत्यत्वास जागृत रहा, व आह्मास सौख्य अर्पण करा. ६ (३)

## सूक्त २२.

ऋषि, मेधातिथि काण्व । देवता १–४ अश्वी, ५–८ सविता, ९,१० अग्नि ११, देवी, १२ इंद्राणी, वरुणानी, अग्नायी, १३, १४ द्यावापृथ्वी, १५ पृथ्वी, १६ विष्णु, किंवा देव, १७–२१ विष्णु ॥

प्रभातकाळीच रथ जो[5]डून सिद्ध होणाऱ्या अश्विनांस जाऊन जागे कर. ते तेथें त्यां सोमरसाच्या प्राशनाकरितां प्राप्त होवोत. १

ज्याचा रथ उत्कृष्ट आहे, जे महारथी योद्धयांत श्रेष्ठ आहेत, आणि जे द्युलोकापर्यंत जाऊन भिडणारे आहेत, त्या दोन अश्वीदेवास मी पाचार[6]ण करितो. २

---

१ प्रशस्तये ॥
२ सन्ता ॥
३ सदस्पती ॥
४ प्रचेतुने पदे ॥
५ युजा ॥
६ हवामहे ॥

जो तुमच्या रथाचा चाबूक ऐकू आला असता, तुमच्या सन्मानार्थ मधुर सोमरस तयार करण्याची यज्ञकर्त्यांची लगबग उडून जाते, व ज्याच्या ध्वनीबरोबर आपणास आता सत्य-तत्त्वाचा मनोहर लाभ होणार अशी सर्वास आशा वाटावयास लागते, त्याच्यायोगाने आमच्या यज्ञावर सुखसमृद्धीचे ओघ वाहतील असे करा. ३

सोमरस अर्पण करणाऱ्या भक्तांच्या ज्या गृहाकडे, हे अश्विनहो, आपण रथातून जाण्यास निघतां ते आपणास मुळीच दूर नाही. ४

ज्याचे कर सुवर्णाप्रमाणे कान्तिमान् आहेत अशा **सवित्यास** आपल्या संरक्षणाकरिता मी आमंत्रण करितो. तो सवितादेव परम पदाचा ज्ञाता आहे. ५ ( ४ )

जलापासून अवतीर्ण झालेल्या सविता देवाची, आपले संरक्षण व्हावे ह्मणून, स्तुति कर. त्याच्या आज्ञा आह्मास मान्य आहेत. ६

सवितादेवास आह्मी भक्तीने बोलावितो. सर्व मनुष्यांवर ह्याची नजर आहे. आश्चर्यकारक व मनास आल्हाद देणारी अशी संपत्ति हा सर्वांस वाटून देतो. ७

मित्रहो, बसा, आपणास सवित्याची स्तुति करावयाची नाही काय ? हा दाता आहे, मनोरम ऐश्वर्यास हा शोभा आणितो. ८

हे अग्निदेवा, इकडे येण्यास संतोषाने तयार असलेल्या देवपत्नीस व त्याचप्रमाणे **त्वष्टा**-देवास येथे सोमपानार्थ घेऊन ये. ९

---

१ मिमिक्षतम् ॥

२ सोमिन ॥

३ चेत्ता ॥

४ उश्मसि ॥

५ राधस ॥

६ राधांसि ॥

७ उशती ॥

अत्यत तरुण दिसणाऱ्या हे अग्निदेवा, **होत्रा . भारती, वरुत्री** व **धिषणा** ह्या देवस्त्रियांस आमच्या सरक्षणाकरिता येथे घेऊन ये. १० ( १ )

मार्गात कोठेही विघ्न न होता आह्मांकडे येऊन वीरपत्नी देवता आह्मास कृपा सौख्य व आनंद ह्यांची जोड करून देवोत. ११

आमचें क्षेम असावे ह्मणून **इंद्राणी, वरुणानी** व **अग्नायी** ह्याना मी सोमपानार्थ बोलावितो. १२

**मही, द्यौ** व **पृथ्वी** ह्या, आमचे यज्ञावर सुखसमृद्धीचे ओघ आणोत. त्या आह्मांस मरभराटीने भरपूर भरून टाकोत. १३

त्यांच्याच घृतपरिपूर्ण दुग्धाची विद्वान पुरुष आपल्या स्तोत्रामध्ये, गधर्वांच्या अक्षय्यलोकीं प्रशंसा करितात. १४

हे पृथिवी, तूं आह्मावर संतुष्ट हो. तू कोणाचा नाश होऊ देणारी नाहीस, सर्वांचा समावेश तू करितेस. आम्हास अतिशय सौख्य दे. १५ ( ६ )

पृथ्वीचे सप्तप्रदेश धरून ज्या ज्या स्थानाचे विष्णूने आक्रमण केले त्या त्या ठिकाणी देव आमचे सरक्षण करोत. १६

१ ग्ना ॥
२ सचन्ताम ॥
३ स्वस्तये ॥
४ भरीमभि ॥
५ रिहन्ति ॥
६ स्योना ॥
७ अत ॥

विष्णूने हें सर्व आक्रमून टाकिले. त्याने तीन ठिकाणी आपले पाऊल ठेविलें. त्याच्या पदरजांत सर्व निर्मग्न होऊन गेलें होते. १७

ज्याचा कोणास पराभव करता यावयाचा नाही व जो जगताचा संरक्षक आहे अशा विष्णूनें त्या त्या ठिकाणीं आपल्या धर्मनियमांची प्रस्थापना करून, तीन पावले आक्रमण केली. १८

ज्या अलौकिक पराक्रमी कृत्याच्या योगाने विष्णूनें जगांतील अखिल कर्मे अवलोकन केली त्या कृत्यांकडे दृष्टि फेका. विष्णु हा इद्राचा साहाय्यकारक व मित्र आहे. १९

त्या विष्णूच्या परमपदाचे ज्ञाते लोक, नेहमी निरीक्षण करीत असतात आणि त्यावेळी त्यांचे नेत्र आकाशाकडे टक लाविल्याप्रमाणे विस्तार पावतात. २०

सदा जागृत व परम भक्तीने स्तवन करणारे बुद्धिशाली पुरुष विष्णूचे जे परम पद आहे, त्याची सर्वत्र प्रसिद्धि करितात. २१ (७)

---

१ समूळ्हम ॥

२ अदाभ्य ॥

३ पस्पशे ॥

४ दिवीव ॥

५ विपन्यव· ॥

## सूक्त २३.

ऋषि-मेधातिथि काण्व ॥ देवता-१ वायु, ४,५ मित्रावरुण, ७ ९ इंद्र, मरुत्वान, १०-१२ विश्वदेव, १३-१५ पूषा, १६-१२ आप, २३,२४ अग्नि ॥

हे सोम तीव्र आहेत. तूं ये. ह्यांत दही मिसळून हे तयार करून ठेविले[1] आहेत. वायुदेवा, त्यांचें प्राशन कर. ते तुझ्याकरितां ठेविले आहेत. १

ह्या सोमरसाच्या प्राशनाकरितां मी इंद्रवायूस बोलावितो. हे दोघेही द्युलोकापर्यंत भिडणारे[2] आहेत. २

विद्वान् लोकांनी आपल्या संरक्षणाकरितां इंद्रवायूनाचा पाचारण केलें. ह्यांची गति मनाइतकी शीघ्र[3] आहे. त्यास हजारो नेत्र आहेत व ते सर्व बुद्धिमत्तेचे अधिपति आहेत. ३

आम्ही **मित्र** व **वरुण** ह्यांस सोमपानार्थ निमंत्रण करितो. हे अखिलज्ञानी, व पवित्र कार्यासाठी आपल्या सामर्थ्याचा उपयोग करणारे[4] आहेत. ४

जे नीतिमार्गाने नीतिनियमनांचा मान वृद्धिंगत करितात आणि जे तेजाचे अधिष्ठाते[5] आहेत त्या मित्रावरुणांस मी हवि अर्पण करतो. ५ (८)

---

१ आशीवन्त ॥

२ दिविस्पृशा ॥

३ मनोजुवा ॥

४ पूतदक्षसा ॥

५ ज्योतिषस्पती ॥

आमचा सांभाळ करण्याचे जेवढे म्हणून मार्ग आहेत तेवढ्या सर्व मार्गांनी मित्र आमचा रक्षणकर्ता होवो. वरुणही आमचा संरक्षक बनो. ते दोघेही आम्हास अत्यंत सुखी करोत. ६

मरुद्देवांसहवर्तमान आम्ही इंद्रास सोमपानार्थ बोलावितो. आपल्या गणांनी तो परिवेष्टित आहे. आमच्याकडून त्याचा संतोष होवो. ७

अहो इंद्रप्रमुख मरुद्देवहो. तुम्ही **पूषाचे** स्नेही आहांत. तुम्ही सर्व माझी हाक ऐका. ८

हे अति उदार देवहो. तुमचा मित्र जो इंद्र त्याच्या पराक्रमाचे साहाय्य घेऊन **वृत्राचा** वध करा. तो अभद्रमार्गी आम्हावर स्वामित्व न मिळवो. ९

आम्ही सोमपानार्थ सर्व मरुद्देवांस निमंत्रण करितो. खरोखर हे **पृश्नीचे** फार उग्र आहेत. १० ( ९ )

विजय मिळवून आलेल्या वीरांप्रमाणे मरुतांची गर्जना जोराने ऐकूं येत आहे. हे शूरहो, जे आम्हास कल्याणप्रद असेल तेथेच तुमचे गमन होऊं[६] द्या. ११

विद्युल्लतेच्या प्रचंड हास्यांमधून अवतीर्ण झालेले मरुद्देव आमचे रक्षण करोत. ते आम्हांस सुखी ठेवोत. १२

१ करताम ॥
२ मरुत्वन्तम ॥
३ विश्वे ॥
४ दुःशंस ॥
५ पृश्निमातर ॥
६ याथना ॥
७ हस्कारात् ॥

हे अत्यंत देदीप्यमान **पूषा**, चित्रविचित्र रंगाच्या मयूरपुच्छांनी नटविलेल्या आकाशाच्या बालकास, एकाद्या चुकलेल्या वासराप्रमाणें, शोधून घेऊन ये. १३

चित्रविचित्र रंगाच्या मयूरपुच्छांनीं नटविलेल्या, परंतु गुहेत लपवून ठेवल्यामुळे अदृश्य झालेला आमचा राजा, देदीप्यमान पूषास पुन्हां सापडला. १४

शिवाय ज्याप्रमाणें शेतकरी हा बैलाच्या योगानें धान्य पिकवून घरी आणतो त्याप्रमाणे सोमरसानें संतुष्ट होऊन हा पूषा, एकमेकाशी साखळीप्रमाणे जोडलेल्या सहा ऋतूंस, माझ्या साठीं घेऊन येवो. १५ ( १० )

स्वतःची जले माधुर्याने परिपूरित करित, भाविक यजनकर्त्यांच्या ह्या प्रेमळ जननी स्वमार्गाने वहात आहेत. १६

ज्या सूर्याच्या सन्निध आहेत, अथवा सूर्य ज्यांचे समीप आहे, त्या ह्या आमच्या जननी, यज्ञास यशस्वी करोत. १७

जेथे आमच्या धेनु उदक प्राशन करीत असतात, त्या जलदेवतांस मी आमंत्रण करितो. ह्या नद्यास हवि अर्पण करणे योग्य आहे. १८

---

* हे आकाशाचे बालक कोण हे मुळात स्पष्ट नाहीं.

१ धरुणम् ॥

२ क्षपगूह्ळम् ॥

३ अनुसेषिधत् ॥

४ जामय· ॥ ही ऋचा नद्यास उद्देशून असावी.

५ हिन्वन्ति ॥

६ कर्त्वम ॥

जलांचे अंतरंगी अमृत आहे, जलांचे अंतरंगी औषधिगुण आहे, जलांच स्तवन करण्याकरितां, हे देवांनों, त्वरा करा. १९

मला सोमानें सांगितलें की, जलाचे अंतरंगी औषधि आहेत, आणि अग्नि हा सर्वांचा कल्याणकर्ता आहे. उदक हे खरोखर सर्वरोगपरिहारक होय. २० ( ११ )

हे जलांनो माझें शरीरस्वास्थ्य सदोदित रहावें व मला चिरकाल सूर्याचे दर्शन घेतां यावे ह्मणून मला उत्कृष्ट औषध द्या. २१

हे जलानो, जो कांही दुष्टपणा माझे अंगी वास करीत असेल, कोणाशींही मी जे शत्रुत्व आचरलें असेल, जे मीं कोणाचे वाईट इच्छिलें असेल अथवा जे मीं असत्य वर्तन केले असेल, ते तुह्मीं सर्वथैव धुवून टाका. २२

हे जलांनो, आज मी तुमचे समीप आलों आहे, व तुमच्या मधुर रसांशी संयुक्त झालों आहे. हे जलनिवासी अग्निदेवा, येथे प्राप्त हो, व मला तेजाची जोड करून दे. २२

हे अग्निदेवा, तेज संतति व आयुष्य ह्यांची मला जोड करून दे. ह्मणजे हे माझें वैभव देवांस विदित होईल व ऋषीसहवर्तमान इंद्रासही माहित होईल. २४ (१२)

---

१ वाजिनः ॥
२ विश्वशम्भुवम् ॥
३ वरूथम् ॥
४ शेपं ॥
५ पयस्वान् ॥
६ संसृज ॥

# अनुवाक ६.

## सूक्त २४.

ऋषि-शुनः शेप, अजीगर्ति, कृत्रिम, वैश्वामित्र, देवरात, ॥ देवता- १ प्रजापति, २ अग्नि, ३-५ सविता, किंवा भग, ५-१५ वरुण, ॥

खरोखर आह्मीं कोणाचें सुंदर नाम—सर्व अमरदेवांपैकीं कोणत्या देवाचें मनोहर नाम—स्मरावे[१] ? मला आदितीस पुन्हां कोण भेटवील की जेणेंकरून मी जनकास व जननीस पाहीन ? १

सर्व अमरदेवांपैकीं प्रमुख जो अग्निदेव यांचें मोहक नाव आह्मी स्मरू. ते मला आदितीस पुन्हां भेटवील, व मग मी जनकास व जननीस पाहीन. २

आमचें निरंतर रक्षण करणाऱ्या हे सविता देवा, सर्व स्पृहणीय वस्तूंचा तूं स्वामी आहेस. तुझेजवळ आह्मी अनुरूप असा संपत्तीचा हिस्सा मागतो. ३

ह्याप्रमाणें जें कांहीं प्रशंसनीय भाग्य, की ज्याची कोणी निंदा करूं ह्मणेल तरी ते अशक्य होईल, व ज्यास द्वेष्टे लोकापासून सुद्धां कोणतीही बाधा पोहोचावयाची नाहीं, तें तुझ्या हाती ठेवलेलें आहे, ४

तुझ्याच कृपेमुळें आह्मीं श्रीमंत होऊं, व संपत्तीच्या अगदीं शिखरावर सुस्थिरपणें बसूं. सर्व मनुष्यांच्या भाग्याची वाटणी करणारा तूंच आहेस. ५ ( १३ )

---

१ मनामहे ॥
२ अमृतानाम् ॥
३ ईमहे ॥
४ शशमानः ॥
५ उदशेम ॥

हे ऊंच भराऱ्या मारणारे पक्षी, हीं एक निमिषभरही न थांबतां वाहणारी उदकें, अथवा वायूचा दर्प जे देव धुडकावून[1] लावतात, त्यांसही, तुझा पराक्रम, बल अथवा कोप, ह्यांची बरोबरी करवत नाही. ६

आकाशास कोणता धर आहे ? पण तेथें, पवित्र पराक्रम करणाऱ्या राजा वरुणानें वृक्षाचा स्तंभ[2] उभा रोंवला. त्याबरोबर त्यांचे बुधे वर गेले, व ते खाली झाले. ह्यांचे आंत कोठेंतरी आमची निवासस्थानें असली पाहिजेत. ७

सूर्यास आपला दैनिक प्रवास करतां यावा म्हणून वरुण राजाने त्याचा मार्ग विस्तृत केला. जेथें पाऊल टाकण्याचीही सोय नव्हती तेथे पाय ठेवण्याजोगी त्याने वाट केली. जे दुसऱ्यांस वर्मी[3] लागेल असें बोलतात त्यांची वरुण अत्यन्त निर्भर्त्सना करितो. ८

हे वरुण राजा, तुझ्याजवळ शेकडोच काय, पण सहस्रावधि औषधें आहेत; तुझी कृपा अतिशय व अविच्छिन्न असो. आमच्या साडेसातीस पार घालवून देऊन तिचें निर्मूलन कर, आणि आह्मांपासून आमच्या हातून घडलेल्या पातकास दूर कर. ९

ही जी नक्षत्रे आकाशात उंच स्थापन केली आहेत ती रात्रीचमात्र दिसतात दिवसां ती कोठेंतरी निघून गेली होती. वरुणाच्या आज्ञा अनुलंघनीय आहेत. चन्द्रमा रात्री प्रकाशमान होतो. १० ( १४ )

---

१ हिंसन्ति ॥

२ स्तूपम् ॥ हे जगद्रूपी वृक्षाचें वर्णन असावें.

३ हृदयाविधः ॥

४ प्रमुमुग्धि ॥

५ विचाकशत् ॥

ह्याच कारणांस्तव स्तोत्रांनी तुला नमन करीत मी तुझे समीप येतो, याच कारणास्तव याग करणारा भक्त हवि अर्पण करून तुझेजवळ याचना करीत असतो. वरुणा, कोप न करितां येथे जागृतपणाने रहा, व आमचें आयुष्य कमी करूं नको. तुझी कीर्ति फार गाजत असते, ११

दिवसां व रात्री सर्व लोक मला हीच गोष्ट सांगतात, व माझ्या हृदयाचाही मला असाच स्पष्ट उपदेश आहे, की शुनःशेप बंधनात पडला असतां त्याने ज्या वरुणास आळविले तोच आम्हांस बंधमुक्त करील. १२

तीन खांबाशी जखडून बांधलेल्या शुनःशेपाने बंधनात असतांना आदित्याचा धांवा केला. ज्ञानवान् वरुणराजास कोणाला अपाय करितां येणार ? तोच शुनःशेपाचे पाश शिथिल करो व त्यास बंधनातून मुक्त करो. १३

नमस्कृतींनी, यागांनी व हवींनी, आपला कोप शांत करण्याकरितां हे वरुणा, आम्ही तुझी प्रार्थना करितो. तू शत्रूचा नाश करणारा व अतिशय ज्ञानशील आहेस. आम्हांकरितां येथें निवास करून हे वरुणराजा, आमच्या पातकाचा क्षय कर. १४

हे वरुणा, आमचे वरच्या बाजूचे, मधले व शरीराच्या खालील भागावरील पाश शिथिल कर. हे आदित्या तुझ्या अमलाखाली आम्ही पापविमुक्त होऊन अदितीच्या आश्रयास पात्र होऊं. १५ ( १५ )

---

१ अहेळमानः ॥

२ अहृत् ॥

३ द्रुपदेषु ॥

४ शिश्रथः ॥

५ अनागसः ॥

# सूक्त २५.

ऋषि–शुनःशेप आजीगर्ति । देवता वरुण ॥

तुझी प्रजा या नात्यानें जी कांहीं तुझी आज्ञा, हे वरुणा, आम्हांकडून रोज मोडली जात असेल, १

तिच्याबद्दल वधाचीच शिक्षा ठरलेली असली तरी, आम्हांवर कोपायमान होऊन, ती शिक्षा आम्हांस देऊ नको. आम्हांवर संतप्त होऊन आपल्या क्रोधाला आम्हांस बळी देऊं नको. २

हे वरुणा, ज्याप्रमाणे एखादा महारथी आपल्या घोड्यास ( त्याने पळून जाऊ नये म्हणून ) दोरीनें जखडून टाकतो, त्याप्रमाणे, तुझ्यापासून सुखे प्राप्त करून घेण्याकरितां अनेक स्तोत्राच्या द्वारें आम्ही आपले मन तुझें ठायीं बद्ध करतो. ३

ज्याप्रमाणे पक्षी आपापल्या निवासस्थानाकडे पळत सुटतात, त्याप्रमाणे सुखलाभाच्या शोधार्थ माझ्या सर्व उत्तम मनःकल्पना तुझ्याकडे धांव घेतात. ४

पराक्रम हेच ज्याचे अलंकार आहेत अशा सर्वसाक्षी वरुणास आमच्या सुखसिद्ध्यर्थ आम्हास केव्हां घेऊन येता येईल बरे ? ५ ( १६ )

खरोखर अतिशय कनवाळूपणाने हे दोघेही त्याचा समसमान स्वीकार करितात. आज्ञाधारक यागकर्त्यास ते कधींही निराश करीत नाहींत. ६

जो अंतरिक्षातून परिभ्रमण करणाऱ्या पक्ष्यांचा मार्ग जाणतोः समुद्रनिवासी असल्या-मुळें तारवाची वाट ज्यास माहीत आहे. ७

---

१ व्रतम् ॥
२ हत्नवे ॥
३ संदितम् ॥
४ विमन्यवः ॥
५ क्षत्रश्रियम् ॥
६ समानम् ॥ हे दोघे म्हणजे मित्र व वरुण,
७ वीनाम् ॥

आपल्या आज्ञा सर्वांस मानावयास लावीत असून ज्यास द्वादश मासांचे—कीं ज्यापैकीं प्रत्येकात लोकसंख्येची एकसारखी वृद्धि होत असते—ज्ञान असते, शिवाय त्यांस जोडूनच जो महिना कधी कधी येतो त्याचीही ज्यास माहिती आहे; ८

सर्वसंचारी, उत्तुंगगामी व सामर्थ्यवान् अशा वायूची गति ज्यास विदित आहे, व वायुलोकाचेही वरती जे राहतात त्यानासुद्धा जो ओळखतो; ९

असा सर्वसमर्थ वरुण आपल्या आज्ञाचे परिपालन करवीत साम्राज्य गाजविण्याकरितां सर्व लोकात येऊन विराजमान झाला आहे. १० ( १७ )

तेथून तो ज्ञानवान् देव, जी आश्चर्ये त्यानें उत्पन्न केलीं आहेत व जी त्यास अजून उत्पन्न करावयाचीं आहेत, त्या सर्वांचें अवलोकन करीत असतो. ११

तो सर्वसमर्थ आदित्य आम्हांस चागल्या मार्गावर घेऊन जावो. तो आमची आयुष्ये वृद्धिंगत करो. १२

आपले सुवर्णमय कवच घालून त्यानें देदीप्यमान वस्त्र धारण केले आहे. सभोवार त्याचे दूत बसले आहेत. १३

ह्यास दुष्ट लोक भीति घालूं शकत नाहीत, ह्यास मनुष्यजातीचे द्वेष्टे भयभीत करीत नाहींत, ह्यास पापकर्मे खलही भयचकित करावयास समर्थ नाहीत. १४

---

१ उपजायते ॥
२ ऋष्वस्य ॥
३ पस्त्या ॥
४ चिकित्वान् ॥
५ तारिषत् ॥
६ द्रापि ॥
७ दिप्सव· ॥

शिवाय अखिल मानवजातींत ह्यांने आपले यश गाजविलें आहे, आणि तेही अर्धवट गाजविलें आहे अशांतला भाग मुळीच नाही, इतकेच काय पण खुद्द आपल्या उदरातही ह्यानें कीर्तिपद सुंदर रचना करून ठेविली आहे. १५ ( १८ )

ह्या सर्वदर्शी देवाविषयीं प्रेमपूरित झाल्यामुळे माझ्या प्रार्थना, ज्याप्रमाणें गाई चारा ठेवलेल्या गोठ्याकडे उत्सुकतेने परत येतात त्याप्रमाणे, त्याकडेसच पुनः पुनः वळतात. १६

माझा मधुर हवि अगदी सिद्ध आहे; तेव्हां आपले एकमेकाशीं प्रत्यक्ष संभाषण होऊ द्या. हा हवि तुला प्रिय आहे. यागकर्त्याप्रमाणे तू त्याचा स्वीकार करतोस. १७

सर्व विश्वांत ज्याची मनोहर रूपाबद्दल ख्याति आहे त्याचे दर्शन आज मला घडले. ह्या पृथ्वीवर त्याचा रथ मी पाहिला. ह्या माझ्या स्तुतीचा त्यानें स्वीकार केला आहे. १८

हे वरुणा, ही माझी हाक ऐक, व मला सुखांत ठेव. तुझ्या कृपेची इच्छा धरून मी तुझ्याजवळ याचना करीत आहे. १९

हे प्रज्ञाशील देवा, अखिल पृथ्वी व स्वर्ग ह्यावर तुझीच सत्ता आहे. म्हणून तू जाशील तेव्हां मला आश्वासन देउन जा. २०

आम्ही चिरकालपर्यंत आयुष्याचा उपभोग घ्यावा म्हणून आमचे वरच्या बाजूचे पाश शिथिल कर. आमची मधली आणि शरीराच्या खालील भागांवरील बंधनेंही सोडून टाक. २१ ( १९ )

१ असामि ॥
२ गव्यूतीः ॥
३ क्षदसे ॥
४ अधिक्षमि ॥
५ आचके ॥
६ यामनि ॥
७ विपाशम ॥

## सूक्त २६.

ऋषि–शुनःशेप आजीगर्ति । देवता–वरुण ॥

हे सामर्थ्याधिपति देवा, हे यज्ञार्ह[1] अग्ने, आपली दिव्य वस्त्रे अंगावर घाल आणि अशा-रीतीने विभूषित होऊन हा आमचा यज्ञ सिद्धीस ने.    १

हे अत्यंत तरुण अग्नि देवा, आमचे वचन श्रवण कर. तुं दिव्य कान्तीने युक्त[2] आहेस, अंतःकरणपूर्वक केलेली स्तवने तुलाच साजतात. तूं आमचे हवि पोहोचवितोस.    २

खरोखर पुत्रास जो जणूं पिताच आहे. आप्तसंबंधी[3] मनुष्यास जो नातलगच आहे व जो मित्रास अत्युत्तम मित्र आहे असा तो ( अग्नि ) आमचा यज्ञ सिद्ध करतो.    ३

ज्याप्रमाणें आम्ही मनुष्ये दर्भांच्या आसनावर बसतो त्याप्रमाणे खलांचा नाश करणारे[4] वरुण, मित्र व अर्यमा देवही प्रेमाने दर्भासनावर येऊन विराजमान होवोत.    ४

देवास हवि अर्पण करणाऱ्या हे पुराणपुरुषा, आमच्या हवींत संतोष मान, आमच्या प्रेमांत आनंद वाटूं दे. व आमच्या प्रार्थना[5] श्रवण कर.    ५ ( २० )

जो कांही हवि आम्ही निरनिराळ्या देवतांस नेहमी[6] देत असतो तो तुझ्याच ठायीं अर्पण होतो.    ६

---

१ मियेध्य ॥
२ दिवित्मता ॥
३ आपये ॥
४ रिशादसः ॥
५ श्रुधि ॥
६ शश्वता ॥

शुभकारक अग्नीचे पूजन करणारे आह्मी त्यास प्रिय आहोंत. त्याचेवरही आमचे खरे प्रेम असो. तो प्रेम करण्यास योग्य आहे, तो आनद देणारा आहे, तो देवतास हवि पोचवितो, सर्व मानवाचा तो राजा आहे. ७

शुभदायक अग्नीशी सख्य असणाऱ्या देवानी, आपणाकरितां अत्यंत स्पृहणीय वैभव तयार करून ठेवले आहे. आह्मी त्याच कल्याणकारक अग्नीचे भक्त होऊन त्याचे चिंतन करितों. ८

आणि आतां हे अमरदेवा, यज्ञाचे दोन्ही बाजूस बसलेल्या आम्हामध्ये एकमेकाच्या संबंधाने प्रेमसभाषण होवो. ९

सामर्थ्यापासून प्रादुर्भूत होणाऱ्या हे अग्निदेवा, इतर सर्व अग्नीसहवर्तमान ह्या यज्ञावर व ह्या स्तोत्रावर प्रेम ठेव. १० ( २१ )

## सूक्त २७.

ऋषि–शुनःशेप आजीगर्ति । देवता–१–१२ अग्नि, १३ विश्वेदेव ॥

चिलखत घालून सजविलेल्या अश्वाप्रमाणे अनेकदा वंदन करून मला तुझा बहुमान करू दे. तूं प्रत्येक यज्ञात विराजमान होत असतोस. १

हा दाता स्वसामर्थ्याच्या योगाने अनेक स्थली गमन करतो. हा उत्तम सौख्यें अर्पण करणारा आहे. तो आह्मांकरितां कृपेची वर्षाव करो. २

---

१ विश्पतिः ॥
२ दधिरे ॥
३ प्रशस्तयः ॥
४ विश्वेभिः ॥
५ वारवन्तम् ॥
६ मीढ्वान् ॥

तूं सर्वांचा प्राण आहेस. तो तूं आम्ही तुझेजवळ असो की दूर असो, पातकाचरण करणाऱ्या माणसा पासून आमचे नेहमी संरक्षण कर. ३

अग्निदेवा, आम्ही गाइलेल्या ह्या सर्व कामनापरिपूरक अशा आमच्या नवीन स्तोत्राची देवांचे समुदायात तू प्रशंसा केलेली आहेस. ४

जे सामर्थ्य सर्वोत्कृष्ट आहे, अथवा जे मध्यम प्रतीचे आहे त्याची प्राप्ति होत असतांना तू आमचे जवळ ऐसे. जी संपत्ति अखेरच्या कोटीतील म्हणून गणली जाते तीही कशी प्राप्त करून घ्यावी हे आह्मास शिकव. ५ ( २२ )

अलौकिक कांतीने देदीप्यमान असणाऱ्या हे देवा, तू संपत्तीची वाटणी करणारा आहेस. तू कृपेचा सिंधु असल्यामुळे तुझ्या प्रसादलहरीजवळ जो भक्त उभा असतो त्याचे-साठी तूं तावडतोब संपत्तीचे पूर वाहवितोस. ६

खरोखरच्या मानवाचा तू युद्धात रक्षण कर्ता होतोस व त्याला तू शूरत्वाच्या कृत्यात प्रेरणा करणारा असतोस त्याची सत्ता शाश्वतसंपत्तीवर प्रस्थापित होते. ७

तो कसाही असला तरी हे बलशाली देवा, त्यास कोणी प्रतिरोध करू शकत नाही. त्याच्या सामर्थ्याची कीर्ति सर्वत्र गार्जते. ८

हा सर्वसंचारी देव, आह्मास आमचे अश्वांसह पराक्रमाच्या कृत्यातून पार पाडो व विद्वान् स्तोत्यासह आम्हास संपत्ति देवो. ९

---

१ विश्वायु. ॥
२ सनिम् ॥
३ आभज ॥
४ आअक ॥
५ इषः ॥
६ आतिश्रवाय्यः ॥
७ सानिता ॥

## सूक्त २९.

ऋषि-शुनःशेप, अजीगर्ति । देवता-इन्द्र ॥

हे सत्यस्वरूप व अत्यंत उदार इन्द्रा, ज्याअर्थी आह्मास कोठेच मान नाहीं असे झाले आहे, त्याअर्थी धेनु, अश्व, उज्ज्वल धन, व सहस्त्रावधि भोग्यवस्तु ह्याचे संबधात आमचे वर्चस्व सत्वर वाढेल असे कर. १

हे सुंदर मुकुट धारण करणाऱ्या अत्यंत उदार इद्रा, हे सामर्थ्याधिपते, हे पराक्रमी देवा, आपल्या अद्भुत कृतीने धेनु, अश्व, ऊज्ज्वल धन, व सहस्त्रावधि भोग्यवस्तु ह्यांचे संबधात आमचे वर्चस्व सत्वर वाढेल असे कर. २

परास्पराकडे एकसारखी नजर फेकणाऱ्या त्या दोघीजणीस निद्रित कर. त्या जाग्या न होतां पडून राहतील असे कर. हे अत्यंत उदार इद्रा, धेनु, अश्व, उज्ज्वल धन व सहस्त्रावधि भोग्यवस्तु ह्याचे संबंधांत आमचे वर्चस्व सत्वर वाढेल असे कर. ३

ते आमचे शत्रु निद्रित असोत, व हे शूरा, आमचे स्नेही मात्र जागृत राहोत. हे अत्यंत उदार इद्रा, धेनु, अश्व, उज्ज्वल धन व सहस्त्रावधि भोग्यवस्तु ह्याचे संबंधांत आमचे वर्चस्व सत्वर वाढेल असे कर. ४

असली अभद्र भाषा बोलणाऱ्या गाढवास मारून टाक. हे अत्यंत उदार इद्रा, धेनु, अश्व, उज्ज्वल धन व सहस्त्रावधि भोग्यवस्तु ह्याच संबधात आमचे वर्चस्व सत्वर वाढेल असे कर. ५

---

१ अनाशस्ता ॥

२ तुवीमघ ॥

३ अबुध्यमाने ॥

४ शुभ्रिषु ॥

५ स्तुवन्तम ॥

वक्र[1] मार्गानें गमन करणाऱ्या वाताचें फार दूर अशा अरण्याच्याही पलीकडे पतन होवो. हे अत्यंत उदार इंद्रा, धेनु, अश्व, उज्ज्वल धन व सहस्रावधि भोग्यवस्तु ह्यांचे संबंधांत आमचें वर्चस्व सत्वर वाढेल असे कर. ६

सर्व शोकाचा संहार कर. आणि जो आमचा नाश करण्यास[2] टपून बसला असेल त्यास मारून टाक. हे अत्यंत उदार इंद्रा, धेनु, अश्व, उज्ज्वल धन व सहस्रावधि भोग्यवस्तु ह्यांचे संबंधांत आमचें वर्चस्व सत्वर वाढेल असे कर. ७ ( २७ )

## सूक्त ३०.

ऋषि-शुनःशेप आजीगर्ति । देवता–१–१६ इंद्र, १७–१९ अश्वि, २०–२२ उषा ॥

ज्याचें सामर्थ्य शतपट मोठें आहे, व जो तुह्मास प्रिय आहे, अशा इंद्राची स्तुति करण्यांत निमग्न झालेल्या अहो ऋत्विजांनो, ज्याप्रमाणें एखादी विहीर पाण्यानें तुडुंब भरून टाकावी त्याप्रमाणें त्या अति उदार[3] इंद्रास आम्ही सोमरसानें जणूं भरून टाकीत आहों. १

ज्याप्रमाणें जल उतरत्या भागाकडे वहात जातें त्याप्रमाणें ह्या इंद्राची सोमरसाकडे साहजिक प्रवृत्ति होते, मग ते दुग्धमिश्रित सोमाचे हजार चमस असोत अथवा ज्यांत कांहींही मिश्र केलेलें नाहीं अशा शुद्ध सोमाचे शंभरच चमस असोत. २

---

१ कुण्डृणाच्या ॥

२ कृकदाश्वम ॥

३ क्रिविं ॥

४ समाशिरां ॥

जो सोमरस ह्या सामर्थ्यवान् इंद्रास संतोष देत असतो त्याच्यायोगाने त्याचें उदर समुद्राप्रमाणें व्यापून जाते. ३

हा सोम तुझ्याकरितां तयार करून ठेविला आहे. ज्याप्रमाणे कपोत पक्षी आपल्या लहान पिलांकडे प्रेमाने जातो त्याप्रमाणे तूं मोठ्या प्रेमानें ह्या सोमरसाकडे येत आहेस. आणि म्हणूनच आमच्या स्तूतिचाही तूं स्वीकार करीत आहेस. ४

हे इंद्रा, तू सर्व अभीष्ट वस्तूंचा स्वामी आहेस व तुझी स्तुति केली ह्मणजे तू आपल्या भक्तांकडे येतोस. हे वीरा, ज्या तुझे स्तोत्र आम्हीं गातं आहो, त्या तुजकडून आम्हास सत्यप्रेमाने परिपूरित असे वैभव प्राप्त होऊं दे. ५ ( २८ )

हे अत्यंत बलशाली इंद्रा, पराक्रमाच्या ह्या कृत्यांत आमचे संरक्षण करण्याकरितां तूं उठून उभा रहा. इतरांना सोडून आपणच एकमेकांशी संभाषण करूं या. ६

जेव्हां वैभव प्राप्त करून घेण्याची संधि येईल अथवा जेव्हा जेव्हा शौर्यकर्म गाजविण्याचा प्रसंग पडेल तेव्हां तेव्हा आमच्या संरक्षणाकरितां आम्ही इंद्राचे स्नेहांकित भक्त, त्या अत्यंत बलाढ्य इंद्रास पाचारण करितो. ७

जर आमची स्तुति त्यास ऐकू गेली असेल तर आपले हजारो प्रकारचे संरक्षणाचे मार्ग प्रकट करीत व आपले सामर्थ्य सर्वांच्या निदर्शनास आणीत हा इंद्र आमच्या हांकेच्या अनुरोधाने निःसंशय येथे प्राप्त होईल. ८

१ व्यचो दधे ॥
२ गर्भधिं ॥
३ गिर्वाहः ॥
४ अन्येषु ॥
५ योगेयोगे ॥
६ यदि श्रवत् ॥

ज्या इंद्राचा पूर्वी तुझ्या पित्यानें धांवा केला होता त्याच अनेक शत्रूंसही दाद न देणाऱ्या शूर इंद्रास आपल्या पुरातन दिव्य स्थानापासून इकडे येण्यासाठीं मी विनंति करितों ९

हे आमच्या प्रिय इंद्रा, त्या तुझी आज आह्मी स्तुति करीत आहो. सर्व विश्वानें प्रेम करण्यास तुझ्याशिवाय कोणी योग्य नाही. अनेक विद्वानांनी तुझे स्तवन केले आहे. तुझी स्तोत्रे गाणाऱ्या भक्तांचे तूं मूर्तिमंत भाग्यच आहेस. १० ( २९ )

हे वज्रधारी इंद्रा, तू आमचा व आमच्या सहचारिणींचा हितकर्ता आहेस. सोमरस प्रिय असणाऱ्या सर्व देवांत तुलाच सोमाची अत्यंत आवड आहे. ११

हे वज्रधारी देवा, हे आमच्या मित्रा, तू असे कर—तुझ्या इच्छेने असे होऊ दे— कीं आम्हीं तुझ्याच कृपेची इच्छा करावी. १२

आमच्या सहवासात इंद्रास आनंद वाटून वैभवानें युक्त व समृद्धीनें परिपूर्ण असें अतिशय सामर्थ्य आह्मांस प्राप्त होवो, की ज्याच्या योगाने आह्मास हर्ष होईल. १३

तुला तुझीच उपमा दिली पाहिजे; तूं आमचा आप्त आहेस. तुझी प्रार्थना केली असतां, हे शूर देवा, तू भक्ताच्याकरिता ( रथचक्राच्या ) अक्षाप्रमाणे धाव घेतलेली आहेस. १४

---

१ तुविप्रति ॥

२ विश्ववार ॥

३ शिप्रिणीनां ॥

४ इष्टंय ॥

५ सधमादे ॥

६ त्वावान् ॥

हे अत्यंत बुद्धिशाली इंद्रा, तुझ्या सेवकांचे हवि ग्रहण करण्याकरिता आणि त्यांच्या इच्छा परिपूर्ण करण्याकरितां तू आपल्या सर्व सामर्थ्यांसह ( रथचक्राच्या ) अक्षाप्रमाणे धावे घेतलीस. १९ (३०)

आपल्या अतिशय फुरफुरणाऱ्या, खिंकाळणाऱ्या आणि जोराने श्वासोच्छ्वास करणाऱ्या अश्वाच्या योगानें इंद्राने नेहमीच संपत्ति जिंकून आणिलेली आहे. अशा त्या अद्भुत कृत्य करणाऱ्या व आमच्या संबधाने औदार्य धारण करणाऱ्या देवाने आमच्या वैभवांत भर टाकण्याकरितां आह्मास सुवर्णरथ दिला आहे. १६

हे अश्विनहो, अश्वादिकांनी परिपूर्ण व कल्याणप्रद अशी संपत्ति घेऊन या. अहो सुंदर देवांनो, तुम्ही दिलेल्या वैभवांत धेनु आणि सुवर्ण यांचा भरपूर साठा असो. १७

हे सुंदर अश्विनहो, जो अविनाशी रथ तुम्ही दोघांकरिता मिळून जोडता तो खरोखर समुद्रांतसुद्धां गमन करितो. १८

अभेद्य अशा पर्वताच्याही मस्तकावर तुम्ही आपल्या रथाचे एक चाक भिडवले होते. दुसरे चाक द्युलोकाच्या सभोवार भ्रमण करीत असते. १९

हे स्तुतिप्रिय उषे, हे अमर देवते, तुझ्या बाहुबंधनात कोणत्या मानवास स्थान मिळणार आहे ? हे देदीप्यमान देवि, तुझे आगमन कोणाकरितां होत आहे ? २०

---

१ आ-ऋणोः ॥
२ पाप्रुथद्भिः ॥
३ शवीरया ॥
४ समानयोजनः ॥
५ अघ्न्यस्य ॥
६ नक्षसे ॥

चित्रविचित्र वर्णाच्या एखाद्या तुरगीप्रमाणें[1] शोभिवंत दिसणाऱ्या हे प्रकाशमान उषोदेवते, आह्मी दूर असताना व जवळ असतांना तुझेच ध्यान खरोखर करीत होतो.   २१

हे आकाशकन्ये[2] उषे, आपल्या सर्व सामर्थ्यासह तूं इकडे गमन कर, आणि आमच्येसाठी वैभव आणून ठेव.   २२ ( ३१ )

## अनुवाक ७.

## सूक्त ३१.

ऋषि–हिरण्यस्तूप आंगिरस । देवता–अग्नि ॥

हे अग्निदेवा, पहिला अंगिरा ऋषि व देव तूंच होय. देवांचा कल्याणकारक मित्र तूंच होतास. तुझ्या आज्ञानुसार देदीप्यमान शस्त्रे धारण करणारे व ज्ञानसामर्थ्याने[3] युक्त असलेले बुद्धिवान् मरुद्गण अवतीर्ण झाले.   १

हे अग्निदेवा, अगदी पहिला आणि प्रमुख अंगिरा तूंच आहेस. तुझे ज्ञान अतिशय आहे. देवांच्या ज्या पवित्र आज्ञा आहेत त्यांना तूंच शोभा आणितोस. तू सर्वव्यापी आहेस, तुझ्या अंगी विलक्षण बुद्धिमत्ता आहे. तुला दोन मातांनीं[4] जन्म दिला होता. खरोखर प्राणिमात्राच्या व मनुष्याच्या हिताकरितां तूं कितीतरी ठिकाणीं वास करितोस !   २

१ अश्वे ॥
२ दुहितर्दिवः ॥
३ अपसा ॥
४ द्विमाता ॥

हे अग्निदेवा, तूंच सर्वांचे अगोदर होतास. आपल्या सामर्थ्यासह विवस्वान् आणि **मातरिश्वा** ह्यांचेकरितां तूं प्रकट हो. तूं मूर्तिमान वैभवच आहेस. जेव्हां होतृस्थानी सर्वांनीं तुझी निवडणूक केली त्यावेळीं तो कार्यभार तूं सहन केलास आणि सर्व श्रेष्ठ देवांस यज्ञ पोचविलास आकाश आणी पृथ्वीमात्र ते पाहून ( आश्चर्याने ) कंपित होउन गेलीं. ३

हे अग्निदेवा, **मनू**चेकरितां तूं द्युलोकांत प्रवेश केलेस आणि सत्कृत्यांनीं विख्यात झालेल्या **पुरूरव्या**करितां तूं अतिशय प्रशसनीय कृती केलीस. ज्यावेळीं घर्षणक्रियेनें तुझ्या मातापितराकडून तुझी प्रेरणा होते त्यावेळीं ऋत्विजलोक तुला प्रथम पूर्वबाजूस आणि नंतर पुन्हां पश्चिमबाजूस घेऊन फिरतात. ४

हे अग्निदेवा, तुला हवि अर्पण करण्याकरितां जो मनुष्य यज्ञचमस वर उचलतो त्याच्या संपत्तीची तूं वृद्धि करणारा असून अत्यत बलिष्ठ व कीर्तिमान् आहेस. वषट् या शब्दांनी जी आहुति दिली जाते तिचे ज्ञान असणाऱ्या ऋत्विजास तूं सर्वांचे अगोदर अखंड आयुष्य अर्पण करीत या जगतावर वास करितोस. ५ (३२)

हे सर्वव्यापी अग्निदेवा, जो मनुष्य पापमार्गाचें अवलंबन करितो, त्यांस तूं योग्य कर्मास प्रवृत्त करितोस. शूरांनीच मिळविण्यास योग्य अशा संपत्तीविषयी युद्ध चालले असता तूं अनेक शत्रूंना थोड्याच लोकाचे हातून मारवितोस. ६

हे अग्निदेवा, त्या मनुष्याची रोजचे रोज कीर्ति वाढवीत तू त्यास उत्तम अविनाशी पदावर चढवितोस विद्वान् भक्ताकरिता तुझे अंतःकरण अतिशय उत्कंठित होऊन तूं त्यास दोन्ही जन्मास पुरेल इतकी समृद्धि व सौख्ये अर्पण करितोस. ७

---

१ अरेजेतां ॥

२ अवाशयः ॥

३ श्रवाय्यः ॥

४ शूरसाता ॥

५ तातृषाणः ॥

हे अग्निदेवा, आम्ही धनप्राप्तीकारितां तुझें स्तवन करीत असल्यामुळें आम्हांस श्रेयस्कर अशी कीर्ति अर्पण कर. नवीन कृति आचरून आम्ही तुझे यजनकर्म साग करू. हे द्यावा-पृथिवीनो सर्व देवासह आमचें संरक्षण करा. ८

हे निष्कलक अग्निदेवा, सर्व देवांत तूं श्रेष्ठ देव आहेस. तुझा निवास अगदी मातापितराच्या सन्निध असतो. तूं आमचेकरिता जागृत रहा. सर्वांची शरीरे निर्माण करणारा जो तू तो आपली भक्ति करणाऱ्या सबधाने मनांत अतिशय प्रेम बाळग व जागरूक रहा. तूं प्रत्यक्ष कल्याणच आहेस; तू सर्व प्रकारचे द्रव्य सर्वत्र पेरून ठेवीत असतोस. ९

हे अग्निदेवा, तुझे अतःकरण अत्यत दयाशील आहे. तूं आमचा पिता आहेस. आम्ही तुझे आप्त आहोत. हे अजिक्य देवा, शेकडो किंबहुना हजारो सुखानी परिपूर्ण अशी सपत्ति तुझ्याकडे आपोआप चालून येते. तू अतिशय शूर व आपल्या आज्ञाचे परिपालन करविणारा आहेस. १० (३३)

हे अग्निदेवा, सर्व जगताचे आयुष्य तुजवर अवलबून आहे. सर्वांचें आयुष्यवर्धन होण्या-करितांच देवांनीं तुला प्रथम उत्पन्न करून नहुषाचा सेनापति केले. त्याचप्रमाणे ज्या वेळीं माझ्या पित्यास पुत्रप्राप्ति झाली, त्यावेळी मनुष्यमात्रास सज्ञान करणारी इळाही तू उत्पन्न केलीस. ११

हे वदनीय अग्निदेवा, तू आपल्या सर्वसरक्षक अशा शक्तींच्या योगानें आमचे व आम-च्यावर उपकार करणारांचे प्रतिपालन कर. आपल्या नियमास अनुसरून एक निमिषही न विसंबतां तूं जगाचे रक्षण करितोस. आमचे हे कौटुंबिक वैभव परपरेने असेच स्थिर राह-ण्याकरितां तू आमच्या मुलाबाळाचा व गाईवासरांचाही सभाळ करीत असतोस. १२

---

१ सनये ॥
२ ओपिष ॥
३ अदाभ्य ॥
४ विश्पतिं ॥
५ पायुभिः ॥

हे अग्निदेवा याग करणाऱ्या भक्ताचा तूं अगदी अंतरंगांतील साहाय्यकर्ता आहेस, आणि, हे चार नेत्रांनी विभूषित असलेल्या देवा, जो कोणी कधीही दुसऱ्यावर शस्त्र उचलीत नाही त्याचेकरितां तू प्रेमाने उद्दीपित होतोस. तू सर्वांचें पोषण करितोस, तुझ्या हातून कोणाचाही नाश होत नाही. जो स्तुतिकर्ता तुला हवि अर्पण करितो तो कितीही गरीब असो त्याने केलेल्या स्तुतीचा तू मनःपूर्वक स्वीकार करितोस. १३

हे अग्निदेवा, जो उपासक तुझे अतिशय स्तवन करितो त्याचेकरिता तू सर्व वैभवांत जें अत्यंत स्पृहणीय वैभव असेल ते सिद्ध करून ठेवितोस. तुझा भक्त स्वतःचे पोषण करण्यासही जरी सर्व तऱ्हेने असमर्थ असला तरी तू अतिशय प्रेमाने त्याचा सांभाळ करणारा पिताच होतोस असे सर्व लोक बोलतात. तुझे ज्ञान तर अलौकिकच आहे तथापि तूं इतका लडिवाळ आहेस कीं लहान अर्भकास तू दिशा आणि उपदिशा ह्या शिकवीत बसतोस १४

ज्याप्रमाणे उत्तम तऱ्हेनें मावलेलें चिलखत शूराचे रक्षण करिते त्याप्रमाणे पवित्र[3] आणि सदाचारी पुरुषाचे तूं सर्व तऱ्हेने परिपालन करितोस. स्वादिष्ट अन्न तयार करून जो आपल्या घरी ( अतिथींस ) संतुष्ट करितो व अशा रीतीने प्राणिमात्रांच्याकरितां जणू काही जो अनुष्ठानच करितो, त्यास श्रेष्ठपणात स्वर्गाचीही उपमा दिली तरी ती शोभते. १५ ( ३४ )

हे अग्निदेवा, ज्या कुमार्गाने आह्मी दूरपर्यंत गेलो होतो, त्या बद्दल—त्या पातकाबद्दल तू क्षमा कर. आमचा आप्त, आमचा पिता, सोमरस अर्पण करणाऱ्या भक्ताचा हितकर्ता, सर्वांचे पोषण करणारा, व अज्ञ मानवास श्रेष्ठ अशा ऋषीचे पदवीस चढविणारा आहेस. १६

**मनू**कडे, **अंगिरसा**कडे, व **ययाती**कडे ज्याप्रमाणे तू पूर्वी जात होतास त्याप्रमाणे, हे पवित्र अग्निदेवा, हे अंगिरसा, तू आमच्या सदनाकडे ये, आणि दिव्य लोकांतील सर्व मंडळीस बरोबर आण. त्यास असनावर बसव व त्यांच्या आवडीचा हवि त्यांस अर्पण कर. १७

---

१ यज्यवे ॥
२ स्पार्ह ॥
३ प्रयतदक्षिणं ॥
४ शरणि ॥
५ दैव्यं जनं ॥

हे अग्निदेवा, जे हे स्तोत्र आम्ही आपले सामर्थ्य व बुद्धि उपयोगात आणून केलेले आहे त्याच्या योगाने तू आनंदित हो, व आम्हास शक्ति व उत्तम बुद्धिमता याची जोड करून दे. आम्हांस अत्यंत स्पृहणीय अशा वैभवाकडे नेणारा तूंच आहेस. १८ (३९)

## सूक्त ३२.

ऋषि-हिरण्यस्तूप आङ्गिरस । देवता-इंद्र ॥

वज्रधारी इंद्राचे पराक्रम मी येथे आवडीने गाइलेले आहेत. अखिल पराक्रमाच्या कृत्यांत ह्यानाच प्रथम स्थल द्यावे लागेल. ह्या इंद्रदेवाने **अहि**चा वध केला, उदकास वाट फोडून दिली व पर्वताची हृदये विदारण केली. १

**त्वष्टा** देवाने त्यास वज्र तयार करून दिले होते. (ते घेऊन) त्याने पर्वतात दबा धरून बसलेल्या **अही**चा वध केला. (त्याबरोबर) व वत्सासाठी धेनु हंबरतात त्याप्रमाणे मोठा आवाज करीत पाण्याचे लोटच्या लोट वाहू लागले व मोठ्या वेगाने समुद्रास जाऊन मिळाले. २

शौर्याच्या भरात आल्यावर इंद्रास सोमाची इच्छा झाली व त्याचे त्याने तीन यज्ञांत प्राशन केले. त्या उदार इंद्रदेवाने वज्र हे आपले आयुध केले व सर्व **अहीं**तील ज्येष्ठ **अहि** जो **वृत्र** त्याचा वध केला. ३

ज्यावेळी हे इंद्रा सर्व **अहीं**तील ज्येष्ठ **अही**चा तू वध केलास व कपटकर्मांत प्रवीण असलेल्या रिपूच्या कपटव्यूहाचा विध्वंस केलास त्यावेळी सूर्य, उषा व द्युलोक ह्यांना जन्म प्राप्त झाला व तुझा हात धरील असा कोणीही शत्रु तुला उरला नाही. ४

---

१ अभि-वस्यः ॥
२ वक्षणाः ॥
३ वाश्राः ॥
४ प्रथमजाम् ॥
५ मायिनाम् ॥

**अही** हा नावाचा वृत्र ह्मणजे क्रूर खरा, परंतु वास्तविक पहातां त्याचा क्रूरपणा त्याच्या नांवापेक्षाही जास्त होता. पण इंद्रानें आपल्या अत्यंत उग्र वज्रानें त्याचे बाहु छेदून त्यास मारून टाकले. ज्याप्रमाणे कुऱ्हाडीने एखाद्या वृक्षाच्या फांद्या छेदून टाकाव्या त्याप्रमाणे छिन्न विच्छिन्न होऊन **अहि** पृथ्वीवर मृत होऊन पडला. ५ (३६)

आपल्यास कोणीच प्रतिस्पर्धी नाहीं अशा भलत्या अभिमानास पेटून **अहीने** महापराक्रमी, अजिंक्य, व अनेक शत्रूनाही भारी, अशा इंद्रास आह्वान केले. परंतु त्याच्या अत्यंत उग्र शस्त्राच्या पुढे त्यास टिकाव धरता आला नाही. पण इंद्राचे शत्रुत्व त्याचे अंगी इतके बाणलें होते कीं त्याने मोठमोठ्या दुर्गांचाही अगदी चुराडा करून टाकला. ६

हात आणि पाय तुटून गेले तरी **अहीनें** इंद्राशी युद्ध चालविलेच. इंद्राने आपले वज्र त्याच्या पर्वतप्राय बाहूवर मारले. निःसत्व झाल्यावरही पराक्रमी पुरुषाची ऐट मिरविणारा **अहि** अस्ताव्यस्त होऊन त्याचे धूडच्या धूड जमीनीवर पडलें. ७

जमीनीवर पसरलेल्या एखाद्या महानदाप्रमाणे **वृत्र** हा पृथ्वीवर पडला असता जलांचे प्रवाहांस धैर्य चढून ते त्याचे अंगावरून वाहू लागले. आपल्या सामर्थ्याने ज्या उदकास **वृत्राने** कोंडून ठेविले होते त्यांच्याच पायांशीं तो गतप्राण होऊन पडला. ८

**वृत्राची** माता त्याचे देहावर आडवी पडली. **इंद्राने** आपले उग्र वज्र तिचे पोटाखालून फेकले. ह्याप्रमाणे माता वर पडलेली व तिचे खालीं तिचा पुत्र **वृत्र** पडलेला अशा स्थितीत धेनु जशी आपल्या वासरास पोटा खाली घेते तशीच ती **दानु** दिसूं लागली. ९

---

१ व्यंसम् ॥

२ तुविबाधम् ॥

३ वृष्ण ॥

४ पत्सुतःशी ॥

५ नीचावया ॥

ज्यांस कधी खळ नाहीं व ज्यांस कधी विश्रांति नाहीं अशा जलप्रवाहांत वृत्राचें शरीर निमग्न होऊन गेले होते. वृत्राच्या शरीरावर जलाचे प्रवाह खुशाल वहात होते व इंद्रशत्रु **वृत्र** दीर्घ अंधकारांत जाऊन पडला होता. १० ( ३७ )

**अहीनें** प्रतिबंधांत ठेवलेलीं व ह्मणून त्या दुष्टाची दास बनलेलीं जीं जले तीं **पणीनें** प्रतिबधांत टाकलेल्या धेनूंप्रमाणे बंदिवान् होऊन गेली होतीं. उदकांचें निर्गमस्थान जें पूर्वी बंद झालें होतें ते **वृत्रास** मारून इंद्राने उघडें केलें. ११

हे इंद्रा, तूंच एकटा श्रेष्ठ देव आहेस. ज्यावेळीं तुझ्या आयुधावर त्या **अहीनें** प्रहार केला त्यावेळीं अश्वाकरिता तयार केलेल्या चिलखताप्रमाणे तूं त्यास दाद दिली नाहींस. तूं धेनूंची प्राप्ति करून घेतलीस, हे शूरा, तू सोमरसाचाही लाभ करून घेतलास व सप्त नद्याचा प्रवाह चालू करण्याकरिता त्यांस तू बधमुक्त केलेंस. १२

विद्युत्प्रयोग अथवा गर्जना ही दोन्ही **वृत्रास** कांहींच उपयोगीं पडलीं नाहीत. त्याचप्रमाणे त्याने जी पर्जन्यवृष्टि केली व ज्या अशनि फेकल्या त्यांचाही त्यास उपयोग झाला नाहीं. ज्यावेळी **इंद्र** व **अहि** ह्यांचे युद्ध झाले त्यावेळी त्या दानशूर इन्द्रानें चिरकालिक विजय संपादन केला. १३

हे इन्द्रा, ज्याअर्थी वृत्रास मारल्यानतर तुझ्या हृदयांत भीतीनें प्रवेश केला त्याअर्थी वृत्रवधाबद्दल सूड उगवणारा असा कोण तुझ्या दृष्टीस पडला ? कारण भयचकित झालेला एखादा श्येनपक्षी ज्याप्रमाणें ( भराभर ) अंतरिक्षाचे पार उडून जातो त्याप्रमाणे तूं ( त्वरेने ) नव्याण्णव नद्या ओलांडित पैलीकडे गेलास. १४

---

१ निण्यम् ॥
२ बिलम् ॥
३ सर्तवे ॥
४ मिहम ॥
५ अतरः ॥

सर्व चर व अचर सृष्टीचा इन्द्र मालक आहे. जे प्राणी शृंगयुक्त आहेत व जे निरुपद्रवी आहेत त्या दोहोंवरही त्याची सत्ता आहे. त्याचे बाहु वज्राप्रमाणे आहेत; सर्व मानवांचा तोच राजा आहे. ज्याप्रमाणें रथचक्राची धाव चाकाच्या आऱ्यांना वेढून टाकते त्याप्रमाणें इन्द्रानें हें सर्व वेष्टून टाकले आहे. १५ ( ३८ )

॥ दुसरा अध्याय समाप्त ॥

---

# तिसरा अध्याय.

---

## सूक्त ३३.

ऋषि-हिरण्यस्तूप आंगिरस । देवता-इंद्र ॥

या, गोधनाची इच्छा धरून आपण इंद्राकडे जाऊ या. आपल्या बुद्धिमत्तेचा तोच अतिशय वर्धन करीत असतो. तो अमर आहे. वैभव–गोधन–प्राप्त करून घेण्याचे मुख्य साधन तो आह्मांस दाखवून देईल काय ? १

---

१ चर्षणीनाम् ॥

२ गव्यन्तः ॥

ज्याप्रमाणें श्येनपक्षी आपल्या नेहमींच्या राहण्याच्या ठिकाणाकडे उडून जातो त्याप्रमाणें मी इन्द्राकडे त्यास उत्तमोत्तम स्तोत्रांनी वंदन करीत मार्गानें गमन केलें. हा इंद्र संपत्ति[1] देणारा, शत्रूंस अजिंक्य व भक्तांनीं अर्चन करण्यास योग्य असा आहे. २

आपले सर्व सैन्य बरोबर घेऊन ह्याने बाणाचे भाते ( पाठीशीं ) बांधले आहेत. हा फार श्रेष्ठ आहे. त्याची इच्छा असेल त्याचेकडे तो त्यास देण्याकरिता गाई घेऊन जातो. हे अत्यत थोर इंद्रा, अनेक प्रकारची उत्कृष्ट संपत्ति घेऊन ये व आमचेविषयी कृपणता धारण करूं नको. ३

हे इंद्रा, जरी तू आपल्या अनुचरासह निघाला होतास तथापि आपल्या वणासारख्या शस्त्रानें तू संपत्तिमान् अशा **दस्यूचा** एकट्यानेंच वध केलास. ते सर्व बाजूंनी तुझ्या धनुष्यावर एकदम तुटून पडले, परंतु त्या **सनकांचा** मात्र नाश झाला. तुझे यजन करणे त्यांस कधी माहितच नव्हते. ४

हे उग्र इंद्रा तुझे स्थैर्य वाखाणण्याजोगे आहे व तुझे अश्व पीतवर्णाचे आहेत. ज्यावेळीं तुझ्या आज्ञा न जुमानणाऱ्या दुष्टांस तूं अतरिक्षांतून, पृथिवींतून व स्वर्गांतून हांकून लाविलेस, त्यावेळीं त्यांनी आपलीं मस्तकें ( लज्जेने ) पाठीमागे फिरविली. स्वतः तुझे यजन कधीही करीत नसून यजन करणाऱ्या लोकांबरोबरमात्र त्यांनीं स्पर्धा चालविली होती. ५ ( १ )

सर्वतोपरि दोषरहित असा जो इन्द्र त्याच्या सेनेबरोबर त्यांनी युद्ध माडलें. **नवग्वांनी** उभे राहून इद्रास उत्तेजन दिलें. सामर्थ्यवान् पुरुषांशी झगडणाऱ्या निर्बल लोकांची जशी दाणादाण होते त्याप्रमाणे त्याची स्थिति होतांच इद्राच्या शक्तीची चागली ओळख पडून ते ( सांपडेल त्या ) मार्गांनीं पळत गेले. ६

---

१ **धनदाम्** ॥
२ **समर्यः** ॥
३ **विषुणक्** ॥
४ **हरिवः** ॥
५ **अनवद्यस्य**

ते हंसले किंवा रडले तरी त्याची बिल्कूल परवा न करितां, हे इंद्रा, तू त्यांच्याशीं युद्ध करून त्यांस रजोलोकाच्या पार घालून दिलेंस. दस्यु उच्च अशा द्युलोकांत असतां तूं त्यास दग्ध केलेंस व ज्याने तुझ्याकरितां सोमरस तयार करून तुझें स्तवन केलें त्याच्या स्तोत्राचा तू स्वीकार केलास. ७

सुवर्णालंकारांनीं नटून त्यांनीं सर्व पृथ्वीचें परिवेष्टन केलें. त्यानी आपलें सामर्थ्य कितीही प्रकट केले तरी इंद्राचा पराभव त्यांना करतां आला नाही. त्यांच्या दूतांस इंद्राने सूर्याकडून हतवीर्य केले. ८

हे इंद्रा, ज्यावेळी आपल्या सामर्थ्याने तू पृथिवी व स्वर्ग ह्यावर सर्व प्रकारे स्वसत्ता प्रस्थापित केलीस त्यावेळीं आपल्या भक्तांचे हातून तुझा उपमर्द करणाऱ्यांचा तू पराभव करविलास व आपल्या तीव्र शस्त्रांनीं दस्यूस पराजित केलेस. ९

स्वर्ग आणि पृथिवी ह्यांचा अंत लावणाऱ्याससुद्धां धनदात्या इंद्राला आपल्या कपटजालांनीं वेढा देता आला नाही. सामर्थ्यवान् इंद्राने आपल्या वज्रासच आपले मदतगार बनविले व आपल्या तेजाच्या योगाने धेनूंस अंधकारांतून बाहेर काढले. १०(२)

इंद्रानें जी वाट फोडून दिली त्या वाटेने जलाचे प्रवाह वाहू लागले. परंतु जेथे नौकासुद्धां चालू शकतात अशा महानद्यांत शिरून वृत्राने विशाल रूप धारण केलें. मग इंद्रानें आपले सर्व लक्ष्य वृत्राच्या वधाकडेच देऊन आपल्या प्रबल शस्त्राने त्यास कायमचे जमीनदोस्त केले. ११

---

१ अदह ॥

२ स्पश ॥

३ महिना ॥

४ वृषभः ॥

५ घून ॥

**इलीबिशा**चे दुर्गम किल्ले तूं फोडून टाकलेस व शृंगयुक्त अशा **शुष्णा**चे तूं विदारण केलेस. जितका वेग व जितके सामर्थ्य तुझे अंगीं होते त्या सर्वांचा उपयोग करून तुझ्यांशीं युद्ध[1] करणाऱ्या शत्रूचा तूं आपल्या वज्रानें वध केलास. १२

त्याचें साहाय्यकारी वज्र त्याच्या शत्रूवर नेम धरून निघाले. आपल्या तीव्र शस्त्राने त्याने शत्रूंचीं पुरें फोडून टाकिलीं. इंद्राने आपल्या वज्राशीं वृत्राची गांठ घालून दिली व त्याचा संहार करून आपल्या मनाचा हौंस फेडून घेतली. १३

ज्या कुत्सावर हे इंद्रा, तुझे अत्यंत प्रेम होतें त्याचे तूं संरक्षण केलेस व वीर्यशाली **दशद्यु** युद्धांत गुतला असतांना तूं त्याच्या साहाय्यार्थ धांवलास. घोड्याच्या खुरांनीं उडालेली धूळ आकाशापर्यंत वर गेली, **श्वैत्रेय**ही पुन्हां लोकांनीं त्याची सत्ता सहन करावी अशा योग्यतेस चढला. १४

**तुग्र्यां**च्या समुदायात तू त्याच्या शांत स्वभावाच्या वृषभाचे रक्षण केलेस व भूमि सपादनाच्या ईर्ष्येनें युद्ध चाललें असतां, हे उदार इंद्रा, तू त्याच्या धेनूचा सांभाळ केलास. येथे अनेक कालपर्यंत ठाणे देऊन ज्यानी शत्रुत्व आचरिले त्या आपल्या रिपूंस तू अत्यंत अमंगल वेदना सोसावयास लाविल्यास. १५ ( ३ )

---

१ पृतन्युम ॥

२ शाशदानः ॥

३ वृषभम् ॥

४ ज्योक ॥

# सूक्त ३४.

ऋषि–हिरण्यस्तूप आंगिरस । देवता–अश्वि ॥

हे सर्वज्ञ अश्विनहो, तुह्मी आज तीन्ही वेळा आमचेच व्हा. आपली गति सर्वत्र आहे आपली दानशूरताही चोहोकडे अनुभवास येणारी आहे. ज्याप्रमाणें वस्त्राचा व हिंवाळया त्रीचा अत्यंत निकट संबंध असतो त्याप्रमाणे आपण दोघेही एकमेकांशी असेच संलग्न ाहांत. सुज्ञ भक्तास आपण वश व्हा. १

मधुर रसांची प्राप्ति करून देणाऱ्या आपल्या रथास तीन धावा आहेत व तो सोमाच्या ार्गानें गमन करतो हे सर्वांस विदितच आहे. त्या रथाचा तोल बिघडू नये ह्मणून त्यावर ीन स्तंभ उभे केलेले आहेत. हे अश्विनहो, आपण रात्रौ त्रिवार व दिवसा त्रिवार रिभ्रमण करिता. २

एकाच दिवसात तीन वेळां आपण ( भक्ताची ) पातके नाहींशी करितां. आज तीनदा ामच्या यज्ञावर आपण माधुर्याची वृष्टि करा. हे अश्विन हो, ज्यांच्या योगाने सामर्थ्याची ाप्ति होईल अशा प्रकारच्या कृपाप्रसादाची रेलचेल ( रोज ) सुप्रभाती व सध्याकाळचे ेळस आह्मांवर करीत जा. ३

तीन वेळां तुह्मी आपल्या निवासस्थानाकडे जा. तीन वेळां तुह्मी आपल्या आज्ञाचे परि- ालन करणाऱ्या भक्ताकडे गमन करा. रक्षण करण्यास जे अतिशय योग्य आहेत अशा नुष्यांस तीन वेळा जणू कांही तीन प्रकारचे शिक्षण लाभेल असे करा. हे अश्विनहो, ामच्या मनांस आनंद होईल असे वैभव तीनदा आह्मास अर्पण करा आणि आमच्या ोषणांची अशी उत्तम तजवीज करा की ' हे आमचे सदोदितचे भाग्य ' असे ोकानी ह्मणावें. ४

१ **विभुः** ॥
२ **पवयः** ॥
३ **अवव्यगोहना** ॥
४ **पृक्ष** ॥

हे अश्विनहो, आमचेकडे तीन वेळ संपत्ति घेऊन या; देवांचे तीन वेळा यजन चाललें असता तीन वेळा आमच्या सद्विचारास, सुदैवास व सत्कीर्तीस भरती आणा. ( आकाशाच्या ) दुहितेनें तुझ्या त्रिचक्री[1] रथावर स्वर्गांत आरोहण केले होते. ५

हे अश्विन हो, स्वर्गांतील, पृथिवीवरील व उदकापासून प्राप्त करून घेतलेलीं अशी तिन्ही प्रकारची औषधे तीन तीन वेळ आह्मास द्या. हितावह संपत्तिचे आपण अधिपति[2] आहात, व मला कल्याणाची इच्छा आहे ह्मणून माझे पुत्रास आपण तिन्ही महाभूतांपासून निर्भयता व आपली कृपादृष्टि ह्याची जोड करून द्या. ६ ( ४ )

हे अश्विनहो, आपले यजन प्रत्येक दिवशी तीन वेळ करणे युक्त आहे. तिन्ही महाभूतांना[3] बरोबर घेऊन आपण पृथिवीचे सभोवती विश्रान्ति घेतलेली आहे. हे सत्यस्वरूप अश्विन हो, आपण अतिशय दूर प्रदेशापासून रथांत बसून या, व ज्याप्रमाणे प्राणवायु शरीरांत प्रवेश करतो त्याप्रमाणे आपल्या तीन ( निवासस्थानांकडे ) गमन करा. ७

हे अश्विनहो, सप्त जननीप्रमाणे शोभणाऱ्या ज्या ( सप्त ) नद्या त्यासहवर्तमान इकडे या. येथे तीन यज्ञपात्रे सिद्ध[4] आहेत व तीन प्रकारचा हवि तयार करून ठेविला आहे. पृथिवीचे प्रदेश तीन आहेत. आपण स्वर्गाचे वरती परिभ्रमण करून स्थिर अशा अंतरिक्षाचे रात्रदिवस रक्षण करीत असता. ८

तुझ्या त्रिकोणाकृति रथाची तीन चक्रे कोठे आहेत ? ज्याच्यावर रथ चालविणाऱ्या-करितां बसण्यासाठी उत्तम जागा केलेली अशा तुमच्या रथाच्या वधुरा[5] कोठे आहेत ? हे सत्यस्वरूप अश्विन हो, ज्यावर आरोहण करून तुह्मी यज्ञाप्रत आगमन करितां, अशा शक्तिवान् रासभास तुह्मी केव्हां जोडणार आहा ? ९

---

१ त्रिवृत् ॥

२ शुभस्पती ॥

३ त्रिधातुः ॥

४ आहावा ॥

५ वंधुरा ह्मणजे जोखडाला लागून ज्या तीन उभ्या दाड्या असतात त्या ।

हे सत्यस्वरूप अश्विनहो, इकडे या. हा हवि आपणांस अर्पण करण्यांत येत आहे. आपल्या मुखास मधुपान करण्याची चटकच आहे, तेव्हां आपण मधुर सोमरसाचे स्वमुखाने प्राशन करा. आपला अवर्णनीय व घृतसमृद्ध रथ **सविता**देव **उषे**च्याही अगोदर आमच्या यज्ञाकडे पाठवून देत आहे. १०

हे सत्यस्वरूप अश्विन हो, तेहतीस देवांसहवर्तमान ह्या मधुर पेयाकडे या. आमच्या आयुष्याची वृद्धि करा, पातकांचे क्षालन करा, आमच्या शत्रूंचा निरोध करा व आम्हांस नेहमीं आपल्या सहवासाचा लाभ होऊं द्या. ११

हे अश्विनहो, आपल्या त्रिकोणाकृति रथातून वीर्यवान् संततीने युक्त अशी संपत्ति आमचेकडे घेऊन या. आपण आमची प्रार्थना ऐकण्यास सिद्धच आहांत, ह्मणून आपणांस स्वरक्षणासाठी पुनःपुन्हां हांक मारतो. जेव्हा पराक्रमाच्या योगाने संपत्ति प्राप्त होण्याचा संभव असेल तेव्हां आमच्या वैभवांत भर पडेल असे करा. १२ ( ६ )

## सूक्त ३५.

ऋषि–हिरण्यस्तूप आङ्गिरस । देवता १ अग्नि, मित्र, वरुण, रात्रि, आणि सविता । २–११ सविता ॥

आमच्या कल्याणार्थ प्रथम **अग्नीस** पाचारण करितो. आमच्या रक्षणार्थ **मित्रावरुणास**ही मी येथें बोलावितों. सर्व जगतास आपापल्या स्थानाप्रत घेऊन जाणाऱ्या **रात्रिस** मी आमंत्रण करितों. आमचें प्रतिपालन करण्याकरिता मी **सविता**देवासही हाक मारितो. १

---

१ आसभिः ॥

२ तारिष्टम् ॥

३ शृण्वन्ता ॥

४ निवेशनीम् ॥

कृष्णवर्ण आकाशांतून मार्ग आक्रमण करीत व अमर्त्य व मर्त्य ह्या सर्वांस आपापल्या उद्योगांत प्रवृत्त करीत सर्व भुवनाचें अवलोकन करणारा सवितादेव आपल्या सुवर्णमय रथांत बसून येतो. २

उंच व पुरोगामी मार्गानें सवितादेव गमन करितो तो यजनीय आहे, तो आपल्या शुभ्र अश्वांवर आरोहण करून जात असतो. सर्व दुरिताचा नाश करीत सवितादेव फार दूर प्रदेशांतून इकडे येतो. ३

सवितादेव आपणास पूज्य आहे. त्याचे किरण चित्रविचित्र रंगाचे आहेत कृष्णवर्ण अंधकार नाहींसा करण्याचे त्याचे अंगांत सामर्थ्य आहे. तो पहा आपल्या सुवर्णभूषित रथांत बसला ह्या रथाची शिवांळ सुद्धां सुवर्णाची केलेली आहे. रथाचे जितके म्हणून निरानिराळे आकार आहेत तितके सर्व ह्या रथाचे ठिकाणीं आढळून येतात. ४

ज्याचें जूं सुवर्णाचें आहे, अशा रथास वोढून नेणारे सवितादेवाचे अश्व—ज्यांचीं पावलें पांढरीं शुभ्र आहेत—त्यांनीं सर्व लोकांवर स्वच्छ प्रकाश पाडला आहे. सर्व लोक व मनुष्यें- हीं सवितादेवाच्या समीपच निरंतर वास करीत असतात. ५

एकंदर द्युलोक तीन आहेत. त्यांपैकीं दोन सवितादेवाच्या संनिध असतात व एकाचें स्थान यमाच्या प्रदेशांत आहे. सर्व अमर विश्व चाकाच्या कुणीप्रमाणें सवितादेवावर अवलंबून आहे. ज्यास ह्या गोष्टीचें ज्ञान असेल त्यास बोलण्यास पुढें येऊं द्या. ६ ( ६ )

---

१ रजसा ॥
२ परावतः ॥
३ तविषीए ॥
४ अख्यन् ॥
५ चिकेतत् ॥

ज्याची गति फार सुंदर आहे, ज्याच्या प्रयाणपद्धतींत फार गंभीरपणा आहे, जो ( शत्रूंचा ) संहारकर्ता आहे व ज्याचे अंगीं उत्तम मार्गदर्शकत्व आहे—अशा त्या सविता-देवानें सर्व अंतरिक्षावर प्रकाश पाडला आहे. ह्यावेळीं सूर्य कोठें असेल बरें? त्याच्या रश्मींनें कोणत्या द्युलोकापर्यंत मजल मारली आहे हें कोणास माहीत असेल? ७

पृथ्वीच्या आठही दिशा, तिन्ही निर्जल प्रदेश व सातही नद्या ह्यांस त्यानें सुप्रकाशित केलें आहे. ज्याचे नेत्र सुवर्णाप्रमाणें चमकदार आहे असा हा सवितादेव आपल्या उपास-कासाठीं उत्तमोत्तम रत्नें बरोबर घेऊन अगदीं येऊन ठेपला आहे. ८

दूरवरपर्यंत संचार करणारा व कांचनाप्रमाणें सुंदर वर्णाच्या हस्तांनीं सुशोभित असा सविता स्वर्ग व पृथिवी ह्या दोहोंमधून आपला मार्ग आक्रमण करीत असतो. तो रोगांचे निर्मूलन करितो, सूर्याकडे गमन करितो व कृष्णवर्ण अंतरिक्षांतून द्युलोकांपर्यंत जाऊन पोहोंचतो. ९

ज्याचे हस्त सुवर्णाप्रमाणे सुंदर आहेत जो शत्रूंचा नाश करणारा आहे, जो उत्तम मार्गदर्शक आहे, ज्याच्या कृपेनें सर्व सुखें प्राप्त होतात, व जो स्वकीयांचा अभिमान धारण करणारा आहे तो सविता आमचेकडे येवो. प्रत्येक सायंकाळीं ज्याची कीर्ति गाइली जाते तो सवितादेव राक्षस व यातुधान ह्यांचा संहार करीत येथें येण्यास सिद्ध झाला आहे. १०

हे सवितादेवा, जे अंतरिक्षांतील प्राचीनें मार्ग त्यांतील धूळ वगैरे काढून चांगले करून ठेवले आहेत त्या सुगममार्गांनीं आज ( येथे येऊन ) आमचें रक्षण कर व आम्हांस आशीर्वचन दे. ११ ( ७ )

---

१ सुनीथः ॥
२ दाशुषे ॥
३ अमीवाम् ॥
४ सुमृळीकः ॥
५ पूर्व्यासः ॥

## अनुवाक ८.

### सूक्त ३६.

ऋषि-घौर । देवता-अग्नि ॥

देवाच्या दर्शनाची उत्कंठा बाळगणारे तुमच्यासारखे जे अनेक लोक आहेत, त्यांचा अभिमान बाळगणारा जो अग्निदेव त्यास सौन्दर्यपरिप्लुत स्तोत्रांनी मी आळवीत आहें. इतर मनुष्येंसुद्धां ह्याचेंच स्तवन करीत असतात. १

सामर्थ्याची वृद्धि करणाऱ्या अग्नीची लोकांनी संस्थापना केली आहे. त्यास हवि अर्पण करून आम्हींही त्याला प्रकट व्हावयास लावू. हे अत्युदार अग्निदेवा, पराक्रमाच्या कृत्यांत आमचा तूं ह्या ठिकाणीं प्रसन्न अन्तःकरणानें संरक्षणकर्ता हो. २

सर्व देवांस त्याचे हवि पोहोंचविणारा आणि अखिलज्ञानसंपूर्ण असा जो तूं त्या तुला आम्ही आपला प्रतिनिधी निवडतों. तूं मोठा आहेस. तुझी दीप्ति सर्वत्र संचार करते व तुझे प्रकाशरश्मि स्वर्गलोकास जाऊन भिडतात. ३

तूं ( देवांचा ) अतिशय पुरातन प्रतिनिधी आहेस. वरुण, मित्र, व आर्यमा हे सर्व तुला प्रज्वलित करीत असतात. हे अग्निदेवा, जो मानव तुला धन अर्पण करितो तो तुझ्या साहाय्यानें सर्व विश्वावर विजय मिळवतो. ४

---

१ यह्वम् ॥

२ सहोवृधम् ॥

३ प्र-वृतम ॥

४ ददाश ॥

हे अग्निदेवा, तूं आमचे हवि आनंदानें देवांप्रत पोहोंचविणारा असून गृहांचा स्वामी व सर्व लोकांचा प्रतिनिधी आहेस. देवांनीं जे जे सनातन नियम केले ते सर्व तुझेठायीं एकत्र झालेले आहेत. ५ ( ८ )

हे अत्यंत तरुण अग्निदेवा, तूं उत्तम भाग्यानें युक्त आहेस. तुझ्याठिकाणीं सर्व हवि अर्पण करण्यात येतात. यास्तव आज आणि इतःपर सुद्धा आह्मास अतिशय सामर्थ्याचा लाभ करवून प्रसन्न अन्तःकरणाने आमचा यज्ञ देवांस प्राप्त होईल असें कर. ६

भक्तिनम्र उपासक स्वतःच्या तेजानें देदीप्यमान अशा अग्नीचें अर्चन करितात. शत्रूंच्यावर ज्यांनीं जय मिळविलेला आहे असे पुरुष हवि अर्पण करून अग्नीस प्रदीप्त करितात. ७

आपल्या शत्रूचा नाश करून त्या संकटांतून ते पार पडले. स्वर्ग, पृथ्वी आणि जलप्रवाह ह्यांना आपलें निवासस्थान बनविण्याकरिता त्यांनीं त्याचा विस्तार केला. ह्या सामर्थ्यवान् अग्नीचा धावा केला असतां तो कण्वास संपत्तिदायक होवो आणि गोधनादि वैभवाविषयीं आह्मांस इच्छा उत्पन्न झाली असतां ( गाईचाच शब्द काय ) अश्वाचेंही खिंकाळणें ऐकूं येवो. ८

हे अग्निदेवा, तूं श्रेष्ठ आहेस. तूं आपल्या आसनावर विराजमान हो. देवसमुदायाकडे तुझें सदोदित आगमन असते. तुझें तेज प्रकट होऊं दे. तूं यज्ञार्ह आहेस व तुझें स्तवन अतिशय होत असते. तूं आपला शीघ्रसंचारी व रमणीय आकार धारण करणारा धुराचा लोट सोडून दे. ९

सर्व देवांना हवि पोहोंचविणाऱ्या हे अग्ने, तू अतिशय पवित्र आहेस. मनूकरितां देवांनीं ज्या तुझी येथें स्थापना केली, ज्या तुला **कण्व, मेध्यातिथी, वृषा** आणि **उपस्तुत** ह्यांनीं तुला आपलें औदार्य प्रकट करण्याची स्फूर्ति उत्पन्न केली, १० ( ९ )

---

१ मन्द्रः ॥
२ सुवीर्या ॥
३ स्वराजम् ॥
४ गाविष्टिषु ॥
५ वेषवीतमः ॥
६ धनस्पृतम् ॥

ज्यास **मेध्यातिथी** आणि **कण्व** हे नियमापेक्षांसुद्धां अधिक उज्ज्वलितें करितात, अशा त्या अग्नीच्या ज्वालांनी आपले धगधगीत तेज प्रकट केलें आहे. त्याच अग्नीची महती हीं स्तोत्रें वर्णन करीत आहेत. त्याच अग्नीची आह्मीही स्तुति करितों. ११

हे हवींनीं शोभणाऱ्या अग्निदेवा, तूं आमच्या वैभवास पूर्तता आण. खरोखर तुझा देवांशीं अतिशय निकट संबंध आहे. जे सामर्थ्य कीर्ति होण्यासही योग्य आहे, त्याचा स्वामी तूंच आहेस. तूं श्रेष्ठ आहेस. तू आह्मांस सौख्य अर्पण कर. १२

सवितादेवाप्रमाणें आमच्या संरक्षणार्थ तूं सज्ज होऊन उभा रहा. ज्याअर्थी अंजली जोडून तुझे स्तवन करणाऱ्या भक्तासहवर्तमान आह्मी तुला हांक मारीत आहो त्याअर्थी तूं उठून उभा राहून आह्मास सामर्थ्याचा लाभ करून दे. १३

आमच्याकरिता खडा होऊन आमचे पातकापासून रक्षण कर आणि आपल्या ज्वलन-शक्तीने सर्व खलांना दग्ध करून टाक. आह्मांस जगात सुखरूप वावरतां यावें ह्मणून आह्मांस उचलून उभे कर. देवसमुदायांत तू आमचा हवि ग्रहण केलेला आहेस. १४

हे अग्निदेवा, राक्षसांपासून आमचे संरक्षण कर. लोकांचें द्रव्यें बुडविण्याच्या मिषानें केलेल्या कपटाचा उपसर्ग आह्मांस पोचूं देऊं नकोस. जो आमचा खून अथवा वध करण्यास उद्युक्त झाला असेल त्याचेपासूनही, हे अत्यंत तरुण व प्रकाशमान् देवा आह्मांस वाचीव. १५ ( १० )

---

१ ईंधे ॥

२ स्वधावः ॥

३ ऊतये ॥

४ विदाः ॥

५ अराव्णः ॥

हे अग्निदेवा, तुझी दंष्ट्रा जणूं काय ज्वालाचींच बनविलेली आहे असें वाटतें. जो आमचें धन बुडवणारा असेल त्यास घणासारखें एखादें शस्त्र घेउन सपशेल मारून टाक. जो आमचा द्वेष करीत असेल त्यास ठार मार. जो (नीच) मनुष्य रात्रीच्या रात्री जागून आमच्यां विरुद्ध खलबते करीत असेल त्या आमच्या शत्रूचा आम्हांवर अधिकार न चालो. १६

अग्निदेवाने स्वतः निवड करून उत्तम सामर्थ्ययुक्त व उत्कृष्ट भाग्य ह्याची जोड कण्वास करून दिली. अग्नीने मित्रांचें सरक्षण केले. त्याचप्रमाणे **मेध्यातिथी** व **उपस्तुत** ह्याचा-ही द्रव्योपार्जनाच्यां समयीं त्यानें प्रतिपाल केला. १७

अग्नीच्या द्वारे **तुर्वश**, **यदु**, ह्याणि **उग्रदेव** ह्यांना आम्ही त्याच्या अतिशय दूरस्थांना-पासून इकडे येण्याचीं विनंति करितों. दस्यूचे निमत्रण करणारा हा अग्निदेव **नववास्त्व**, **बृहद्रथ** आणि **तुर्वीति** ह्यांस येथे घेऊन येवो. १८

हे अग्निदेवा, मनूने तुझी तू लोकहिताकरितां प्रकाशणारी ज्योति ह्या नात्यांने निरतरची स्थापना केली. न्यायनीतिसहैवर्तमान तू प्रकट झालास व घृताचा हवि तुला नेहमी अर्पण करण्यांत येत असतो. - की ज्यांस विश्वातील सर्व लोक नमन करितात—तो तू कण्वा-करितां प्रदीप्त झाला होतास. १९

अग्नीच्या ज्वाला उज्ज्वल, प्रबल, भयप्रद व जवळ जाण्याम अशक्य अशा आहेत (हे अग्निदेवा) राक्षस, पिशाच आणि सर्व दुष्टलोक ह्यांना कायमचे दग्ध करून टाक. २० (११)

---

१ अत्यक्तुभिः ॥
२ सानौ ॥
३ परावतः ॥
४ ऋतजातः ॥
५ अमवन्तः ॥

## सूक्त ३७.

ऋषि कण्व घोर । देवता-मरुत् ॥

हे कण्वहो, मरुद्गणास उद्देशून गायन करा. हे मरुद्गण रथावर सुंदर रीतीने विराजमान झालले आहेत. परतु ते आपल्या रथास अश्व जोडीत नसतात. ह्यांस क्रीडा फार आवडते. १

हे मरुद्गण स्वयप्रकाशित असून आपल्या ठिपकेदार रंगाच्या हरिणी, आपल्या तरवारी, आपले भाले, व आपली आभरणे, ही सर्व बरोबर घेऊन ह्या जगांत प्रकट झाले. २

ज्या वेळी आपल्या हातांनी ते आपल्या चाबकाचा आवाज काढतात त्यांवेळीं जणूं काय तो चाबूक येथेच वाजला अशा तऱ्हेने तो मला ऐकूं येतो. मार्गक्रमण करीत असता ते मोठ्या ऐटदार पद्धतीनें त्यास ( आपल्या हातात ) वागवतात. ३

तुह्मांस प्रिय असणाऱ्या ह्या मरुद्गणाप्रीत्यर्थ एखाद्या दैविक स्तोत्राचे गायन करा. हे मरुद्गण ( शत्रूंस ) चिरडून टाकणारे, तेजोवैभवाने युक्त व अत्यत प्रबल आहेत. ४

धेनूंची प्राप्ति करून घेण्याकरितां पराक्रमी व क्रीडानिपुण अशा मरुद्गणांचे स्तवन कर. स्वादिष्ट रसाचे सेवन करून हे वीर्यवान् झाले. ५ ( १२ )

स्वर्ग आणि पृथ्वी ह्यांस हालवून सोडणाऱ्या हे मरुद्देवानो, ( ह्या विश्वांत ) असा कोण श्रेष्ठ आहे की ज्यास तुह्मी ( पृथ्वीच्या ) टोंकापर्यंत फेकून देऊं शकला नाही. ? ६

---

१ अनर्वाणम् ॥
२ पृषतीभिः ॥
३ वदान् ॥
४ देवत्तम् ॥
५ जम्भे ॥
६ धूतयः ॥

आपण गमन करीत असतांना आपल्या उग्र कोपाला भिऊन मनुष्यें प्रत्येकवेळां आधार शोधूं लागलेली आहेत. कठिण शिखरांचा पर्वतसुद्धां ( आपला कोप पाहून ) भयकंपित होईल. ७

ह्या मरुद्देवांचा संचार सुरू होतांच वार्धक्यानें क्षीण झालेल्या एखाद्या नृपती-प्रमाणे ही पृथ्वी त्यांचे आगमन होत असतां भीतीनें लटलट कापूं लागते. ८

जेथे ह्यांचा जन्म झाला ते स्थान अतिशय स्थिर आहे. आपल्या मातेच्या उदरांतून बाहेर निघण्याकरितां ते पक्षीच बनले. कारण त्यांचे सामर्थ्य द्विगुणित होते. ९

शिवाय ह्यां वाग्देवीच्या पुत्रांनीं धेनूस आपल्या वत्साकडे नीट जातां यावें ह्मणून त्रिश्चार्थ्या सिमा फार दूरपर्यन्त वाढवल्या. १० ( १३ )

ते आपल्या मार्गाने जात असतां मेघाच्या बालकास खाली कोसळून पाडतात. ह्या मेघाच्या बालकाचा आकार दीर्घ व विस्तृत असून त्यास प्रायः कोणालाही इजा करतां येत नाही. ११

हे मरुद्देवांनो, तुमचे सामर्थ्य इतके मोठे असल्याकारणाने तुह्मी सर्व लोकांस हालवून सोडतां आणि पर्वतासही कंपित करिता. १२

ज्या वेळीं मरुदेव गमन करित असतात त्यावेळीं मार्गांत असताना त्यांचे एक-मेकांशीं संभाषण होते. कोणातरी ( भाग्यवान् ) पुरुषास ते ऐकूं येत असेल काय ? १३

---

१ यामाय ॥
२ जुजुर्वान् ॥
३ निरेतवे ॥
४ अज्मेषु ॥
५ पृथुम् ॥
६ अक्षुष्पवीतन ॥
७ अध्वन् ॥

आपल्या शीघ्रसंचारी वाहनावर बसून त्वरेने इकडे या. कण्वमंडळींत तुमच्याक-तां हवि ठेविलेला आहे; त्यांत आनद माना. १४

आनंद व्हावा ह्याकरिताच खरोखर हा येथे ठेविला आहे. आह्मी मनोभावाने केवळ ाचेच भक्त आहोत. आह्मांस दीर्घकालपर्यंत ह्या जगांत वास्तव्य करितां यावें ह्मणून सर्व िवन ह्यांनी आमच्या स्वाधीन करून ठेविले आहे. १५ ( १४ )

## सूक्त ३८.

ऋषि–कण्व घोर । देवता–मरुत् ॥

ज्याप्रमाणे आपल्या पुत्राचे बोबडे बोलणे ऐकण्याविषयी लोलुप असलेला पिता त्याचा ्रमाने हात धरितो त्याप्रमाणे, हे मरुद्देवानो, आपण आह्मांस खरोखर कधी हातांत धरणार ाहां बरे? आपणांकरिता, आह्मी सोमरसात पडलेले दर्भाचे तुकडे काढून टाकून, तो ्यार करून ठेविला आहे? १

खरोखर कोणीकडे—कोणत्या प्रदेशास उद्देशून—आपण स्वर्गातून जाण्यास निघाला ाहां? आपण पृथ्वीकडून आला नाही काय? आपल्या धेनु कोठे आहेत? त्यांचे हबरणें ेकू येत नाही. २

हे मरुद्देवानो, तुह्मी आणिलेली अपूर्व वैभवें कोठे आहेत? आपणापासून प्राप्त होणारी ंपत्ति कोठें आहे? आपणांपासून जी सर्व सुंदर भाग्ये (आह्मास) प्राप्त होणार तीं ोठे ठेविलेली आहेत? ३

---

१ शीभम ॥
२ स्मसि ॥
३ कण्वप्रिय ॥
४ रण्यन्ति ॥
५ सुम्ना ॥

हे पृश्नींच्या पुत्रांनो जर तुह्मी मर्त्यांमध्येच गणले जात असाल आणि तुमची स्तुति करणारा तुमचा उपासकमात्र अमरत्व पावत असेल, ४

तर खरोखर, ज्याप्रमाणे एखाद्या हरिणाला गवत खाण्याकरिता कोणी प्रतिबंध करणार नाहीं, त्याप्रमाणे तुमच्या सेवकावरही कोणाचीच अवकृपा होणार नाही व यमाच्या मार्गाने जाण्यास त्यास केव्हांही भाग पडणार नाही. ५ ( १५ )

निर्दयपणाने नुकसान करणारी व एकसारखी वृद्धिगत होणारी **साडेसाती** आम्हांस नाशाप्रत न नेवो. महत्त्वाकांक्षेबरोबर तिचाही निःपात होवो. ६

खरोखर हे बलशाली परंतु भीति उत्पन्न करणारे देव, अतिशय नापीक प्रदेशामध्ये सुद्धा, वृष्टि करीत आहेत, व त्या वृष्टीस वाऱ्याकडून खंड पडूं देत नाहीत. ७

जेव्हा ह्यांच्याकडून पर्जन्याची वृष्टि होते तेव्हां वासराकरिता हंबरणाऱ्या धेनूप्रमाणे वीज गर्जना करिते व माता ज्याप्रमाणे आपल्या लेकरास पोटाशी धरिते त्याप्रमाणे ( सर्व जगतास ) ही घट्ट कवळून धरिते. ८

ज्या वेळी हे पृथ्वीस पाण्याने चिंब करून टाकतात त्या वेळीं उदकाची वृष्टि करणाऱ्या पर्जन्याकडून हे दिवसासुद्धा काळाकुट्ट अंधकार पाडतात. ९

---

१ स्यातन ॥

२ अजोष्यः ॥

३ दुर्हणा ॥

४ अवाताम् ॥

५ मिमाति ॥

६ व्युन्दन्ति ॥

मरुताची गर्जना ऐकल्याबरोबर ह्या पृथ्वीवरील एकूणएक घरे हादरून जातात. ढेच काय पण मनुष्यसुद्धां थरथर कापूं लागतो. १० ( १६ )

हे मरुतदेवहो, मार्गात क्लेश न होतां नानाप्रकारच्या मनोहर नदीच्या काठाकाठाने पल्या सामर्थ्यवान् हस्ताचा प्रताप गाजवीत गमन करा. ११

तुमच्या रथांच्या चाकांच्या धावा भग न पावणाऱ्या असोत. तुमचे रथ आणि त्याना डलेले अश्व खबीर असोत. तुमच्या हातातील लगाम नक्षीदार असोत. १२

स्तुति करण्याच्या इच्छेने **ब्रह्मणस्पतीस** उद्देशून आणि त्याचप्रमाणे अग्नि व हा सुंदर त्र ह्यासही अनुलक्षून स्तोत्रांनी निरंतर आळवीत जा. १३

सतत कोसळणाऱ्या पावसाप्रमाणे उच्च घोष करून स्तोत्रपाठ करा. स्तुतीनी परिपूर्ण शा एखाद्या सुंदर गानाचे गायन करा. १४

सामर्थ्यवान्, स्तुतीस योग्य आणि अनेक स्तोत्रानी ज्याचे माहात्म्य वर्णन केले आहे शा मरुताच्या समुदायास वंदन कर. ते श्रेष्ठ मरुत येथे आमच्यावरच अनुग्रह करण्या-रितां वसलेले असोत. १५ ( १७ )

---

१ आ-सद्म ॥

२ अखिद्रयामभिः ॥

३ अभीशवः ॥

४ दर्शतम् ॥

५ ततनः ॥

६ पनस्युम् ॥

## सूक्त ३९.

ऋषि–कण्व घोर । देवता–मरुत ।

सर्व जगास हालवून सोडणाऱ्या हे मरुतांनो, ज्याअर्थी आपण एखाद्या अग्निज्वालेप्रमाणे आपले प्रतिबिंब लांबच्या प्रदेशापासून अशा रीतीने पुढे फेंकित आहां, त्याअर्थी कोणाच्या करामतीमुळे—कोणाच्या आग्रहाने—कोणास उद्देशून—खरोखर कोणावर अनुग्रह करण्याकरिता—आपण चालला आहां बरे ? १

शत्रूंची दाणादाण करण्याकरिता तुझी आयुधे एकसारखी चालोत, आणि तुझे बळ त्याचा योग्य प्रतिकार करो. प्रशंसनीय सामर्थ्य केवळ तुझ्याच जवळ असो, कपटी मनुष्याजवळ कधीही नसो. २

हे वीरांनो, जेव्हा स्थिर पदार्थांना तुह्मी त्यांच्या स्थानापासून हलविता, आणि ज्या वस्तु अतिशय जड आहेत, त्याना ( भिंगरीसारखें ) फिरावयास लाविता, तेव्हां आपले गमन पृथ्वीवरील वृक्षामधून व पर्वताच्या दरीखोऱ्यांतून होत असते. ३

हे शत्रुसंहारक मरुद्देवहो, स्वर्ग अथवा पृथ्वी ह्यावर खरोखर आपणास कोणीही शत्रु उरलेला नाही. हे भयप्रद देवांनो, शत्रूवर झडप घालता यावी म्हणून सामर्थ्याची आपणास सदैव जोड मिळो. ४

---

१ क्रत्वा ॥

२ पनीयसी ॥

३ व्याशाः ॥

४ तविषी ॥

ते पर्वतांना कंप उत्पन्न करितात आणि मोठमोठ्या वृक्षास भग्न करितात. मदोन्मत्त मनुष्याप्रमाणे हे मरुद्देव आपल्या परिवारासहवर्तमान इतस्ततः संचार करीत असतात. ५ ( १८ )

चित्रविचित्रवर्णाच्या हरिणींना आपण आपल्या रथास जोडिले आहे, आणि प्रमुखत्वाने एक रक्तवर्ण[2] मृग तो रथ ओढित आहे. आपण याल म्हणून पृथ्वी लक्षपूर्वक ऐकत बसली आहे व मनुष्ये भयव्याकुल होऊन गेलेली आहेत. ६

हे रुद्रहो, आपण ज्याप्रमाणे आमचे संरक्षण करिता तशा प्रकारच्या संरक्षणाची याचना आम्ही नेहमी नेहमी आणि तीही ताबडतोब[3] कोणाजवळ करावी? पूर्वी ज्याप्रमाणे आमच्या संरक्षणाच्या तजविजीने तुम्ही येत होता त्याप्रमाणे आता ही ह्या भयविह्वल कण्वाप्रीत्यर्थ इकडे या. ७

कोणीही मनुष्य, मग तो तुम्ही पाठविलेला असो अथवा इतर मनुष्यांनी चिथवलेला असो, आम्हावर हल्ला करण्याकरिता येत असेल त्याचे आपल्या सामर्थ्याने, शक्तीने अथवा भक्तजनसंरक्षक आपल्या शस्त्रांनी दोन तुकडे करा. ८

हे अत्यंत ज्ञानशील व यज्ञार्ह मरुद्देवांनो, आपण कण्वास जे काही ( वैभव ) अर्पण करणारा असाल ते संपूर्ण अर्पण करा आणि आमच्या संरक्षणाची संपूर्ण साधने घेऊन, ज्याप्रमाणे विद्युल्लतेचा ओढा पर्जन्यवृष्टीकडे असतो त्याप्रमाणे, आमच्याकडे आगमन करा. ९

---

१ विञ्चन्ति ॥

२ रोहितः ॥

३ मक्षु ॥

४ शवसा ॥

५ प्रयज्यवः ॥

सर्व जगतास हालवून सोडणारे व दानकर्मनिपुण मरुद्देवहो, आपले सर्व सामर्थ्य व शक्ति आपल्याजवळ ठेवा, आणि जो क्रोधाविष्ट पुरुष ऋषीचाही द्वेष करीत असेल यावर बाण सोडल्याप्रमाणे एखादा शत्रु सोडा. १० ( १९ )

## सूक्त ४०.

ऋषि- कण्व घोर । देवता ब्रह्मणस्पति ॥

हे ब्रह्मणस्पति देवा, ऊठ, देवाची भक्ति करणारे उपासक तुझ्या दर्शनाची इच्छा करीत आहेत. अत्यंत उदार असे मरुत् इकडे येवोत. हे इंद्रा, त्यांचेसह ( सोमरसाचा ) आस्वाद घेणारा हो. १

सामर्थ्यांतून प्रादुर्भूत होणाऱ्या हे देवा, धनाची ठेव प्राप्त करून घेण्याचे प्रसंगी प्रत्येक ) मनुष्य तुलाच बोलावितो. हे मरुतांनो, जो ( भक्त ) आपणास हाक मारील याचेसाठी सुंदर अश्वांनी युक्त असे उत्तम सामर्थ्य तयार करून ठेवा. २

**ब्रह्मणस्पति** इकडे येवो, देवी **सूनृता** इकडे आगमन करो. देव आम्हास असा यज्ञ करण्याची स्फूर्ति देवोत की जो उत्साहाने चालेल, जो मनुष्यांस हितकारी होईल, व ज्याचे पासून अनेकांस संतोष प्राप्त होईल. ३

*मनुष्यजातीस अत्युपयुक्त असे धन जो भाविक पुरुषास अर्पण करतो तो अक्षय्य र्ति प्राप्त करून घेतो. त्याचे कल्याणार्थ आम्ही* ***इळा****देवीस हवि अर्पण करितो. ही देवी वीराचा लाभ करविणारी, शत्रूंचा निःपात करणारी व कोणाकडूनही अपाय न ारी अशी आहे.* ४

---

१ परिमन्यवे ॥
२ प्राशु. ॥
३ आचके ॥
४ पङ्क्तिराधसम ॥
५ सुप्रतूर्तिम ॥

खरोखर ज्याचे ठिकाणी इन्द्र, वरुण, मित्र व अर्यमा ह्या देवानी आपला वास केलेला आहे असा अत्यन्त प्रशंसायोग्य मंत्र ब्रम्हणस्पति म्हणत आहे. ५ ( २० )

यज्ञामध्ये आम्ही, हे देवानो, तोच कल्याणकारक व अविनाशी मन्त्र म्हणत जाऊं. हे वीरानो, तुम्ही ह्याही स्तुतीचा अंगीकार करीत आहा त्याअर्थी तुम्हापासून प्राप्त होणारी सर्व सुखे तुमच्या भक्तास ( निःसंशय ) उपभोगण्यास सापडतील. ६

भक्तिमान् मनुष्यास कोण ग्रासू शकेल ? सोमरसांतील दर्भांचीं अग्रे काढून टाकणाऱ्या उपासकास कोण पराभूत करील ? हवि अर्पण करणाऱ्या मनुष्याचा त्याच्या सर्व परिवारांसह ( आजपर्यंत नेहमी ) उत्कर्षच झालेला आहे व त्याने ( नेहमीच ) सर्व समृद्धीने भरलेलीं अशी घरे उभारलेलीं आहेत. ७

तो ( ब्रम्हणस्पति ) आपले सर्व बल एकत्र करील, कारण राजांकडून तोच ( शत्रूस ) मारवीत असतो. भीतिप्रसंगी देखील तो ( निर्भय ) निवासस्थान तयार करून ठेवतो. लहान अथवा मोठ्या युद्धातसुद्धा ह्या वज्रधारी देवास तोड देणारा अथवा त्याचा पराभव करणारा कोणी नाही. ८ ( २१ )

## सूक्त ४१.

ऋषि कण्व घोर ॥ देवता–१–३, ७–९ वरुण, मित्र, अर्यमा । ४–६ आदित्य ॥

अत्यंत प्रज्ञावान् असे मित्र, वरुण आणि अर्यमा हे देव ज्याचे रक्षण करितात अशा मनुष्यास कोणाकडून तरी अपाय होणें शक्य आहे काय ? १

---

१ उक्थ्यम् ॥
२ प्रतिहर्यथ ॥
३ पस्त्याभि ॥
४ सुक्षितिम् ॥
५ दभ्यंत ॥

जणूं कांहीं आपल्या बाहूवर झलेल्याप्रमाणे ज्या मनुष्यांचें ते पोषण व
त्रूपासून रक्षण करितात ती मनु ये सर्व भीतीपासून मुक्त होऊन भरभराटीस चढतात. २

हे ( सर्व विश्वाचे ) राजे आपल्या समोर त्याच्या ( म्ह० भक्तांच्या ) संकटाचा व
्चा नाश करितात आणि त्याची अरिष्टे पार नाहींशी करितात. ३

हे आदित्यहो, जो नीतिपथाकडे जातो त्याचा मार्ग सुगम आणि कंटकरहित
तो. येणेकरून आपणांसही कधींही वाईट ( मनुष्याचे ) हवि मिळण्याचा संभव नाही. ४

हे शूर आदित्य हो, ज्या यज्ञास तुम्ही सरळ वाट दाखवून मार्गोपदेशक होतां
तुमचे स्तवन करण्यास कधीतरी चुकेल काय ? ५ ( २२ )

तो मनुष्य कोठे पराभव न पावता उत्तम संपत्ति, सर्व प्रकारचे वैभव आणि संतति
: आपोआप जाऊन पोचतो. ६

जिवलग स्नेह्यानो, **मित्र** आणि **अर्यमा** ह्यांचे स्तोत्र व वरुणाचा उत्कृष्ट हवि आपण
ा सजवावा बरं ? ७

एखादा मनुष्य आपणांस शिव्याशाप देईल किंवा आपणावर बोटे मोडील तर जरी तो
विक असला तरी त्याचे बरोबर माझे संभाषण न घडो. तुम्ही दिलेल्याच संपत्तीवर मी
ोष मानून राहतो. ८

---

१ बाहुतेव ॥
२ दुर्गा ॥
३ अवखादः ॥
४ नशत् ॥
५ अस्तृतः ॥
६ प्सर ॥
७ सुम्नै ॥

जो चारही ( संपत्ति ) देणारा आहे व ज्याचे जवळ संपत्तीचा ठेवा आहे, त्याची नेहमीं भीति बाळगावी. त्याचे विषयी दुरुक्ति बोलण्याची आवड बाळगूं नये. ९ ( २३ )

## सूक्त ४२.

ऋषि-कण्व घोर । देवता—पूषा ॥

हे **पूषा**, वाटेने आह्मास घेऊन जा; हे विमोचनपुत्रा, आमच्या संकटातून आह्मांस मुक्त कर. हे देवा, आमचे जवळच चाल. १

हे **पूषा**, जो हिंडिमवाणा व दुष्ट लांडगा आह्मांस मार्गोपदेशक होऊं पाहतो त्यास मार्गातून काढून टाक. २

जो कपटी चोर आमच्या मार्गात विघ्न करतो त्यास वाटेतून दूर हाकून लाव. ३

दुर्भाषणी, दुटप्पी माणसाच्या, तापदायक शरीरावर, मग तो कोणीही असो, पाय देऊन उभा रहा. ४

हे सुंदर प्रज्ञावान् **पूषा**, ज्याचे योगाने तू आमच्या पितरास भरभराटीस पोचविलेस त्या तुझ्या कृपे प्रसादाची आह्मी इच्छा करितो. ५ ( २४ )

---

१ निधातोः ॥

२ तिर ॥

३ दुःशंवः ॥

४ हरश्चितम ॥

५ तपुषिम ॥

६ मन्तुमः ॥

हे सकलसौभाग्यवंता, हे सुवर्णशस्त्रांनीं विभूषित देवा, आह्मास सकल संपत्ति लभ कर. ६

आमचा पाठलाग करणारे असतील त्याचेमधून आह्मास बचावून घेऊन जा आणि आमचे मार्ग जाण्यास सुलभ कर. येथे काय करणे उचित आहे, हे, हे **पूषा**, तुला विदितच आहे. ७

जेथें तृणाची समृद्धि असेल अशा प्रदेशांत आह्मास घेऊन जा आणि मार्गांत कोणतीही नवीन ताप उत्पन्न न होवो. येथे काय करणे उचित आहे ते हे **पूषा**, तुला विदितच आहे. ८

हे **पूषा,** तू सामर्थ्यवान् आहेस ( ह्मणून ) आमच्या ( इच्छा ) परिपूर्ण कर. आम्हांस संपत्ति ) दे. आम्हास तृप्त कर. येथे काय करणे उचित आहे हे तुला विदितच आहे. ९

आह्मी **पूषा**ची निंदा कधीही करणार नाहीं, उलट उत्तम स्तोत्रानी त्याचे स्तवन करू. या सुंदर देवाजवळ आम्ही वैभवाची याचना करितो. १० (२५)

## सूक्त ४३.

ऋषि–कण्व घोर । देवता–१, २, ४–६ रुद्र, ३ मित्र आणि वरुण, ७–९ सोम ॥

अत्यंत प्रज्ञाशील, अतिशय उदार, अतिशय बलवान् व हृदयास अत्यत प्रमोददायक अशा **रुद्रा**प्रीत्यर्थ आह्मी केव्हां स्तोत्र ह्मणावे बरे ? १

---

१ सुषणा ॥
२ सश्चतः ॥
३ क्रतुम् ॥
४ विदः ॥
५ मेथामसि ॥
६ मिळ्हुष्टमाय ॥

ह्यायोगाने आमच्या मुलांबाळांवर, गाईवर, नोकरमाणसांवर व जनावरांवर **अदिति** देवी **रुद्रा**चे उत्तम आशीर्वाद आणील, २

( व ) ह्यायोगाने **मित्र, वरुण, रुद्र,** व त्यांचे सहवर्तमान असलेले सर्व ( देव ) ह्यांना आमची ओळख राहील. ३

सर्व स्तुतींचा नाथ, सर्व यागाचा स्वामी, व जलौषधींचा प्रभु असा जो **रुद्र** त्याचेजवळ स्वकल्याणेच्छु भक्त जे धनं मागतो, त्याच धनाची आह्मी याचना करितो. ४

हा **रुद्र,** देवाचे श्रेष्ठ वैभव असून, ह्याचें तेज देदीप्यमान सूर्याप्रमाणे व कांति सुवर्णाप्रमाणे आहे. ५ ( २६ )

हा आमचा अश्व, आमचा मेढा, मेढी, आमचे नोकर, दासी व धेनु ह्यांना उत्तम रीतीने आनंदात राहतां येईल असे करितो. ६

हे **सोमा**, आमचेसाठी शेकडो मनुष्यांचे धन व अनेक शूरांचे यश सिद्ध करून ठेव. ७

**सोमा**स त्रास देणारे अथवा आमच्याशी शत्रुत्व करणारे लोक आम्हांस उपद्रव न करोत. हे इंद्रा, सामर्थ्याचे कृत्य चालले असतांना तू आमचे सन्निध रहा. ८

---

१ तोकाय ॥
२ सजोषसः ॥
३ सुम्नम् ॥
४ शुक्रः ॥
५ सुगम् ॥
६ तुविनृम्णम् ॥
७ वाजे ॥

तूं अमर आहेस. जो तुझा प्रजाजन नीतिमत्तेच्या अत्युच्च स्थलावर अधिष्ठित होतो, हे सोमा, तू आपल्या पोटाशी धरिले आहेस— त्यास तू आपल्या मस्तकावर धारण आहेस. ते ( दिव्यतेजाने ) विभूषित झाले हे तुला माहित आहे.　　९ ( २७ )

# अनुवाक ९.

## सूक्त ४४.

ऋषि प्रस्कण्व । देवता-अग्नि ॥

हे अमर अग्निदेवा, तू **उषादेवी**ची आश्चर्यकारक व उज्ज्वल अशी देणगी आहेस. अखिलज्ञानवंता, प्रातःकाली प्रबुद्ध होणाऱ्या देवास, तू आज हवि अर्पण करणाऱ्या काकडे घेऊन ये.　　१

हे अग्निदेवा, यज्ञास सत्वर सांगतेस नेणारा व देवांस त्यांचे हवि पोचविणारा असा तू खर आमचा प्रिय प्रतिनिधि आहेस. **अश्विन** व **उषा** ह्यांसह येऊन उत्तम पराक्रमाने युक्त अशी विपुल कीर्ति[3] आमचे वाट्यास आण.　　२

यज्ञांचें जणू वैभवच, तेज स्वरूप, धूमाच्या निशाणाने युक्त, अनेकास प्रिय व मूर्तिमान् पत्तिच असा जो अग्नि त्यास आम्ही उषःकालचा स्वच्छ प्रकाश पडल्याबरोबर आमचा प्रतिनिधि नेमीत आहोत.　　३

१ नाभा ॥
२ उषर्बुधः ॥
३ श्रवः ॥
४ भाऋजीकम् ॥

श्रेष्ठ, अत्यंत तरुण, उत्तम हवीचा सन्मान ज्यास मिळतो असा अतिथि, हवि अर्पण करणाऱ्या भक्तजनांस प्रिय, अशा सर्वज्ञ अग्नीची, त्याने देवांचेकडे गमन करावे म्हणून, उषःकालचा स्वच्छ[1] प्रकाश पडल्याबरोबर, मी स्तुति करितो. ४

विश्वास पोसणाऱ्या हे अमर अग्ने, हवि पोचविणाऱ्या यज्ञार्ह देवा, तूं आमचा अत्यंत पूज्य संरक्षणकर्ता असल्यामुळे मी तुझे स्तवन करीन. ५ (२८)

तू मधुरभाषी व सुंदर[3] हवीचा सन्मान पावणारा आहेस. अत्यंत तरुण देवा, तुझीं स्तवनेंही उत्तमोत्तम झालेली आहेत. यास्तव स्तुति करणाऱ्या भक्ताकरितां तू जागरूक रहा. प्रस्कण्वाने दीर्घकालपर्यंत जगात रहावे म्हणून तू त्याचे आयुष्य वाढवून देवसमुदायास आमची प्रणति अर्पण कर. ६

देवांस हवि पोचविणारा व सर्वज्ञ असा जो तू त्या तुला खरोखर सर्व लोक प्रदीप्त करितात. ह्याकरितां, सर्वांकडून निमंत्रित होणाऱ्या हे अग्निदेवा, तू अत्यंत प्रज्ञाशील अशा देवांस त्वरेने येथे घेऊन ये. ७

रात्र संपून स्वच्छ पहांट झाल्याबरोबर सविता, उषा, अश्वि, भग व अग्नि, ह्यांस ( येथे घेऊन ये. ) हे यज्ञसिद्धिदात्या अग्निदेवा, तू देवास हवि पोचविणारा असल्यामुळे, हे कण्व, सोमरस सिद्ध करून, तुला प्रज्वलित करीत आहेत. ८

---

१ व्युष्टिषु ॥

२ मियेध्य ॥

३ स्वाहुतः ॥

४ इन्धते ॥

५ सुतसोमासः ॥

घृताच्या हवींचा स्वीकार करणाऱ्या हे उदार देवा, ज्या स्तुतींच्या योगाने कण्वाचे पुत्र तुला हवन करीत आहेत त्या तू श्रवण कर. ५ ( ३१ )

प्रार्थना श्रवण करण्यांत तुझी शक्ति आश्चर्यकारक आहे. तू अनेक जनांना प्रिय आहेस. तुझे केश ज्वालारूप आहेत. ( देवाकडे ) हवि घेऊन जाण्याकरितां हे अग्निदेवा, ह्या जगांतील लोक तुझे पूजन करीत असतात. ६

हवि अर्पण करणारा, यज्ञांतील आचार्य. अतिशय संपत्तिमान, भक्ताच्या हाकेस कान देणारा व अत्यंत कीर्तिमान् असा जो तूं त्या तुझी विद्वान् लोक यज्ञात संस्थापना करितात. ७

हे अग्निदेवा, ज्यांनी सोमरस तयार करून ठेविला आहे, जे अतिशय कांतीने युक्त आहेत, व ज्यांनीं हवि हातांत घेतलेले आहेत अशा विद्वान् लोकांनी, भक्तिशील मनुष्यां करितां, तुझे मन हवीच्या अन्नाकडे वळविलेले आहे. ८

सामर्थ्यापासून जन्म पावणाऱ्या हे उदार अग्निदेवा, हे मूर्तिमत वैभवा, प्रातःकालीचें ( बाहेर ) गमन करणाऱ्या देवसमुदायांस आज ह्या यज्ञांत सोमपानार्थ दर्भासनांवर आणून बसव. ९

हे अग्निदेवा, देवसमुदायांस इकडे आणून त्या सर्वांस एकाच वेळीं आहुति देऊन तृप्त कर. हे अत्यंत उदार देवांनो, हा येथे सोम ठेवलेला आहे. तो आपण प्राशन करा. तो काल तयार केलेला आहे. १० ( ३२ )

---

१ घृताहवन ॥
२ विष्णु ॥
३ दिविष्टिषु ॥
४ बृहद्भाः ॥
५ प्रातर्याव्ण ॥
६ तिरोअह्न्यम ॥

## सूक्त ४६

ऋषि--प्रस्कण्व काण्व; देवता--अश्विन ।

द्युलोकांस प्रिय असलेली अशी जी अपूर्व तेजोयुक्त उषा देवी ती आपला प्रकाश पाडीत आहे. हे अश्विनहो ! मी तुमची मनःपूर्वक स्तुति करितों. १

हे अश्विनीदेव सुंदर आहेत. सिंधु ही त्यांची जननी होय. वेगवान् पुरुषांशीं तुलना केली असतां हे आपल्या वेगानें मनोंससुद्धां मागें टाकतात. हे अंतःकरणपूर्वक ( भक्तांना ) धन अर्पण करतात. २

वेगानें धांवण्यांत जणूं पक्षीच अशा तुमच्या अश्वांच्या योगानें जेव्हां तुमचा रथ ताडताड उडत जातो त्यावेळीं अति पुरातन अशा स्वर्गलोकांतसुद्धां तुमचीं स्तोत्रें गाण्यांत येतात. ३

हा सर्वसंचारी व सर्वतृप्तिकारक ( सूर्य ) देव कीं—ज्याच्यावर उदकांचा लोभ आहे व ज्याच्यापासून पाण्याचे रांजण ( अर्थात् मेघ ) जन्म पावतात–तो तुम्हांस हवींनीं संतुष्ट करितो. ४

हे स्तुतिप्रिय व सत्यस्वरूप अश्विनीदेवहो ! ( सोमरस ) हा तुमच्या मनाचीं कपाटें उघडतो. म्हणून तुम्ही सोमरसाचें मनसोक्त प्राशन करा. ५ ( ३३ )

---

१ अपूर्व्या ।　२ मनोतरा ।　३ बिभिः ।

४ कुटस्य ।　५ धृष्णुया ।

अहो अश्विनहो, जा [illegible] प्रकाश पाडून आम्हांस अंधकाराच्या पार घेऊन जाईल त्या

६

तुमच्या कृपेचा लाभ आम्हास करून [illegible].

तुमच्या कृपारूपी नौकेत बसून ( [illegible] ) पार आम्हास जाता यावे म्हणून

इकडे आगमन करा. हे अश्विनहो, तुम्ही आपला रथ जोडा.

नदींच्या तीरावरून तुमचें गमन होत असतां तुमचा रथ हीच स्वर्गलोकाहूनही विस्तीर्ण अशी तुमची नौका होते. तुमच्याकरितां आम्हीं येथें भक्तीने सोमरस तयार करून ठेविले आहेत. ८

हे **कण्वहो** ! स्वर्गाच्या प्रदेशांत आल्हाददायक तेज भरून राहिलें आहे आणि नद्यांच्या निवासस्थानी तेजःपुंज असे वैभव दृग्गोचर होत आहे. तर ( हे अश्विनहो ) आपण आपले दिव्य देहें कोणते ठिकाणीं घेऊन जाल बरे ? ९

चोहोंकडे आपले रश्मि फेकण्याकरिता ही पहा **प्रभा** सज्ज झाली आहे. आणि हा पहा इकडे सूर्य ( उगवला ). हा कांचनाचीच प्रतिमा होय. कृष्णवर्ण ( अग्नीनेही ) आपली जिव्हा बाहेर काढून स्वतःची दीप्ति प्रकट केली आहे. १०

धर्मनीतीचा मार्ग आपणांस दुःखाच्या पलीकडे नेण्यासाठीं स्पष्ट दिसू लागला आहे आणि स्वर्गाची वाटही दृष्टी पडू लागली आहे. ११

---

१ रासाथाम् ।   २ तीर्थे ।   ३ वाम्रिम् ।
४ असितः ।   ५ सृति. ।

सोमप्राशनानें आनंद झाल्याबरोबर जे अश्विनदेव भक्तांस भरपूर वैभव देतात त्यांच्या कृपाप्रसादाची स्तोतृजन नेहमीं वाखाणणी करीत असतो. १२

ज्याप्रमाणें ( पूर्वी ) तुह्मी **मनूचे** भेटीस गेलां होतां त्याप्रमाणें आमच्या प्रार्थनांनीं व सोमरसाचे प्राशनाने प्रेरित होऊन **विवस्वना**करितां आपले तेज प्रकट करीत आमचें कल्याणकर्ते आपण इकडे या. १३

आपण परिभ्रमण करीत असतां आपल्या मार्गाच्या अनुरोधाने **उषेनेंही** आपलें मार्गक्रमण चालविले. आपणांस रात्री केलेलीं यागकर्में फार आवडतात. १४

हे अश्विनहो, आपल्या कृपेस खंड पडू न देतां आपण उभयतांही आह्मास सौख्य अर्पण करा व उभयतां सोमरसाचें प्राशन करा. १५ ( ३५ )

## अध्याय चौथा.

### सूक्त ४७

ऋषि–प्रस्कण्व काण्व, देवता- अश्विन ॥

नीतिधर्मपरिपालनांत आनद मानणाऱ्या हे अश्विनीदेवानो, हा अतिशयमाधुर्ययुक्त असा सोमरस तुमच्याकरितां काढून ठेवलेला आहे. तो कालच तयार केलेला आहे:–त्याचें प्राशन करा आणि आपल्या भक्ताकरितां उत्तम संपत्तीचे भांडार भरून ठेवा. १

---

१ जरिता। २ शम्भू।
३ श्रियम्। ४ अविद्रियाभिः

हे अश्विनहो, ज्या आपल्या रथास तीन वंधुरा आहेत, ज्याचा आकार त्रिकोणाकृति आहे व जो दिसण्यांत सुंदर आहे अशा रथांत बसून इकडे या. ह्या यज्ञांत कण्व तुमची स्तुति करीत आहेत त्यांची हांक आपण श्रवण करा. २

न्यायनीतीस उत्तेजन देणाऱ्या हे अश्विनीदेवांनो, ह्या अत्यंत मधुर सोमरसाचें प्राशन करा आणि हे सुरूपवान् देवांनो आपल्या रथांतून पुष्कळ संपत्ति घेऊन येऊन भक्तजनाकडे आगमन करा. ३

तिघांस एकदम बसतां येईल अशा रीतीनें मांडलेल्या दर्भासनावर ( आरूढ होऊन ) हे सर्वज्ञ देवहो, आमचा यज्ञ माधुर्यानें परिप्लुत करा. हे अश्विनहो, हे तेजस्वी-पणानें शोभणारे कण्व सोम ( रस ) तयार करून आपणांस आमंत्रण करीत आहेत. ४

ज्या आपल्या कृपासामर्थ्याच्या योगानें हे अश्विनहो, आपण कण्वाचें संरक्षण केलें, त्याच सामर्थ्यानें युक्त होऊन आमचेही रक्षण करा; कारण कीं आपण सर्व मंगलतेचे स्वामी व न्यायनीतीस उत्तेजन देणारे आहां. ५

अहो सुंदर अश्विनदेवहो, ज्या अर्थी आपण सुदासाकरितां संपत्ति घेऊन आलां त्याअर्थी आपल्या रथांतून ( आमच्याकरितांही ) जीवनसामग्री घेऊन या. ज्यावर पुष्कळ लोकांचा डोळा असतो असें वैभव आम्हांस अर्पण करा. मग तें आपण महासागरांमधून आणलेलें असो अथवा स्वर्गाच्या भोंवतालील प्रदेशांतून आणलेलें असो. ६

---

१ सुपेशसा ।　२ दाश्वांसम् ।　३ त्रिषधस्थे ।

४ अभिष्टिभिः ।　५ पृक्षः ।

हे सत्यस्वरूप अश्विनदेवतांनो ! आपण **तुर्वशापासून** जवळ असा अथवा फार लांब असा. तेथून आपल्या सुंदर रथात बसून इकडे या आणि येतांना सूर्याच्या किरणांसही बरोबर घेऊन या. ७

यज्ञास ललामभूत असे आपले अश्व आपणांस आमच्या हवींकडे घेऊन येवोत. अहो शूरांनों ! आपणांस प्रेमानें हवि अर्पण करणाऱ्या सदाचारी भक्तासाठी समृद्धीची भरती करून ह्या कुशासनावर विराजमान व्हा. ८

हे सत्यस्वरूप अश्विनीदेवतांनो, सूर्यासही आच्छादून टाकणाऱ्या आपल्या रथांत बसून इकडे या. जेव्हां जेव्हां आपणांस मधुर सोमरसाच्या पानाची इच्छा होते, त्या त्या वेळीं आपण नेहमीं ह्याच रथांतून आपल्या भक्तांकरितां सोमरस आणीत असतां. ९

अनेक वैभवांनीं संपन्न अशा अश्विनीदेवांस आम्ही स्तुति स्तोत्रें गाऊन आह्मांकडे पाचरण करीत आहों. हे अश्विनहो ! आपणांस प्रिय असलेल्या कण्वांच्या सदनांत जाऊन आपण खरोखर नेहमीं सोमप्राशन केलेलें आहे. १० ( २ )

## सूक्त ४८

ऋषि-प्रस्कण्व; देवता-उषा ।

द्युलोकदुहिते हे उषादेवी, अत्यंत सुदर अशा तुझ्या कान्तीनें येथें आमचेसाठीं सुप्रकाशित हो. हे देदीप्यमान देवते, तूं दानशूर असल्यामुळें विपुल संपत्ति व वैभव हें बरोबर घेऊन येऊन ( येथें प्रकाश पाड ). १

---

१ सुवृता ।　　२ इषम् ।　　३ सूर्यत्वचा ।

४ पपथुः ।　　५ दास्वती ।

ह्या **उषा,** अश्व, धेनु, व ह्या विश्वांतील उत्तम उत्तम सौख्यें हीं आपल्या बरोबर घेऊन ातीतलावर ) प्रकाश पाडण्याकरिता ( आकाशातून ) उतरून[1] आल्या आहेत. हे **उषे,** ोबर मधुर संभाषण कर व श्रीमत पुरुषांजवळ जितकें धन असतें तितकें धन ास अर्पण कर. २

उषेनें आपला प्रकाश पाडला आहे व ती असाच आपला प्रकाश पाडणार. ायंकाळामुळें मुक्कामास राहिलेल्या गाड्यांना ) हीच पुढे जाण्याविषयीं प्रेरणा करिते; ा, ज्याप्रमाणे ( समुद्रपर्यटनास निघणारे ) साहसी लोक समुद्राकडे दृष्टि लावून ात त्याप्रमाणे सर्व रथ उषेच्या आगमनाची प्रतीक्षा करीत बसलेले असतात. ३

जे विद्वान् लोक तुझे आगमन झालें असतां दानकर्म करण्याकडे स्वतःच्या मनाची ा करितात त्यांचें नाम हा **कण्व** कुलांतील श्रेष्ठ पुरुष **कण्व** ह्या यज्ञांत ( मोठ्या सन्मा- ) गात असतो. ४

एखाद्या सुंदर स्त्रीप्रमाणें ही **उषा** विलास करीत करीत व सर्व दुरितांस[2] नाशाप्रत ीत येत आहे. ज्यांस पाय आहेत अशा प्राण्यांस ती चालावयास लावते व ज्यांस पंख ा अशा जीवांस ती अंतरिक्षात उडण्यास प्रवृत्त करिते. ५ ( ३ )

जे उद्योगशील आहेत व ज्यांस धन मिळविण्याची इच्छा आहे त्यांना ती आपापल्या ास प्रवृत्त करिते. ह्या उदार[4] देवतेस विश्रांतीची मुळींच गरज वाटत नाहीं. उत्साहवर्धन ारी ही उषादेवी प्रकाशमान झाली कीं ज्यास उडण्याचे सामर्थ्य आहे असा एकही पक्षी ्यांत ) बसून रहात नाहीं. ६

---

१ च्यवन्त ।　　२ जीरा ।

३ वृजनम् ।　　४ ओदती

सूर्याच्या उदयस्थानाच्याही पलीकडे असलेल्या लांबच्या प्रदेशापासून हिनें आपले ( अश्व ) जोडून आणलेले आहेत. ही परोपकारी **उषा** मनुष्यांच्याकडे शंभर रथांत बसून येते. ७

हिचें दर्शन झाल्याबरोबर सर्व जगाने हिला प्रणाम केला आहे. ही उपकारी **उषा** ( सर्वांस ) प्रकाश देते. ह्या द्युलोकाच्या उदार कन्येनें सर्व द्वेषकारक व बाधक जीवाचें उन्मूलन करून टाकलें आहे. ८

द्युलोककन्ये हे उषादेवी, आमची यज्ञकर्मे सुरू होण्याकरिता येथें आपला प्रकाश पाडून व आह्मांस अतिशय सौख्याचा लाभ करून देऊन आपल्या आल्हाददायक किरणांनीं येथें प्रकट हो. ९

जेव्हां हे सुखदायिनी देवी, तूं आपला प्रकाश पाडतेस तेव्हां तुझेपासून विश्वाला, आपला प्राण—आपले चैतन्य—मिळाले असे वाटतें. हे उज्ज्वल व अलौकिक औदार्य प्रकट करणारे देवते, तूं आपल्या मोठ्या रथांत बसून येऊन आमची हांक ऐक. १० ( ४ )

हे उषोदेवते, आपले अगीं असे सामर्थ्य आण कीं ज्याबद्दल सर्व मनुष्यांस आचंबा वाटेल. त्या सामर्थ्याचे योगानें आमचें कल्याण करणाऱ्या देवांना, जे उपासक तुझे स्तवन करितात त्यांच्या यज्ञांसमीप, वेऊन ये. ११

---

१ सुभगा । २ सूध. । ३ चन्द्रेण ।
४ चित्रामघे । ५ वन्हय. ।

हे उषादेवि, सर्व देवांना अंतरिक्षांतून येथें सोमपानार्थ घेऊन ये, आणि, हे उषे, ध्या अंगीं असें सामर्थ्य आण कीं ज्याचे योगानें आह्मांस आपलें वीर्य गाजवितां येईल, ज्याची प्रशंसा होईल व ज्याचेमुळें आह्मांस धेनूंचा व अश्वांचा लाभ करून घेतां येईल.　१२

जिचीं उज्ज्वल व कल्याणकारक किरणें दिसूं लागलीं आहेत ती ही उषा हांस, सर्व लोकांस हवीशी वाटणारी अशी उत्तम प्रकारची संपत्ति, आम्हांस प्रयास न ां अर्पण करो.　१३

ज्या प्राचीन ऋषींनीं, हे श्रेष्ठ उषोदेवी! स्वसंरक्षणार्थ तुला पाचारण केलें ( त्यांच्या ास पात्र झालेल्या ) व उज्ज्वल कांतीनें ( युक्त असलेल्या ) हे उषे, तूं आपली कृपा हांवर करून आमच्या स्तोत्रांबद्दल आपली प्रशंसाबुद्धि व्यक्त कर.　१४

हे उषादेवी, ज्या अर्थी आज तूं आपल्या तेजानें स्वर्गाचीं द्वारें खुलीं केलीं आहेस अर्थी हे देवी आम्हांस जेथें शत्रूंचा त्रास होणार नाहीं असें विशाल मंदिर लाभेल असें व आम्हांला धेनु प्राप्त होतील अशी आम्हांविषयीं कृपा धारण कर.　१५

हे सामर्थ्यवान् श्रेष्ठ उषादेवी! आम्हांस अखिल प्रकारच्या संपत्तींनीं, समृद्धींनीं, सर्वत्र ार पावणाऱ्या कीर्तिवैभवानें व बलानें परिपूर्ण करून टाक.　१६ ( ९ )

---

१ शक्थम्।　२ स्यातः।　३ अभिगृणीहि।

४ अनुकम्।　५ विश्वपेशसा।

## सूक्त ४९

ऋषि--प्रस्कण्व काण्व, देवता--उषा ।

हे उषादेवि, देदीप्यमान द्युलोकाच्या वरील भागाकडून येथें आपल्या कल्याणप्रद कान्तीनें ( विभूषित होऊन ) आगमन कर. तुझे रक्तवर्ण[1] अश्व, सोमरस अर्पण करणाऱ्या भक्ताच्या घराकडे तुला घेऊन येवोत. १

हे उषादेवि, ज्या सुखावह व सुंदर रथांत तूं विराजमान झाली आहेस त्यांत बसून येऊन, हे द्युलोककन्ये, उत्तम कीर्तीची इच्छा करणाऱ्या ह्या मनुष्यांचें संरक्षण कर. २

हे देदीप्यमान देवि, द्युलोकाच्या आसमतात् भागांतून तुझें आगमनें झाल्याबरोबर, उडणारे पक्षी, व द्विपाद आणि चतुष्पाद प्राणी, बाहेर निघण्यास सिद्ध झाले. ३

आपल्या किरणांनीं जगावर प्रकाश पाडीत जी तूं सर्व जगास प्रकाशमय[3] करून टाकतेस त्या तुझा, हे उषे, **कण्वांनीं**, संपत्तीची इच्छा धारण करून, स्तोत्रांचे योगानें, धांवा केला आहे. ४ ( ६ )

## सूक्त ५०

ऋषि--प्रस्कण्व काण्व; देवता--सूर्य ।

या सूर्याचें सर्वांस दर्शन घडावें ह्मणून त्या सर्वज्ञ सूर्यदेवास त्याचे रश्मि इकडे घेऊन येत आहेत. १

---

१ अरुणप्सवः । २ ऋतम् । ३ रोचनम् ।

ह्या सर्वदर्शी सूर्यास पाहून नक्षत्रें, रात्रीसहवर्तमान चोरांप्रमाणें पळ काढतात.　२

सर्व लोकांवर प्रकाश पाडण्याकरितां येत असतां अग्निप्रमाणें तेजस्वी असे ह्याचे उज्ज्वल रश्मि दिसत आहेत.　३

हे सूर्या ! तूं प्रकाश देणारा, सर्वांत अत्यंत सुंदर व सर्वसंचारी आहेस. ह्या अखिल [illegible]गावर तूं प्रकाश पाडून त्यास उज्ज्वलता आणतोस.　४

तुझा प्रकाश सर्वांच्या नजरेस पडावा ह्मणून देवसमुदाय, मनुष्यें, ( किंबहुना ) सर्व [illegible]श्व ह्यांच्या समोरें, तूं ढळढळीत प्रकाशमान होतोस.　५ ( ७ )

ह्या योगानें हे वरुणा, हे जगतास पावन करणाऱ्या देवा, तुला सर्व लोकांचा भार [illegible]न करणाऱ्या ह्या जगताकडे स्वनेत्रानें पहातां येतें.　६

हे सूर्या, सर्व प्राणिमात्रांचें निरीक्षण करीत व रात्रीच्या योगानें दिवसाचें मापन करीत द्युलोकावर व विस्तीर्ण रजोलोकावर आगमन करितोस.　७

---

१ तायवः ।　२ तरणिः ।　३ प्रत्यङ् ।

४ भुरण्यन्तम् ।　५ मिमानः ।

हे सर्वनिरीक्षक सूर्यदेवा ! ज्याचे केश[1] दीप्तिमय आहेत अशा तुला, सात रक्तवर्ण अश्व रथांतून आणीत असतात. ८

( रथाच्या पुढील भागास जोडल्यामुळें ) ज्या जणुं कांहीं त्या रथापासून उत्पन्न झाल्या असल्याचाच भास होतो अशा सात घोड्यां[2] ह्या सूर्यानें स्वरथास जोडल्या आहेत; त्या ,रथाचें जूं आपले आपणच मानेवर घेणाऱ्या असल्यामुळें, त्यांस सज्ज करून तो बाहेर प्रयाण करितो. ९

जें सर्व अंधकारावर आपलें प्राबल्य प्रकट करील असें उत्तम तेज शोधीत असतां आह्मी ह्या उत्कृष्ट ज्योतीकडे–सूर्याकडे–आलो. हा देव अखिल देवां[3]त श्रेष्ठ आहे. १०

स्वमित्रां[4]स आनंद देणाऱ्या हे सूर्या ! आज ( येथें ) उदय पावून व ह्या वर दिसणाऱ्या आकाशावर आरोहण करून माझा हृद्रोग व कावीळ[5] नाहींशी कर. ११

माझी कावीळ आम्ही पोपटांवर आणि रोपणाका ह्या नांवाच्या पक्ष्यांवर घालतों[6]. अथवा हारिद्रव पक्ष्यांवर माझी कावीळ जाऊन बसेल असें आम्ही करितो. १२

आपल्या सर्व सामर्थ्यानें सज्ज होऊन, माझे शत्रूंस मजपुढें शरण येण्यास भाग पाडीत, हा आदित्य येथें उगवला आहे. मी शत्रूच्या मुठींत[7] कधींही न जावो. १३ ( ८ )

---

१ शोचिष्केश । २ शुन्ध्युवः । ३ देवत्रा ।

४ मित्रमहः । ५ हरिमाणम् । ६ दध्मसि ।

७ रधम् ।

# अनुवाक १०

## सूक्त ५१.

ऋषि–सव्य　　देवता–इन्द्र ।

त्या मेषरूपधारी इन्द्रास स्तुतीनीं सतुष्ट करा. ह्यास ( संकटकाळी ) अनेकांनीं पाचारण केलेलें आहे, ह्याचीं स्तोत्रें सर्वत्र गाईली जातात व हा सपत्तीचा महोदधि आहे. ज्याचीं मानवांच्या कल्याणार्थ केलेली कृत्ये किरणांप्रमाणेंच जिकडे जावें तिकडे दृग्गोचर होतात त्या अत्यत उदार व प्रज्ञाशाली इद्राचे अर्चन करा. १

सामर्थ्यवान् **ऋभु**, इन्द्रास साहाय्यभूत होऊन, ( भक्तांचे ) सरक्षण करण्यास सर्व तऱ्हेनें समर्थ, अन्तरिक्षास व्यापून राहिलेल्या, ( अखिल ) सामर्थ्यांनी युक्त व ( शत्रूंच्या ) आनंदाचा बिघाड करणाऱ्या अशा ह्या इंद्राकडे आले. ह्या अत्यत पराक्रमी इन्द्रास त्याच्या उत्तेजनपर शब्दांनीं स्फुरण चढविलें. २

जेथें धेनूंना कोंडून ठेवलें होते तो दुर्ग तू **अंगिरसा**करिता उघडलास आणि शेकडों दरवाज्यांमधून तू **अत्री**करितां मार्ग शोधून काढिलास. **वावसाना**च्या युद्धांत आपलें वज्र ( शत्रुसमुदायांतून ) नाचवीत तूं **विमदा**ला धनधान्य अर्पण केलेंस. ३

---

१ मानुषा ।　　२ मदच्युतम ।　　३ शतदुरेषु ।

तूं उदकावरील आवरण काढून टाकलेस व पर्वतांत शिरून विपुल संपत्ति हस्तगत करून घेतलीस. जेव्हां हे इंद्रा, **वृत्र-अहीस** तू आपल्या सामर्थ्यानें मारून टाकलेंस त्या वेळीं तूं, सर्वांच्या चांगल्या दृष्टीस पडेल अशा रीतीनें, सूर्याची द्युलोकात स्थापना केलीस. ४

युक्तिप्रयुक्तीच्या बळावर तू कपटी शत्रूचा धुव्वा उडविलास व त्याचप्रमाणे जे लोक तुझी थट्टा करण्याकरिता तुला हवि अर्पण करण्याचें ढोंग करीत असत त्यांनाही तूं आपल्या युद्धपद्धतीनें चीत केलेस, मानवांचे कल्याण करण्याची इच्छा धारण करणाऱ्या ( हे इंद्रा ) तूं **पिप्रू**च्या पुरांचा विध्वंस केलास, आणि **दस्यु** मारावयास आले असतां **ऋजिश्वाना**चे सरक्षण केलेस. ५ ( ९ )

**शुष्ण** मारावयास धांवला असतां तू **कुत्सा**चें संरक्षण केलेंस आणि **अतिथिग्वा**चा पक्ष घेऊन **शम्बरा**चा चुराडा करून टाकलास. **अर्बुद** एवढा मोठा असतांही तूं त्यावर पाय देऊन उभा राहिलास. **दस्यूं**चे हनन करण्याकरितांच तूं पुरातनकालापासून जन्म घेत आला आहेस. ६

तुझे ठिकाणीं सर्व सामर्थ्य पूर्णपणे सुस्थापित झाले आहे; सोमपानासाठीं तुझ्या आनंदाला उकळी येत असते. बाहूवर ठेवलेल्या तुझ्या वज्राची ( सर्वांस ) ओळख आहे. ( ते घेऊन ) तूं शत्रूच्या अखिल सामर्थ्यांचें विदारण कर. ७

---

१ शुष्णे ।　२ हत्येषु ।　३ हर्षते ।

**आर्य** कोण आणि **दस्यु** कोण हें नीट ओळखून ठेव आणि जे तुझी आज्ञा न पाळणारे आहेत त्यांस शासन करून आपल्या उपासकांपुढें त्यांना शरण यावयास लाव. तूं सामर्थ्यवान् आहेस. आपल्या भक्तांस तूं ( उत्कर्षाप्रत ) पोंचीव. तुझे सर्व पराक्रम यज्ञामध्यें ( गात असतां ) मला आनंद देतात. ८

जे इन्द्राची आज्ञा मानतात त्यांच्या पुढें त्याच्या आज्ञांस न जुमानणाऱ्या लोकांना वांकावयास लावून हा इन्द्र भक्तांकडून भक्तिहीनांचा नाश करवीत असतो. **वम्र** तुझें स्तवन करीत असल्यामुळें त्याला त्याच्या शत्रूने सांठवून ठेवलेल्या संपत्तीचा विध्वंस करतां आला. हा त्याचा शत्रू अगोदरच फार बलिष्ठ झालेला असूनही त्याचें बल वाढतच चाललेलें होतें व तो स्वर्गापर्यंत जाऊन भिडला होता. ९

**उशनानें** आपल्या शक्तीच्या योगानें जे सामर्थ्य तुझ्याकरिता निर्माण केलें त्या सामर्थ्यांत इतके बल आहे कीं तें द्युलोक व भूलोक ह्या दोहोंसही भारी होऊन बसले आहे. मानवांचे हित करण्याची बुद्धि बाळगणाऱ्या ( हे इन्द्रा ), स्वतःस रथाला आपोआप जोडून घेणाऱ्या वायूच्या अश्वांनीं, सर्वत्र भरून राहणाऱ्या तुला, पुष्कळ कीर्ति प्राप्त करून दिली आहे. १० ( १० )

ज्या वेळीं **उशनाकाव्या**सहवर्तमान इन्द्र संतुष्ट झाला त्यावेळीं ऐटीनें वांकडे वांकडे चालणाऱ्या अशा अश्वांतील अतिशय उत्कृष्ट अश्वांवर त्यानें आरोहण केलें. त्या प्रतापी देवाने प्रवाहरूपानें जलांनां मोकळे सोडून त्यांस शीघ्रगति आणली आणि **शुष्णा**च्या बळकट किल्ल्याचें त्याने विदारण केलें. ११

---

१ शाकी । २ अनाभुवः ।

३ नृमणः । ५ वंकुतरा ।

सामर्थ्यवान् पुरुष ज्याचें प्राशन करितात त्या सोमरसाचा आस्वाद घेत असतां तू रथावर आरूढ होतोस. **शार्याता**चे सोमरसाचे चमस तयार आहेत. तुलाही त्यामुळें फार आनंद होतो. हे इन्द्रा ! ज्या ज्या प्रमाणानें ( आम्हीं ) सिद्ध केलेल्या सोमरसाविषयीं तुझी आवड वाढत जाते त्या त्या प्रमाणाने तू द्युलोकांत आपोआप कीर्तीस पात्र होत जातोस. १२

हे इन्द्रा, तुझे स्तोत्र गाणाऱ्या व तुला सोमरस अर्पण करणाऱ्या वृद्ध **कक्षीवाना**स तूं कोमल वयाची **वृचया** अर्पण केलीस. हे बुद्धिसामर्थ्यवान् देवा ! तूच **वृषणश्वा**ची कन्या **मेना** ही बनलास. हीं तुझीं सर्व कृत्ये यज्ञांत गाण्यास योग्य आहेत. १३

विपत्कालीं सदाचारी लोकांनीं **इन्द्राचा**च आश्रय केलेला आहे. जसा दाराचा खांब कधीं ढळत नाहीं त्याप्रमाणें **पज्रां**चे कुलांत **इंद्रा**ची पूजा कधींही चुकावयाची नाहीं. अश्व, धेनु, रथ व वित्त ह्यांची आवड धरणारा व दानकर्मात शूर असणारा **इन्द्र** हाच एकटा सर्व वैभवांचा स्वामी आहे. १४

सामर्थ्यवान्, स्वतेजाने युक्त, सत्य कार्यात बलाचा विनियोग करणारा आणि शक्तिसपन्न अशा इंद्राचे सन्मानार्थ ही नम्र स्तुति आम्हीं ह्मटली आहे. हे इन्द्रा ! आमच्या पदरचे सर्व पराक्रमी पुरुष व विद्वान् लोक ह्यांचेसह ह्या सकटसमयीं तुझ्या कृपेचा आधार आह्मी मानून राहूं १५ (११)

---

१ वाकनः । २ अर्भाम् । ३ निरेके ।

जर खरोखर, हे इंद्रा ! पृथिवी दमपट मोठी वाढेल आणि मनुष्याचें आयुष्य चिरकाल टिकणारें होईल, तरच हे उदार ( देवा ), तुझे विख्यात सामर्थ्य, शक्ति आणि पराक्रम ह्या बाबतींत, द्युलोकात मावू लागेल. ११

मनांत अतिशय उत्साह बाळगणाऱ्या हे इन्द्रा, स्वसंरक्षण करण्यास स्वतःच्या पराक्रमानेंच समर्थ असणारा जो तू त्याने रजोलोकाच्या व आकाशाच्या पलीकडे ( राहून ) या पृथिवीस आपले सामर्थ्य मोजण्याचे मापच बनविलेले आहे. तू उदक व प्रकाश यांस व्यापून द्युलोकातही प्रवेश करितोस. १२

तू ह्या पृथिवीस मापून टाकले आहेस व ज्यांत अत्युच्च योग्यतेचे शूर पुरुष आहेत अशा विशाल ( स्वर्गलोकाचा ) तूं स्वामी होऊन बसला आहेस. तूं आपल्या सामर्थ्यानें सर्व अन्तरिक्ष व्यापून टाकिले आहेस. खरोखर तुझ्यासारखा ( ह्या जगांत ) दुसरा कोणीही नाहीं. १३

ज्याच्या व्यापकपणाची सर द्युलोक अथवा भूलोक ह्या दोहोंसही आलेली नाहीं व ज्याचा अन्त अंतरिक्षातल्या नद्यासही लागला नाही, त्याचप्रमाणे सोमरसाच्या आनंदाचे भरात, उदकास प्रतिबंध करणाऱ्या **वृत्रा**शी युद्ध करीत असताही, ( ज्याचे पूर्ण ज्ञान कोणासही झाले नाही ), अशा तूं, एकट्याने, आत्मव्यतिरिक्त सर्व जगतास, स्वतःस वश करून ठेवलें आहेस. १४

ज्यावेळी आपल्या तीक्ष्ण शस्त्राने, हे इन्द्रा, तू वृत्राच्या मुखावर वार केलास त्यावेळीं त्या युद्धप्रसंगी **मरुतां**नी तुझे पूजन केले व सर्व देवानीं तुला प्रोत्साहन दिले. १५ ( १४ )

## सूक्त ५३

ऋषि--सव्य आंगिरस, देवता--इन्द्र ।

ह्या श्रेष्ठ इन्द्रास उद्देशून आम्ही स्तोत्र गाण्यास बसतो. **विवस्वाना**चे सदनांत आम्ही त्यास स्तुति अर्पण करितो. निजल्या निजल्या ( ज्याप्रमाणे एखाद्यास ) कोणीं द्रव्य आणून द्यावे, त्याप्रमाणे त्यानें आम्हास संपत्ति अर्पण केली आहे. ( अशा ) धनदात्याची वाईट स्तुति कोणी कधीही करीत नसतात. १

तूं अश्व देणारा, धेनु देणारा व धान्य देणारा असून सर्व संपत्तीचा स्वामी व प्रभु आहेस. पुरातन कालापासून तू मानवांचा मार्गदर्शक आहेस; तू कोणाच्या आशेचा कधीही भंग केलेला नाहींस; तू आपल्या मित्राचा ( जिवलग ) मित्र आहेस; तूं असा थोर असल्या-कारणानें आह्मीं तुझ्या सन्मानार्थ हें स्तोत्र गातों. २

हे ज्ञानसामर्थ्ययुक्त इन्द्रा, हे अनेक महत्कृत्ये करणाऱ्या व अत्यंत दीप्तिशाली देवा, जे हें वैभव सभोंवार प्रकाशमान होत आहे, ते तुझेंच आहे. ह्यासाठीं, शत्रूस पराभूत कर-णाऱ्या हे इन्द्रा, तें घेऊन आह्मांस आणून दे. तुझी भक्ति करणाऱ्या तुझ्या स्तोत्याचा मनो-रथ भग्न होऊं देऊं नकोस. ३

ह्या ( यज्ञांतील ) अग्निज्वालांनीं व ह्या सोमरसाच्या बिंदूनीं मनांत संतुष्ट होऊन तू धेनु व अश्व हीं आह्मांस देऊन आमचे दारिद्र्य नष्ट कर. सोमरस अर्पण करून इन्द्राचे हातून **दस्यूं**चा वध करवून घेऊन आह्मी शत्रूपासून अगदी निर्मुक्त होऊ व धनधान्याने समृद्ध बनू. ४

आह्मी संपत्तीने, धान्यसंचयाने, व अनेक तऱ्हेने आनंदकारक व तेजस्वीपणानें युक्त अशा सामर्थ्याने सुसमृद्ध होऊं. त्याचप्रमाणे जिच्यामुळे आमच्या पदरच्या शूर पुरुषांचें बल दृष्टीस पडेल व जिच्यात धेनूचा लाभ प्रमुख असून अश्वही मिळण्याजोगे आहेत अशा तुझ्या दिव्य कृपेचीही आह्मांस प्राप्ति होईल. ५ ( १५ )

वृत्रहननप्रसंगीं, हे सज्जनाच्या नायका ( इन्द्रा ), त्या आनंदकारक पेयांनीं, त्या उत्साहवर्धक हवींनीं, व त्या सोमरसांनी, तुला ( खचित ) नवीन आवेश आला. कारण, ( त्याचे भरात ), तुझ्याकरिता दर्भासन मांडून तुझी कीर्ति गाणाऱ्या भक्ताकरितां, तूं कोणाच्या प्रतिरोधाची पर्वा न करितां, दहा हजार **वृत्रां**ना कापून काढलेस. ६

ज्यावेळीं हे इन्द्रा, तुझा जिवलग भक्त जो **नर्मी** त्यास बरोबर घेऊन तूं **नमुचि** नांवाच्या कपटी ( राक्षसास ) अत्यंत दूर अशा प्रदेशांत जाऊन कापून काढलेस, तेव्हां ( रणसंग्रामांत ) मोठ्या आवेशानें शिरणारा जो तू त्या तुला युद्धापासून युद्ध करावे लागले व आपल्या सामर्थ्याने पुरामागून पुरांचा तू विध्वंस करीत सुटलास. ७

**अतिथिग्वा**च्या अत्यंत तेजस्वी चक्राच्या योगानें तूं **करंज** व **पर्णय** ह्यांचा वध केलास. **ऋजिश्वाना**नें वेढा दिलेलीं **वृंगदा**ची शंभर पुरें तूं उद्ध्वस्त करून टाकलींस. तुझ्या दातृत्वास ( खरोखर ) कोणाचीही जोड मिळणार नाहीं. ८

तूं सत्कीर्तीनें मंडित आहेस. ज्यावेळीं **सुश्रवस** ह्याला सहाय्य करण्यास कोणी नाहीं असें पाहून वीस राजांनीं त्याचेवर स्वारी केली त्यावेळीं ज्याचेपुढें कोणाचा टिकाव लागणार नाहीं असें एक रथचक्र घेऊन तू त्यांचा व ( त्याबरोबरच ) त्यांच्या साठ हजार नव्याण्णव लोकांचा तूं उच्छेद करून टाकलास. ९

हे इन्द्रा, तूं आपल्या कृपाछत्रामुळें **सुश्रवसाचें** संरक्षण केलेंस व आपलें साहाय्य देऊन **तुर्वयाणा**चा बचाव केलास. तूं ह्या श्रेष्ठ व तरुण नृपतीपुढें **कुत्स, अतिथिग्व** व **आयु** ह्यांना शरण यावयास लाविलेंस. १०

सर्व देवांच्या संरक्षणाखालीं असलेल्या आह्मांस तुझे जिवलग भक्त होऊन इतउत्तरही सौख्यांतच असूं दे. अत्यत दीर्घ व चिरकालिक आयुष्याचा; उपभोग घेत तुझ्या कृपेनें प्राप्त झालेल्या आमच्या पदरच्या शूर माणसांसह तुझें स्तवन करीत आह्मांस बसूं दे. ११ ( १६ )

## सूक्त ५४.

ऋषि—सव्य, आंगिरस देवता—इन्द्र ।

हे उदार देवा, ह्या युद्धांत अशा कठिण प्रसंगीं आम्हांस मोकळू नकोस. खरोखर तुझ्या सामर्थ्याचा अत लागणें अशक्य आहे. तूं गर्जना केल्याबरोबर नद्या व वृक्ष ह्यांना मोठ्यानें ओरडावयास लाविलेंस. (अशा स्थितींत) तुझ्या भीतीनें मनुष्ये एकत्र कशीं जमणार नाहींत बरें ? १

सामर्थ्यवान, पराक्रमी व बलवान् इन्द्राचें अर्चन करा. ( भक्तांची हांक ) ऐकण्यास तयार असलेल्या इंद्राचा गौरव करून त्याचे स्तवन करा. शक्तिसामर्थ्यानें युक्त असा हा (इन्द्र) आपली धाडशी शक्ति व वीर्य ह्याच्या योगानें द्युलोक व भूलोक ह्या दोहोंसही भूषित करितो. २

ज्या शूराचे अंतःकरणांत स्वतःच्या सामर्थ्याविषयीं विश्वास असून त्याची धाडसाकडे प्रवृत्ति आहे त्या देदीप्यमान व श्रेष्ठ ( इन्द्रास ) उद्देशून एकादें जोरदार स्तोत्र म्हणा. त्याची कीर्ति विशाल आहे. तो ( शत्रूचा ) नाश करणारा आहे, तो पराक्रमी आहे, तो हरिद्वर्ण अश्व रथाच्या पुढें जोडीत असतो. तो सामर्थ्यवान् आहे व ( भक्तांकडे जाणारा ) तो ( जणूं काय ) रथच आहे. ३

ज्यावेळीं हातांत बळकट धरलेल्या तीक्ष्ण अशा वज्रानें, तूं तुला आनंद देणाऱ्या सोमरसाच्या योगानें स्फुरण चढल्यामुळे, कपटी (राक्षसांच्या) चमूशीं युद्ध केलेंस त्यावेळीं विस्तीर्ण द्युलोकाचें शिखरही तूं हालवयास लाविलेंस व आपल्या जोराच्या प्रहारानें शंबराचें शरीर विदीर्ण केलेंस. ४

ज्या अर्थी वृक्षांना रुदन करावयास लावून **शुष्णा**च्याही सैन्यास तूं वायूच्या शिखरावर नेऊन कापून काढिलेंस आणि ज्या अर्थी आपल्या उत्साही मनाची प्रवृत्ति ( अशाच पराक्रमाकडे ठेवून अजून सुद्धां तूं ( असे पराक्रम ) गाजवीत असतोस त्या अर्थी तुझ्यापेक्षा श्रेष्ठ कोण आहे? ५ ( १७ )

तूं **नर्य, तुर्वश** व **यदु** ह्यांचे रक्षण केलेंस. हे सामर्थ्यवान् ( इन्द्रा ) तूं **वय्य तुर्वीती**चेंही रक्षण केलेंस. संग्रामाचा प्रसंग प्राप्त झाला असतां तूं **रथ** आणि **एतश** ह्यांचें रक्षण केलेंस आणि ( शत्रूंचीं ) नव्याण्णव पुरें फोडून टाकलींस. ६

( इन्द्रास ) हवि अर्पण करून जो त्याच्या अनुशासनाप्रमाणें चालतो तो सज्जनांतील प्रमुख मनुष्य, राजा होऊन, अभिवृद्धीस पावतो. अथवा जो संतोषदायक हवि अर्पण करून त्यास उद्देशून स्तोत्रें ह्मणतो, त्याचेसाठीं वरून द्युलोकांतून, विपुल ( धनाची ) वृष्टि होते. ७

तुझ्या बलास सीमा नाहीं, तुझ्या बुद्धिमत्तेसही सीमा नाहीं. जे सोमपान करणारें तुझे उपासक, दानकर्मांत प्रवीण अशा तुझ्या श्रेष्ठ सामर्थ्याची व विशाल शक्तीची थोरवी गातात, ते आपल्या सत्कृत्यांनीं अभिवृद्धीला पोंहोंचोत. ८

पाषाणाच्या केलेल्या उलूखलांत घालून पिळलेले, पात्रांत भरून ठेवलेले व ( इन्द्रा, ) तूं प्राशन करावेंस ह्याच हेतूने तयार केलेले हे सोमरसाचे अनेक चमस तुझ्याचकरितां ठेवलेलें आहेत. तूं त्याचे प्राशन कर, ह्यांच्या संबंधानें तुझी जेवढी वांछा असेल तेवढी तृप्त करून घे, आणि आह्मांस संपत्ति देण्याकडे आपल्या मनाची प्रवृत्ति कर. ९

अंधकार, उदकांच्या प्रवाहास बंद करून, बसलेला होता, आणि पर्वतही वृत्राच्या जठरांत होता. पण इन्द्रानें त्या ( जलांस ) प्रतिबंध करणाऱ्या राक्षसानें अडविलेल्या नद्यांस, त्या सर्वांनीं सखल प्रदेशातून एकीप्रमाणें दुसरीनें, दुसरीप्रमाणें तिसरीनें, वहावें ह्या उद्देशानें वाट फोडून दिली. १०

तर आतां आह्मांस हे इन्द्रा, आमचें सौख्यवर्धन होईल असे वैभव अर्पण कर, आणि लोकांपेक्षां वरचढ असें विपुल शौर्य व बलही आह्मांस दे. हे औदार्यशाली देवा, आमचें रक्षण व आमच्या पदरच्या विद्वान् लोकांचेही परिपालन कर आणि आह्मांस असे वैभव व समृद्धि दे कीं जिच्यांत उत्तम संततीचाही समावेश होईल. ११ ( १८ )

## सूक्त ५६.

ऋषि–सव्य आंगिरस, देवता–इन्द्र ।

ह्याचा श्रेष्ठपणा द्युलोकाहूनही ज्यास्त आहे. पृथिवीसुद्धां आपल्या मोठेपणांत इन्द्राची बरोबरी करूं शकणार नाहीं. हा ( शत्रूस ) भीतिप्रद, सामर्थ्यवान्, व मानवांकरितां आपला प्रताप गाजविणारा असून, एखादा वृषभ ( आपल्या शिंगांस तीक्ष्णता आणण्याकरितां ) ती जशीं पाजळतो त्याप्रमाणे आपलें वज्र ज्यास्त तीक्ष्ण व्हावें म्हणून तो त्याची धारा तिखट करतो. १

समुद्रामध्ये निवास करून, एखाद्या महासागराप्रमाणें, त्याच्या आश्रयार्थ येणाऱ्या सर्व नद्यांचा, तो आपल्या श्रेष्ठ सामर्थ्याच्या योगाने स्वीकार करितो, आपणास सोमाचे प्राशन घडावें ह्मणून एखाद्या वृषभाप्रमाणे तो आपली शक्ति प्रदर्शित करितो. त्याच्या ( अलौकिक ) बलामुळें ह्या योद्धा सनातनकालापासून स्तवनास पात्र झालेला आहे. २

हे इन्द्रा ! त्या पर्वतास जणूं काय ग्रासून टाकण्याकरितांच तूं अतिशय पौरुष आणि पराक्रम स्वतः करितां प्राप्त करून घेतोस; ( सर्व अद्भुत ) कृत्यांत हा उग्र ( इन्द्र ) पुढाकार घेत असून आपल्या सामर्थ्यांत सर्व देवतांस तो मागें टाकतो. ३

सर्व लोकांमध्यें आपल्या कल्याणप्रद सामर्थ्याची प्रसिद्धि करणाऱ्या या एकट्या इन्द्राचीच नमस्कृतिपूर्वक स्तुति होत असते. ज्यावेळी हवि अर्पण करणारा भक्त स्वकल्याणाच्या इच्छेनें ( इन्द्राच्या ) स्तुतीस प्रवृत्त होतो, त्यावेळीं हा पराक्रमी इन्द्र त्याचेवर संतुष्ट होतो, त्याचेपुढें तो आपलें रमणीयत्व प्रकट करितो. ४

हाच योद्धा आपले बल व सामर्थ्य ह्याचे योगानें जनहिताकरितां मोठमोठीं युद्धें करितो, आणि ह्मणूनच ह्या तेजस्वी व घातुक वज्राने शत्रूंवर पुनःपुन्हां प्रहार करणाऱ्या इन्द्रावर ( सर्वलोक ) श्रद्धा ठेवतात. ५ ( १९ )

खरोखर कीर्तीची इच्छा असलेल्या ह्या सामर्थ्यवान् इन्द्रानें, पृथिवीप्रमाणें विशाल रूप धारण करून, आपल्या पराक्रमानें ( शत्रूंनीं ) बांधलेल्या सदनांचा विध्वंस करून आणि यजन करणाऱ्या भक्ताकारितां ( आकाशस्थ ) ज्योतींना त्रासापासून विमुक्त करून, जलांचे प्रवाह पुन्हां वाहूं लागावे ह्मणून त्यांस बंधमुक्त केले. ६

हे सोमप्राशन करणाऱ्या इन्द्रा ! तुझें मन आह्मांविषयीं दातृत्वबुद्धि धारण करो आणि आमच्या नम्र स्तुति ऐकणाऱ्या हे देवा, तू आपले पीतवर्ण अश्व आमचेकडे वळीव. इन्द्रा, तुझे सारथी तुझ्या अश्वांस ताब्यात ठेवण्यांत अत्यंत कुशल आहेत, आणि ह्मणून तुझे अश्व कितीही चपल असोत; ते तुला भलतीकडेच घेऊन जात नाहींत. ७

हे इन्द्रा, तूं विख्यात आहेस; ज्यास कधीं विनाश नाहीं असें वैभव तूं आपले हातांत वागवितोस. तूं शत्रूस वरचढ करण्यास कठिण असे सामर्थ्य आपले अंगीं धारण केलें आहेस. कर्तृत्ववान् पुरुष ज्याचे सभोंवती उभे आहेत अशा विहिरीप्रमाणें शोभणाऱ्या तुझ्या अनेक शक्ति, हे इन्द्रा! तुझ्या शरीरांत निवास करून रहात आहेत. ८ ( २० )

# सूक्त ५६

ऋषि--सव्य आंगिरस; देवता—इन्द्र ।

ज्याप्रमाणें एखादा तुरग तुरगीकरितां उत्सुक होतो, त्याप्रमाणें ह्या उपासकानें चमसांत भरपूर भरून ठेवलेला सोमरस पिण्यास हा उतावीळपणानें उद्युक्त झाला आहे. ज्यास पीतवर्ण अश्व जोडलेले आहेत असा आपला मोठा रथ इकडे फिरवून हा इन्द्र महत्कार्यास अत्यवश्यक असा सामर्थ्यदायक सोमरस प्राशन करितो. १

ज्याप्रमाणें प्रवासास निघण्याचेवेळीं धनार्जनेच्छु ( धाडसी ) लोकांची समुद्रावर गर्दी होते, त्याप्रमाणें हवि सिद्ध करून तयार असलेल्या स्तोत्रजनांची ह्याचे सभोंवती गर्दी जमते. यज्ञाचें केवळ बलच असा जो हा सामर्थ्याधिपति ( सूर्य ) त्यास ( हे देवा ), ज्याप्रमाणें ह्या सुंदर युवति ( ह्म. उषा ) पर्वतावर आरूढ झालेल्या आहेत त्याप्रमाणें, पर्वतावर संस्थापित कर. २

तो शत्रूंचा नाश करणारा व श्रेष्ठ आहे. त्याचे अत्यंत शुद्ध बल आपल्या सामर्थ्यानें प्रत्येक युद्धांत गिरिशिखराप्रमाणे चमकत असतें. ह्या बलाच्या योगानें ह्या अजिंक्य देवानें ( सोमरसामुळें उत्पन्न झालेल्या ) आनंदाच्या भरांत आपलें लोखंडी वज्र घेऊन, कपटी शुष्णाचा ( पराभव केला व त्यास ) शृंखलाबद्ध करून कारागृहांत कोंडून टाकलें. ३

ज्यावेळीं तूंच लहानपणापासून वाढविलेली शक्तिरूपी देवता, ज्याप्रमाणें सूर्य उषेवर आसक्त होतो त्याप्रमाणे, स्वसरक्षणार्थ इन्द्राचा आश्रय करते त्यावेळीं आपल्या प्रतापी सामर्थ्यानें अंधकाराचा नाश करणारा हा देव जयघोष करीत सर्व मलिनतेस दूर घालवून देतो. ४

जेव्हां तूं आपल्या सामर्थ्यानें द्युलोकाच्या सीमेवर रजोलोकाची दृढपणे व सुस्थिरपणें संस्थापना केलीस व जेव्हां ( सोमरसामुळें उत्पन्न झालेल्या ) हर्षाच्या भरांत तूं मोठ्या आवेशानें वृत्राचा युद्धांत वध केलास तेव्हां उदकाचा संचय तुझे हातून बंधमुक्त झाला. इन्द्रा, तूं श्रेष्ठ आहेस, तू पृथिवीच्या प्रदेशांत आपल्या सामर्थ्यानें आकाशाच्या बालकास घेऊन येतोस. सोमरसामुळे उत्पन्न झालेल्या हर्षाचे भरांत तू उदकांना वाट फोडून दिलीस व वृत्राच्या दगडी तटांचा उच्छेद करून टाकलास. ६ ( २१ )

# सूक्त ५७

ऋषि–सव्य आंगिरस, देवता–इन्द्र ।

अत्यंत उदार, श्रेष्ठ, अत्यंत वैभवशाली, सत्य, सामर्थ्यवान् व पराक्रमाचा पुतळाच अशा ( ह्या देवा ) प्रीत्यर्थ मी स्तुति अर्पण करितों. ज्याप्रमाणें उतार जमीनीवर पाण्याचा झोत सुरू झाला ह्मणजे तो कोणत्याही प्रतिबंधास न जुमानतां सर्वत्र पसरतो त्याप्रमाणें सर्वत्र दृग्गोचर होणाऱ्या व अखड सुरू असणाऱ्या कृपाप्रसादाचीं कपाटें ( भक्तांचे अंगीं ) सामर्थ्य आणण्याकरितां सदैव खुलीं असतात. १

ज्यावेळीं सुवर्णमय, सुदर परतु प्राणघातक वज्र पर्वतावर फेकल्याप्रमाणे ( वृत्राच्या शरीरावर जाऊन ) पडलें त्यावेळीं सर्व विश्व तुझें पूजन करण्यास प्रवृत्त झालें व सखल जमीनीकडे पाण्याचा ओघ जसा ( भराभर वहात जातो ) त्याप्रमाणे भक्तांचे हवि ( तुझ्याकडे एकसारखे येऊं लागले ). २

ज्याचे तेज, ज्याचे नाम, ज्याचे बल व ज्याचा प्रकाश यांची चोहोंकडे प्रशसा व्हावी ह्मणून तूं त्याना सर्वत्र प्रसृत होण्याकरितां, त्या ( इन्द्राच्या ) पीतवर्ण अश्वांप्रमाणेंच प्रवृत्त केलेस, त्या भीतिप्रद पण स्तुतिस्तोत्रे गाण्यास योग्य अशा इन्द्रास , उषेप्रमाणे, कान्तिमान् दिसणारे हे युवति, ह्या यज्ञांत नमस्कृति अर्पण करून घेऊन ये. ३

अनेकांनीं ज्याची स्तुति केली अशा हे वैभवशाली इन्द्रा, आह्मी सर्वस्वी तुझे आहोंत; कारण तुझा आश्रय धरून आह्मी ह्या जगांत नादत असतों. हे स्तुतिप्रिय देवा, तुझ्या वांचून अन्य कोणासही स्तुति प्राप्त होत नाहीत; ह्यासाठी ज्याप्रमाणे पृथ्वी ही ( जीवनमात्रास ) जागा देते तद्वत् तूही आमच्या स्तोत्रांचा स्वीकार कर. ४

हे इन्द्रा ! तुझें बल विपुल आहे; आह्मी तुझे आहोंत. तूं ह्या आपल्या भक्ताची इच्छा पुरीव. या विशाल द्युलोकाने आपलें सामर्थ्य तुझ्या सामर्थ्याशी तोलून पाहिले आहे व ही पृथिवीही तुझ्या पराक्रमापुढे नम्र झाली आहे. ५

हे वज्रधारी इन्द्रा , त्या मोठ्या व विशाल पर्वताचे तूं आपल्या वज्रानें तुकडे तुकडे केलेस. रोखून टाकलेले जलप्रवाह पुन्हां चालू व्हावे ह्मणूनही तूच त्यास मार्ग करून दिलास. खरोखर सर्व सामर्थ्य कायतें तूच एकटा धारण करतोस. ६ ( २२ )

# सूक्त ५८

ऋषि—नोधा गौतम　देवता—अग्नि ।

हा ( देवांस ) हवि नेऊन पोंचविणारा अग्नि **विवस्वाना**चा दूत झालेला आहे; ह्मणूनच हा सामर्थ्यापासून जन्म पावणारा अमर्त्य देव कधींही श्रांत होत नाही. तो उत्तम मार्गांनीं रजोलोकाचे आक्रमण करतो व यज्ञांत ( देवांस ) हवि अर्पण करून त्यांचें आदरातिथ्य करितो.　१

ज्यास जरेची भीति नाहीं असा हा अग्निदेव आपल्या अन्नाचा सत्वर व आतुरतेनें स्वीकार करून काष्ठामध्यें ( प्रज्वलित होऊन ) राहतो. त्यास घृत अर्पण केलें ह्मणजे ह्याचा पृष्ठभाग एखाद्या ( ताज्यातवान्या ) अश्वाप्रमाणें तुकतुकीत दिसतो. ह्यानें जणूं कांहीं स्वर्गाच्याही टोंकापर्यंत प्रतिशब्द उत्पन्न करीत गर्जना केली आहे.　२

जो कर्तृत्वशील आहे, **रुद्र** आणि **वसु** ह्यांनीं ज्यास प्रमुखत्व दिलें आहे, ज्यानें वैभव जिंकून आणलें आहे व ज्यास मृत्युभय नाहीं असा हा हविर्दाता ( अग्नि ) ( येथें ) येऊन विराजमान झाला आहे. हा देव ह्या जगात असणाऱ्या सर्व मनुष्यांत प्रतिष्ठा पावून एखाद्या रथाप्रमाणे एकसारखी संपत्ति घेऊन येत असतो.　३

वायूनें प्रेरित होतांच हा मोठी गर्जना करून आपली जिव्हारूप कोयती बरोबर घेऊन काष्ठसमुदायांत सहज रीतीने ठाणे देतो. ज्वलज्ज्वालांनीं परिवेष्टित व वार्धक्यपीडेपासून निर्मुक्त असणाऱ्या हे अग्निदेवा, जेव्हां तू काष्ठसमुदायांत आपलें सामर्थ्य एकदम प्रकट करतोस त्यावेळीं तुझा मार्ग ( धुरानें ) काळा होऊन जातो.　४

ज्याची दंष्ट्रा ज्वालामय आहे असा हा अग्नि वायूनें प्रेरित होऊन जेव्हां काष्ठसमुदायांत शिरतो त्यावेळीं एखादा शक्तिमान् वृषभ जसा आपल्या कळपांत निर्भय संचार करतो, तसा हा संचार करूं लागतो. जेव्हां अविनाशी अशा रजोलोकांतून आपल्या सामर्थ्याने हा गमन करितो, त्यावेळीं सर्व चराचर सृष्टीस ह्या **पक्षिराजा**चे भय वाटूं लागतें.　५ ( २३ )

सपत्तीप्रमाणें मोहक असणारा, सर्व लोकांस हांक मारण्यास सुलभ वाटणारा, व दिव्य-लोकांतील पुरुषांना मित्राप्रमाणें सौख्यदायक असणारा असा हा जो श्रेष्ठ हविर्दाता, तो तूं हे अग्निदेवा जेव्हां भृगूंचा अतिथि झालास तेव्हां त्यांनी तुला मानवसमुदायांत सन्मानानें जागा दिली. ६

( भक्तांस ) सर्व संपत्ति अर्पण करणाऱ्या अग्नीचें मी हवींनीं पूजन करतों व त्यामुळें मला उत्कृष्ट सपत्तिही प्राप्त होते. हा अग्नि (देवांस ) हवि पोंचविणारा असल्यामुळें ह्या यज्ञार्ह अग्नीचें यज्ञांत आगमन व्हावें अशी हवि अर्पण करणारे सप्त ऋत्विज् ( नेहमीं ). इच्छा करीत असतात. ७

सामर्थ्यापासून जन्म पावणाऱ्या व स्वमित्रांस आनद देणाऱ्या हे अग्निदेवा ! तुझें स्तवन करणाऱ्या भक्तांस तूं आज अक्षय्य सुख प्राप्त करून दे. हे शक्तिपुत्र अग्ने, तुझी स्तुति गाणाऱ्या सेवकांस लोखडी तटांचीं नगरें बांधून देऊन तू त्यांचें सकटांपासून सरक्षण कर. ८

हे दीप्तिमान् अग्निदेवा, तुझी स्तुति करणाऱ्या भक्ताचे तू कवच हो; हे उदार देवा जे तुला हवि अर्पण करतात त्यास तू प्रत्यक्ष कल्याणस्वरूपच हो. अग्ने, तू आपल्या स्तोतृजनांचें सकटापासून सरक्षण करीतच असतोस, तेव्हां असंख्य स्तुति स्तोत्रांनीं मंडित असा हा ( अग्नि, देव ) प्रात:काळीं लवकरच ( आमच्या यज्ञाकडे ) येवो. ९ ( २४ )

## सूक्त ५९.

ऋषि--नोधा गौतम; ॥ देवता—अग्नि वैश्वानर ॥

हे अग्निदेवा, इतर सर्व अग्नि ह्या तुझ्या शाखा आहेत. सर्व अमर ( देव ) तुझ्याच ठिकाणीं अत्यंत संतोष पावतात. सर्व विश्वाविषयीं मित्रत्व धारण करणाऱ्या हे अग्निदेवा, तूं सर्व पृथ्वीचा मध्यबिंदु आहेस. १

अग्नि हा द्युलोकाचे मस्तक आणि पृथिवीची नाभि आहे; शिवाय हा द्युलोक व भूलोक ह्यांचा आधिपति झाला आहे. सर्व विश्वाविषयीं मित्रत्व धारण करणाऱ्या हे अग्निदेवा, तूं असा श्रेष्ठ देव असल्यामुळे तू आर्यजनांची ( मार्गदर्शक अशी ) ज्योतिच व्हावेंस ह्या हेतूनें तुला देवांनीं निर्माण केलें. २

ज्याप्रमाणें सूर्याचे ठिकाणीं रश्मींचा निरंतर वास असतो त्याप्रमाणें सर्व विश्वाविषयीं मित्रत्व धारण करणाऱ्या ह्या अग्नीचे ठिकाणीं सर्व वैभवें संस्थापित झालेलीं आहेत. ज्या द्रव्यानिधींचा, पर्वत, वनस्पति अथवा मर्त्यलोक ह्यांचे ठिकाणीं निवास असतो त्या सर्वांचा तूंच एकटा राजा आहेस. ३

जणू कांहीं ह्या उदार अग्निप्रीत्यर्थच द्युलोक व भूलोक इतके विस्तीर्ण झालेले आहेत. ह्या प्रकाशमान, सत्यबलानें युक्त, सर्व विश्वाविषयीं मित्रभाव धारण करणाऱ्या व सर्व शूरांमध्ये श्रेष्ठ अशा ( अग्निदेवास ) हा उपासक एखाद्या प्रज्ञावान् पुरुषाप्रमाणें मोठीं मोठीं अशीं असंख्य स्तोत्रे अर्पण करीत आहे. ४

सर्व विश्वाविषयीं मित्रत्व धारण करणाऱ्या हे सर्वज्ञ अग्निदेवा, तुझा महिमा ह्या विस्तीर्ण द्युलोकासही पुरून उरला आहे. तू सर्व मानवसमुदायाचा राजा आहेस. राक्षसांशीं युद्ध करून तूं देवांना सुरक्षितपणा उत्पन्न केलास. ५

वृत्राचा वध करणाऱ्या ज्या ( अग्नीचा ) आश्रय सर्व लोक शोधतात त्या सामर्थ्यवान् देवाचा महिमा ( ह्या स्तोत्रांत ) मी गाइत आहे- सर्व विश्वाविषयीं मित्रत्व बाळगणाऱ्या ह्या अग्नीनें **दस्यूंचा** वध करून ( उदकाचे मार्गांतील ) प्रतिबंध नाहीसा केला व **शम्बरास** छिन्नविच्छिन्न करून टाकले. ६

सर्व विश्वाविषयीं मित्रत्व धारण करणारा व आपल्या सामर्थ्यानें सर्वत्र वास करणारा असा हा पूज्य व दीप्तिमान् अग्नि **भारद्वाज**कुलांतील पुरुषांमध्ये ( येऊन विराजमान झाला आहे. ) ज्याची वाणी मधुर परंतु सत्यपरिप्लुत आहे अशा अग्नीची **शांतवनेय** व **पुरुणीथ** ह्यांच्या यज्ञात शेकडो स्तोत्रानी स्तुति झालेली आहे. ७ ( २९ )

# सूक्त ६०

ऋषि--नोधा गौतम ॥ देवता--अग्नि ॥

जो ( आमचे हवि देवताप्रत ) पोंचविणारा आहे, जो मूर्तिमन्त कीर्तिच आहे, यज्ञाची जो केवळ ध्वजाच होय, जो यज्ञगृहांत ठेवण्यास अत्यंत योग्य आहे, जो आमचा दूत होऊन देवांकडे त्वरेनें गमन करितो, जो दोन वेळां जन्मास येत असतो, उत्कर्षाप्रमाणे जो प्रशसनीय आहे व जो केवळ वैभवाची मूर्तिच होय अशा त्या अग्नीस **मातरिश्वा** भृगूकरितां घेऊन आला. १

हवींचे ग्रहण करण्याविषयीं उत्सुक असलेले ( जे देव ) व जे मर्त्यलोकांतील ( मानव आहेत ते ) अशा रीतीने उभयलोक ह्याची आज्ञा मान्य करीत असतात. ( सर्व लोकांस ) जो सन्मानानें सत्कार करण्यास योग्य आहे, जो सर्व मानवामध्यें त्याचा राजा होऊन वर्तन करितो व ज्याचें कर्तृत्व विलक्षण आहे असा हा हविर्दाता सूर्योदयापूर्वीच येथे येऊन स्थानापन्न झाला आहे. २

ज्यास त्याची उपासना करणारे ह्या जगांतील मानव आपले सकटसमयीं हवींनीं प्रज्वलित करीत आले आहेत त्या ( भक्तांच्या ) हृदयात प्रकट होणाऱ्या व मधुर भाषण करणाऱ्या अग्नीस हें आम्हीं मनःपूर्वक गाइलेले नवीन स्तोत्र जाऊन पोहोचो. ३

( हवींकरितां ) उत्सुकता बाळगणारा ( सर्व जगास ) पावन करणारा आणि प्रत्यक्ष वैभवच ( कीं काय ) असा जो श्रेष्ठ हविर्दाता अग्नि त्याची येथे मर्त्य अशा मानवांच्या समुदायांत स्थापना करण्यांत आलेली आहे. आपल्या भक्तांच्या गृहांत निवास करणारा व गृहांत गृहाचा अधिपति ह्मणून शोभणारा असा जो अग्नि त्याचेकडेच सर्व सपत्तींचें प्रभुत्व आजपर्यंत ( निर्बाध ) चालत आलेलें आहे. ४

हे अग्निदेवा ! अश्वाच्या पाठीवरून ज्याप्रमाणे ( एकादा मोतद्दार ) हात फिरवितो त्याप्रमाणे सामर्थ्याची प्राप्ति करून देणाऱ्या तुला वारा घालीत आम्ही **गोतम**कुलोत्पन्न ( तुझे भक्त ) सर्व सपत्तींचा स्वामी जो तू त्या तुझी अनेक स्तोत्रांच्या द्वारें स्तुति करितों. स्तुतिस्तोत्रें हेंच ह्या अग्निदेवाचे वैभव आहे. हा प्रातःकालीं लवकरच येथे प्राप्त होवो. ५ (२६)

# सूक्त ६१.

ऋषि-नोधा गौतम ॥ देवता-इन्द्र ॥

प्रबल, त्वरावान् व श्रेष्ठ अशा ह्या ( इन्द्रास ) उद्देशूनच मी हा हवि व त्याचप्रमाणें हें स्तवन अर्पण करितो. मी त्या स्तवनार्ह आणि निर्बाध रीतीनें संचार करणाऱ्या इन्द्रास अनुलक्षून अशी स्तुति ( गातों ) की जी त्यास अर्पण करण्यास योग्य आहे व अशीं स्तोत्रें गातों कीं जीं आजपर्यंत त्याचे सन्मानार्थ केलेल्या स्तोत्रांत उत्कृष्ट आहेत. १

खरोखर ह्या देवास मी जणू कांहीं हविच अर्पण करीत आहे. ह्या ( शत्रू ) विनाशक देवास मी एक सुंदर स्तवन अर्पण करतों. इन्द्र हा जो ( ह्या विश्वाचा ) पुरातन प्रभु त्याचे प्रीत्यर्थ ( विद्वान् उपासकांनीं ) आपले अन्तःकरण, मन, बुद्धि खर्च करून ( अनेक ) स्तोत्रें गाइलेलीं आहेत. २

खरोखर ज्याची उपमा दुसऱ्या स्तोत्रांस देण्यांत यावी व जे प्रकाशाचा लाभ करून देणारे आहे असे स्तोत्र मी त्या ( इन्द्रा ) प्रीत्यर्थच गात आहें. त्या अत्यंत उदार व प्रज्ञाशाली देवाचे माहात्म्य माझ्या मनाजोग्या सुदर स्तुतीनीं वर्णन करण्याचा माझा हेतु आहे. ३

ज्या मनुष्याला रथाची गरज असते त्याचेकडे ज्याप्रमाणें एखादा सुतार रथ तयार करून पाठवितो त्याप्रमाणें खरोखर ह्या ( इन्द्राकडे ) मी आपली स्तुति पाठवीत आहे. त्याचप्रमाणें सुदर सुदर स्तवने व ज्याचा सर्वत्र स्वीकार केला जाईल असे ( एक स्तोत्र ) हीं भक्तांच्या स्तवनांचा स्वीकार करणाऱ्या ह्या इन्द्राकडे मी पाठवून देतो. ४

एखाद्या अश्वास ज्याप्रमाणे सजवून तयार करतात त्याप्रमाणे खरोखर मी कीर्ति प्राप्त करून घेण्याची इच्छा धरून, स्ववाणीने इन्द्राप्रीत्यर्थ एक स्तोत्र नीटनेटकें सजवीत आहे. त्या योगानें वीर्यशाली, सर्व दानशूरतेचे आगर, ( शत्रूंच्या ) पुरांचा विध्वंस करणारा व ज्याची कीर्ति सर्वत्र गात असतात अशा इन्द्रास माझी प्रणति अर्पण करावी अशी माझी इच्छा आहे. ५(२७)

( शत्रूवर ) प्रहार करणाऱ्या ज्या वज्रानें शत्रूंचा संहार करीत ह्या बलशाली विश्वाधिपतीनें **वृत्राच्या** मर्माशीच गांठ घातली तें उज्वल व वधकर्मास अत्यत उपयोगी असें वज्र खरोखर ह्या ( इन्द्रा ) प्रीत्यर्थच **त्वष्टा** देवानें तयार करून दिले. ६

खरोखर ह्याच्या मातेनें केलेल्या यागांतच ह्यानें एकदम उत्कृष्ट पेय प्राशन केले व हवींचा उत्कृष्ट ( आस्वाद घेतला. ) बलवान् विष्णूनेही ( ह्याचेकरितां ) ज्यांची पाकसिद्धि उत्तम झाली होती असे हवि हरण करून आणले. ( त्यांचे भक्षण करून ) अस्त्रविद्येत प्रवीण असलेल्या देवाने, त्या डुकराच्या अंगावर आपले वज्र तिरपे करून फेंकून त्याचा देह छिन्नविच्छिन्न करून टाकला. ७

**अही**चा वध करणाऱ्या ह्या इन्द्राप्रीत्यर्थच स्त्रियांनीही—खुद्द देवांच्या पत्नींनीं—एक सुंदर स्तोत्र गुंफले. विस्तीर्ण असे जे द्युलोक व भूलोक ह्याचे त्याने आकलन केले आहे. परतु ह्याचा महिमा आकलन करण्याचें सामर्थ्य मात्र त्याच्या अगात नाही. ८

खरोखर ह्याचा महिमा द्युलोक, भूलोक व अतरिक्ष ह्या सर्वांहूनही अधिक आहे. स्वतेजानें विराजमान होणाऱ्या इन्द्राचें घरोघरी स्तवन होत असते. हा सामर्थ्यवान् इंद्र (शत्रूंशीं लढण्याकरितां ) उच्च घोष करून ( एकदम ) वृद्धिंगत झाला होता. ९

जगताचें शोषण करणाऱ्या **वृत्रा**स इन्द्रानें स्वसामर्थ्याने वज्र घेऊन छिन्नभिन्न करून टाकलें. आपल्या कीर्तिचा प्रसार करण्याकरिता दानकर्माकडे मनाची प्रवृत्ति असलेल्या ह्या इन्द्राने धेनूप्रमाणें प्रतिबंधांत पडलेल्या जलप्रवाहाना वाट मोकळी करून दिली. १०(२८)

ज्यावेळीं आपल्या वज्राने त्या (वृत्रास) जिकले त्यावेळी हा त्याच्याच सामर्थ्याचा प्रताप, कीं नद्या आनदानें वागडूं लागल्या ! सर्व विश्वावर आधिपत्य स्थापन करणारा, हवि अर्पण करणाऱ्या भक्तांविषयीं दातृत्वबुद्धि धारण करणारा व ( शत्रूचा ) संहार करणारा जो ह्या इन्द्र त्यानेंच **तुर्वीति**करिता ( पाण्यास उतार पाडला. ) ११

तूं जगताचा प्रभु व सामर्थ्यवान् आहेस ह्मणून ह्या वृत्रावर नेम धरून सत्वर वज्र फेंक. उदकांचे प्रवाह पुन्हां वाहूं लागावे ह्मणून त्यांच्यांत गति उत्पन्न करून ह्या ( वृत्राच्या शरीराच्या ) सांध्यासांध्यावर आडवे वार करून एखाद्या बैलाच्या देहाच्या सांध्याप्रमाणें त्यांचें विदारण कर. १२

खरोखर वेगानें ( शत्रूवर तुटून ) पडणाऱ्या ह्या देवाचे पुरातन कालापासूनचे पराक्रम गाऊं लागा. स्तुतींच्या योगाने शरण जाण्यास हा योग्य आहे, कारण लढाई करण्यासाठीं आपली आयुधें सरसावून व ( शत्रूंना ) मारून तो त्यांचा नायनाट करून टाकतो. १३

खरोखर हा जगांत अवतीर्ण झाल्याबरोबर त्याच्या भीतीनें अतिशय स्थिर असे प्रत्यक्ष पर्वत——एवढेंच काय पण भूलोक व द्युलोक ह्यानांही कांपरे भरते, ह्या सुंदर देवाच्या भक्त-संरक्षणसामर्थ्याची प्रशंसा करणारा **नोधा** ह्यास एकाएकीं पुष्कळ पराक्रम करतां येऊं लागले. १४

खरोखर, विपुल ( संपत्तीचा ) एकटाच मालक, असा जो इन्द्र त्याने ह्या सकल वस्तूंपैकीं जी जी वस्तू आपणास असावी अशी इच्छा केली ती ती त्यास अर्पण होत गेली. अश्वावर चांगला बसणारा कोण ह्याविषयीं **एतशा**ची सूर्याबरोबर जेव्हा स्पर्धा लागली तेव्हा **एतशा** हा इन्द्राचा सोमरसाचे उत्तम हवि अर्पण करणारा भक्त असल्यामुळें, त्यानें **एतशाचें** रक्षण केले. १५

हे पीतवर्ण अश्वांवर आरोहण करणाऱ्या इन्द्रा ! ह्याप्रमाणे **गोतमांनीं** हीं स्तोत्रें इतक्या सुरेख रीतीनें खरोखर तुझ्याच प्रीत्यर्थ केली आहेत. ह्या स्तोत्रांवर तूं सर्व प्रकारानें कृपादृष्टि ठेव. स्तुतिस्तोत्राच्या वैभवाने परिपूर्ण असा हा ( इन्द्र ) आमचेकडे प्रातःकालीं त्वरेने आगमन करो. १६ ( २९ )

# अध्याय ५.

## सूक्त ६२.

॥ ६२ ॥ ऋषि–गोतम नोधा । देवता–इंद्र ॥

सामर्थ्यवान्[1] व स्तुतिप्रिय अशा इंद्राकरिता अंगिरसांप्रमाणे, एखादे जोरदार स्तोत्र, आम्ही आठवून ठेवीत आहो. स्तुति करणाऱ्या भक्तास अत्यंत स्तवनार्ह, व अतिशय कीर्तिमान्, अशा त्या वीराचे सन्मानार्थ, सुंदर शब्दरचना करून, आपण स्तोत्र म्हणू या. १

दुसऱ्याची पावले[2] ओळखून काढण्यात तरबेज असणाऱ्या अंगिरस् नावाच्या आमच्या भक्तिमान् अशा प्राचीन पूर्वजांना ज्याच्या कृपेमुळे धेनूंची प्राप्ति करून घेता आली त्या श्रेष्ठ इंद्रास तुम्ही अत्यंत नम्रतेने वंदन करा, त्या सामर्थ्यवान् इंद्राप्रीत्यर्थ तुम्ही स्तुतीने परिपूर्ण असे एखादे गायन करा. २

इंद्र आणि अंगिरस् ह्यांच्या इच्छेने सरमेस आपल्या पुत्राकरिता उत्तम पेय[3] मिळाले, बृहस्पतीने पर्वत फोडला व गाईंची प्राप्ति करून घेतली आणि शूर लोकांना धेनूंसह आनंदाच्या आरोळ्या ठोकल्या. ३

तू तेजस्वी आहेस. तुला सप्त विप्रांना व अत्यंत चपल अशा नवग्वांनी व दशग्वांनी स्तुतिस्तोत्रे व गीते गाऊन (प्रोत्साहन दिले, तेव्हा,) हे पराक्रमी इंद्रा तू पर्वताचा, मेघाचा[4] व वलाचा मोठी गर्जना करून ध्वंस केलास. ४.

हे सौंदर्यवान् इंद्रदेवा, अंगिरसांना तुझी स्तुति केली तेव्हा तू उषा, सूर्य व धेनु ह्यास घेऊन अंधकाराचा[5] उच्छेद केलास. तू भूलोकाची मर्यादा विस्तृत केलीस व रजोलोकाचे वर द्युलोकाची संस्थापना केलीस. ५ (१)

---

१–शवसानाय,[1] गिर्वणसे, (इंद्राय) अंगिरस्वत् उपमं आंगूषं, प्र भरामहे। गृणते स्तुवते ऋग्मियाय विश्रुताय नरे अर्कं अर्चाम ॥

२–पदज्ञा[2] अर्चंतः नः पूर्वे पितरः अंगिरसः येन गाः अविंदन्, तस्मै महे शवसानाय (इंद्राय) महि नमः, आंगूष्यं साम प्रभरध्वम् ॥

३–इंद्रस्य अंगिरसां च इष्टौ, सरमा तनयाय धासिं[3] विदत्। बृहस्पतिः अद्रिं भिनत् गाः विदत्। नरः, उस्रियाभिः (सह) सं अवावशंत ॥

४–सरण्युभिः नवग्वैः, दशग्वैः, सप्त, विप्रैः, सुष्टुभा, स्वरेण स्तूयमानः त्वं सः, (त्वं) (हे इंद्र, अद्रिं, फलिगं,[4] वलं, रवेण, दरयः ॥

५–(हे) दस्म, इंद्र, अंगिरोभिः, गृणानः उषसा सूर्येण गोभिः अंधः[5] वि वः, भूम्याः सानु, वि अप्रथयः, दिवः रजः उपरम् अस्तभायः ॥

ह्या सौंदर्यवान् देवाचे हे कर्म अतिशय सन्मानार्ह आहे—हे त्याचे अद्भुत कृत्य खरोखर अतिशय सुंदर आहे—की क्षितिजापाशीं त्याने मधुर जलाच्या चार नद्या वरच्यावरच तुडुंब भरून टाकल्या. ६

स्तुतींनी परिपूर्ण अशी स्तोत्रे चालली असताना ह्या कधींही श्रांत न होणाऱ्या देवाने प्राचीन काळापासून एकत्र असणारी जोडी फोडून[६] तिचे दोन भाग केले. अनेक सुंदर व आश्चर्यकारक पराक्रम करणाऱ्या ह्या देवाने भगाप्रमाणे स्वर्गभू व पृथ्वी ह्या दोन युवतींची ह्या विशाल आकाशभागी स्थापना केली. ७

सनातन कालापासून रात्र व उषा ह्या रोज जन्मणाऱ्या दोन युवती, की ज्यांचीं रूपें भिन्न आहेत, त्या आपापल्या गमनपद्धतीने द्युलोक व पृथ्वी ह्यांचे सभोवार, रात्र कृष्णरूपे धारण करून एकएकटी व उषा उज्वलरूपे धारण करून एकएकटी अशा परिभ्रमण करीत असतात. ८

सुंदर सुंदर चमत्कार करणारा व अत्यंत उदार अशा ह्या इंद्राने आपल्या सामर्थ्याने श्रेष्ठ कृत्ये करीत ( सर्व विश्वाविषयीं ) चिरकालिक प्रेमबुद्धि धारण केली आहे. ( हे इंद्रा ) गाईचा रंग तांबडा असो की काळा असो किंबहुना, त्या जरी अगदीं नवीन वेताच्याच[७] असल्या, तरी त्यांचे ठिकाणी तू तकतकित पांढरे व मधुर[८] दूध ठेवतोस. ९

ज्यांची गति एकाच ठिकाणाकडे आहे व ज्यास प्रत्यवाय अथवा नाश[९] होण्याची भीति नाहीं अशा नद्या पुरातनकालापासून स्वसामर्थ्यानुरूप ( ह्या देवाच्या ) आज्ञाचे परिपालन करीत आहेत. एकाच पुरुषाच्या ज्याप्रमाणे लग्नाच्या हजारों बायका असाव्यात त्याप्रमाणे ह्या बहिणी बहिणी ह्याची एकट्याची सेवा[१०] करीत असतात व तो ती मन मोकळे करून घेतो. १० (२)

---

६–दस्मस्य अस्य (इंद्रस्य) तत् उ कर्म प्रयक्षतमम्, दंस चारुतमम् यत् उपह्वरे, उपरा मध्वर्णस चतस्र नद्य अपिन्वन् ॥

७–स्तवमानेभि अर्कै अयास्य (इंद्र) सनजा सनीळे[६] द्विता विवव्रे । परमे व्योमन्, भगः न, सुदंसा मेने रोदसी अधारयत् ॥

८–सनात् विरूपे पुनर्भुवा युवती स्वेभि एवै भूमा दिवं परि, अक्त[७], कृष्णेभि, उषा, रुशद्भि:, वपुर्भि अन्यान्या आचरत ॥

९–सुदंसा, सूनु, शवसा स्वपस्यमान सनेमि सख्य दाधार । आमासु चित्[८], कृष्णासु रोहिणीषु अन्त. पक्व[८] रुशत् दधिषे ॥

१०–सनात् सनीळा[९], अवाता, अमृता,[९] अवनी सहोभि व्रता रक्षन्ते । स्वसार अन्हयाणं, जनयः पत्नी न, दुवस्यन्ति[१०] ॥

नमस्कृतींनीं व स्तोत्रांनीं अर्चन करण्यास तूं योग्य आहेस. धनाची व लाभाची इच्छा धरून, हे सौंदर्ययुक्त देवा, आमच्या मनाची स्फूर्ति तुजकडे धाव घेत असते. हे बलशाली देवा, ज्याप्रमाणे अनुरक्त[११] पत्नी अनुरक्त पतीस आलिंगन देते त्याप्रमाणे आमच्या स्तुति तुला भेटावयास येतात. ११

सनातन कालापासून तुझ्या हातात संपत्ति आहे. तिचा क्षय अथवा ऱ्हास, हे लावण्यवान् देवा, कधींही होत नाही. इंद्रा, तू कान्तिमान्, बुद्धिवान् व प्रज्ञावान् आहेस. स्वशक्तीच्या योगानें, हे सामर्थ्यवान् देवा, आम्हास सन्मार्गास लाव. १२

हे इंद्रा, हा गोतम प्राचीन[१२] ऋषीचे अनुकरण करीत आहे. हरिद्वर्ण अश्वावर आरोहण करणारा जो तू त्या तुजकरिता त्याने नवीन स्तोत्र रचले आहे. हे सामर्थ्यवान् देवा, तू आमचा सन्मार्गदर्शक आहेस. तुझ्याकरिता नोधा ऋषीने स्तुति केली आहे. अनेक स्तोत्रांनीं आळविलेला हा देव प्रातःकाळीच आम्हाकडे सत्वर गमन करो. १३ (३)

## सूक्त ६३.

॥ ६३ ॥ ऋषि-गोतम नोधा ॥ देवता-इंद्र ॥

ज्या अर्थी हे इंद्रा, कठिण पर्वत आणि भूमीवर दृढ संस्थापित झालेल्या इतरही सर्व अवाढव्य वस्तु तुझ्या भीतीमुळे (सूर्याच्या) किरणाप्रमाणे लटलट हलू लागल्या, त्या अर्थी तू खचित मोठा आहेस—इतका मोठा की तू, सर्वज्ञ असून, द्युलोक आणि भूलोक ह्यानाही स्वसामर्थ्याने तू आपल्या धाकात[१] ठेवले आहेस. १

---

११-नमसा अर्कैः त्व नव्य । दस्म, सनायुव. वसूयवः मतयः दद्रुः । शवसावन्, उशन्त पतिं "उशतीः पत्नीः न मनीषाः त्वा स्पृशन्ति ॥

१२-सनात् एव राय एव गभस्तौ । दस्म, न क्षीयन्ते न उपदस्यन्ति । इन्द्र, द्युमान् क्रतुमान् धीरः असि । शचीव, तव शचीभि न शिक्ष ॥

१३-इन्द्र, गोतम सनायत" । हरियोजनाय नव्य ब्रह्म अतक्षत् । शवसान न सुनीथाय नोधाः । धियावसु प्रात मक्षु जगम्यात् ॥

१-यत् ह दृळ्हास गिरयश्चि विश्वा (दृढा) अभ्वा ते भिया किरणा न ऐजन्, इन्द्र, त्व महान्—यः ह जहान. द्यावा पृथिवी शुष्मे अमे धा ॥

जेव्हा हे इंद्रा, अनेक तऱ्हेने तुझा हुकूम मानणारे स्वतःचे अश्व तू जोडलेस त्यावेळीं तुझें स्तवन करणाऱ्या भक्ताने तुझ्या बाहूवर वज्र दिले. स्वतःच्या बुद्धीने वागणाऱ्या[२] व अनेक भक्तांनीं स्वसंरक्षणार्थ पाचारण केलेल्या हे इंद्रा, तेच वज्र घेऊन तू शत्रूचा व त्याच्या, सपत्नीनें समृद्ध अशा, पुराचा उच्छेद करितोस. २

इंद्रा, तू सत्यस्वरूप आहेस, तू ह्या शत्रूंचा उच्छेदक आहेस, तू ऋभूंचा स्वामी आहेस, तूं मनुष्यांचा कल्याणकर्ता आहेस व तुझ्याशी युद्धास प्रवृत्त होणारास तू जेरीस आणणारा आहेस. तू तेजस्वी व तरुण अशा कुत्साचा पक्ष घेऊन संग्रामात,[३] युद्धात[४] व लढाईत[५] शुष्णाचें हनन केलेस. ३

वीर्यशाली पुरुषाप्रमाणे मनाची प्रवृत्ति असलेल्या हे शूर इंद्रा, ज्यावेळी दस्यूंवर सहज[६] विजय गाजवून व त्यास पळावयास[७] लावून खुद्द त्याच्या निवासाच्या ठिकाणीच तू त्याना खरोखर कापून काढलेस व ज्यावेळी, पराक्रमी पुरुषाप्रमाणे कृत्ये करणाऱ्या हे वज्रधर इंद्रा, तू (कुत्साचा) स्नेही होऊन वृत्राचा वध केलास, त्यावेळी त्या कृत्याविषयी तुझी स्वतःचीच बलवत्तर इच्छा होती. ४

मानवापैकी जो अत्यंत बलिष्ट असेल त्याचा जरी रोष झाला तथापि, हे इंद्रा, तू त्यात, विघ्न येऊ दिले नाहीस. तू आमच्या अश्वाकरिता सर्व दिशा मोकळ्या ठेविल्यास. हे वज्रधर इंद्रा, हातात घण घेऊन मारल्याप्रमाणे शत्रूचा नाश कर. ५ (४)

समुद्रावर[८] वर्चस्व मिळविण्याच्या अथवा स्वर्गप्राप्ति करून घेण्याच्या इच्छेने आरंभिलेल्या युद्धात ह्याच कारणामुळे योद्धे जन तुला खरोखर हाक मारितात. हे अनेक हवींचा[९] उपभोग घेणाऱ्या इंद्रा, समरामध्ये अथवा पराक्रमाच्या कृत्यात हे तुझेच साहाय्य आम्हास सुलभ[१०] रीतीने प्राप्त झाले. ६

---

२–यत् ह इन्द्र विव्रता हरी आवे, जरिता बाहो वज्रं आधात्, येन, अविहर्यतक्रतो[१] पुरुहूत (इन्द्र), अमित्रान् पूरों पुर इष्णासि ॥

३–इन्द्र त्व सत्य, एतान् वृष्णु, त्व ऋभुक्षा, त्व नर्य, त्व षाट्। त्व शुमते यूने कुत्साय सचा वृजने[२] पृक्षे,[३] आणौ[४] शुष्ण अहन् ॥

४–यत् ह वृषमण शूर (इन्द्र) वृथाषाड्[५] (त्व) दस्यून् पराचै[६] योनौ व्यकृत, यत् (च) वृषकर्मन् वज्रिन् इन्द्र सखा वृत्र उश्ना त्वं हि त्यन् इन्द्र चोदी ॥

५–हळ्हस्य चिन्मर्तानां अजुष्टौ इन्द्र त्व ह त्यत् अरिषण्यन्। अस्मत् अर्वते काष्ठा व्यव। वज्रिन् घनेव अमित्रान् श्नथिहि ॥

६–अर्णसातौ[८] स्वर्मीळ्हे आजा त्वां ह त्यत्, इन्द्र, नर हवन्ते। स्वधाव[९] समर्ये वाजेषु तव इय ऊतिः भतसाय्या[१०] भूत्।

हे वज्रधारी इंद्रा, ह्याच कारणास्तव तूं पुरुकुत्साकरिता युद्ध करून सप्त पुराचा विध्वंस केलास. ज्यावेळीं सुदासाकरिता तू (त्याचे शत्रूस) काहीएक श्रम न करिता गवत कापल्याप्रमाणें कापून काढलेस, त्यावेळीं, हे राजन्, पूरूचा तू संकटापासून बचाव[11] केलास. ७

हे सर्वसंचारी[12] इंद्रदेवा, तू आम्हावर उदकाप्रमाणे त्या तुझ्या अलौकिक कृपादृष्टीचा असा वर्षाव केलास की जिच्या योगानें, हे शूरा, सर्व ठिकाणीं जणू काय उदकाप्रमाणे साडत जाईल अशा रीतीने तुझेपासून आम्हास उत्तम सामर्थ्याचा[13] लाभ झाला. ८

हे इंद्रा, गौतमानीं तुझे स्तवन केले आहे आणि तुझ्या अश्वास वंदन करून त्याचे सन्मानार्थही त्यानीं स्तोत्रे गाइली आहेत. आम्हास उत्तम प्रकारचे सामर्थ्य दे. असत्य स्तुतिस्तोत्रानीं आळविलेला हा देव आम्हाकडे प्रातःकाळी लवकर गमन करो. ९ (५)

## सूक्त ६४

॥ ६४ ॥ ऋषि-गौतम नोधा । देवता-मरुत् ॥

मरुत्देवाचे सन्मानार्थ, हे नोधा, सामर्थ्यवान्, अत्यंत पूज्य व अत्यंत कर्तृत्ववान् अशा त्याच्या गणास उद्देशून एक सुंदर स्तोत्र अर्पण कर. मनात वाळगून व चांगली हातोटी[1] साध्य करून घेऊन मी यज्ञप्रसंगीं प्रभावसंपन्न स्तोत्राची पाण्याप्रमाणे वृष्टि करितों. १

---

७–वज्रिन् इन्द्र, त्यत् ह त्वं पुरुकुत्साय युध्यन् सप्त पुरः दर्द । यत् सुदासे बर्हिः न वृथा वर्क्, राजन्, पूरवे वरिवः[11] कः ॥

८–[12]परिज्मन् इन्द्र, त्वं न, आपो न, त्यां चित्रां इषं पीपयः यया, शूर, विश्वध क्षरध्यै अस्मभ्यं प्रति ऊर्जं [13]त्मनं यसि ॥

९–इन्द्र, गोतमेभिः ते ब्रह्माणि अकारि हरिभ्यां नमसा ब्रह्माणि उक्ता । सुपेशसं वाजं नः आ भर । धियावसुः प्रातः मक्षु जगम्यात् ॥

१ नोधः, मरुद्भ्यः वृष्णे सुमखाय वेधसे शर्धाय सुवृक्तिं प्र भर । मनसा धीरः सुहस्त्यः[1] विदथेषु आभुवः गिरः अपो न समञ्जे.

रुद्राचे पुत्र, ( शत्रूंचा ) नाश करणारे, सर्व अवगुणापासून[२] अलिप्त, जगतास पावन करणारे, सूर्याप्रमाणें तेजःपुंज व वृष्टि करणारे असून सामर्थ्यवान् पुरुषाप्रमाणे भयप्रद असे हे उंच शरीराचे पराक्रमी वृषभ द्युलोकापासून जन्म पावले. २

तारुण्ययुक्त, जरारहित, भक्तिहीन कृपण पुरुषाचा विनाश करणारे व कोणाच्या प्रतिरोधास[३] न जुमानणारे हे रुद्र पर्वताप्रमाणे बलवान् होत गेले. आपल्या सामर्थ्याच्या योगाने हे दिव्यलोकाना, व पृथ्वीवरील प्रदेशाना, ते कितीही अचल असले, तरी हालवून सोडतात. ३

सुंदर दिसण्याचे हेतूने ते चित्रविचित्र आभरणानी[४] स्वतःस भूषवीत आहेत. शोभेकरितां त्यांनी आपल्या वक्षःस्थलावर सुवर्णालंकार धारण केलेले आहेत. त्यांच्या खांद्यावर भाले लखलखताना दिसत आहेत व हे वीर, स्वतःचाच मार्ग धारण करून, द्युलोकापासून उत्पन्न झालेले आहेत. ४

विश्वावर आधिपत्य संपादन करणाऱ्या, सर्व जगास हालवून सोडणाऱ्या, व दुष्टाचा संहार करणाऱ्या ह्या मरुतांनी वारे व विजा ह्याना स्वसामर्थ्याने उत्पन्न केले. हे शूर स्वर्भूमीच्या कासेचे दोहन करितात व सर्वत्र संचार करून दुग्धाने पृथ्वीस पुष्टि आणितात. ५

कर्तृत्व[५] अंगी असलेले हे दानशूर मरुत् जलाची व घृतपरिपूर्ण अशा दुग्धाची समृद्धि करितात. ते सामर्थ्यवान् अश्वास[६] जणू काय वृष्टि करण्याचेच शिक्षण देतात व मोठ्याने शब्द करणाऱ्या अविनाशी झऱ्याचे दोहन करितात. ६

---

२ रुद्रस्य मर्या. असुरा. अरेपसः[२] पावकास सूर्या इव शुचय द्रप्सिन. सत्वानो न घोरवर्पसः ( सन्तः ) ऋष्वासः उक्षण ते दिवो जज्ञिरे.

३ युवान अजरा अभोग्घन अध्रिगाव[३] रुद्राः पर्वता इव ववक्षु । मज्मना दिव्यानि पार्थिवा दृळ्हा चित् विश्वा भुवनानि प्रच्यावयंति

४ वपुषे चित्रै अंजिभि[४] व्यंजते । शुभे वक्ष सु रुक्मान् अधियेतिरे । एषां असेषु ऋष्टय. निमिमृक्षु नरः स्वधया साकं दिव जज्ञिरे.

५ ईशानकृत. धुनय रिशादस वातान् विद्युत तविषीभि अक्रत । धूतयः दिव्यानि दुहन्ति, परिज्मय पयसा भूमिं पिन्वन्ति.

६ अभुव.[५] सुदानव. मरुत. अपः घृतवत् पय पिन्वन्ति । वाजिन अत्यं[६] मिहे न निनयन्ति, स्तनयन्तं अक्षित उत्सं दुहन्ति

ज्यावेळी बलवान,[७] सर्व युक्तिप्रयुक्तीत निष्णात, आश्चर्यकारक तेजाने युक्त, पर्वताप्रमाणें स्वसामर्थ्याने परिपूर्ण व शीघ्रसचारी असे आपण आपल्या रक्तवर्ण हरिणीपैकी बलिष्ठ हरिणींना आपल्या रथास जोडिता त्यावेळी एखाद्या रानटी[८] हत्तीप्रमाणे आपण सर्व झाडेझुडे खाऊनच टाकिता ( कीं काय असा भास होतो ) ७

अत्यत प्रज्ञाशील रुरुनावाच्या[९] मृगाप्रमाणे सुदर, सर्वज्ञ, आपल्या ठिपकेदार हरिणी जोडून व भाले घेऊन रात्रीला पळवून लावणारे, शत्रूस एकदम एकाच वेळीं पीडा देणारे व बलिष्ठ असल्यामुळे सर्पाप्रमाणें रागीट असे हे मरुत् सिंहाप्रमाणे गर्जना करीत आहेत. ८

समुदायामध्ये शोभिवत दिसणाऱ्या, मनुष्यास[१०] साहाय्यभूत होणाऱ्या व अगीं सामर्थ्य असल्यामुळे सर्पाप्रमाणे कुपित होणाऱ्या हे शूर मरुद्देवानो, स्वर्ग व पृथ्वी ह्या दोन्ही लोकाशी सभाषण करा. तुमच्या रथाच्या वन्धुरावर सुदर तेज[११] दृग्गोचर होत नाही काय व तुमच्या रथावर विद्युत् विराजमान झाली नाही काय ? ९

सर्वज्ञ, स्वैभव धारण करून एकत्र निवास करणाऱ्या, एकमेकाशी अगदी सलग्न असलेल्या, स्वसामर्थ्याच्या योगाने श्रेष्ठता पावलेल्या, अस्त्रविद्यानिपुण, अपार बल अगी असलेल्या व आयुधे[१२] धारण करणाऱ्या ह्या शूर मरुताना हातात[१३] बाण घेतलेला आहे. १०

पवित्र, चपल, स्वमार्गाने गमन करणारे, स्थिर पदार्थास चळविणारे, स्वत स शत्रूकडून अजिक्यपणा[१४] प्राप्त करून देणारे व हातात भाले चमकविणारे हे मरुत् दुग्धप्राशनानें सामर्थ्यवान् बनून आपल्या सुवर्णमय पर्वांनी पर्वताचा मार्गावरील एखाद्या क्षुद्र पदार्थाप्रमाणे चुराडा करून टाकतात. ११

---

७ मांहृपास[७] मायिन चित्रभानव गिरयो न स्वतवस रघुष्यद आरुणीपु तविषी यत् अयुग्ध्व ( तदा ) मगा[८] हस्तिन इव वना खादथ

८ प्रचेतस पिशा[९] इव सुपिश, विश्ववेदम, पृषतीभि ऋष्टिभि क्षप जिन्वन्त, सम् इत सबाध, शवसा अहिमन्यव सिंहा इव नानदति

९ गणश्रिय नृषाच[१०] शवसा अहिमन्यव शूरा मरुत रोदसी आवदत । वन्धुरेषु दर्शता अमति:[११] न व रथेषु विद्युत् न तस्थौ ?

१० विश्ववेदम., रयिभि समोकस, संमिश्लास, तविषीभिर्विरप्शिन, अस्तार, अनन्तशुष्मा:, "वृषखादय. नर. गभस्त्यो[१३] इषु दधिरे

११ सखा अयास स्वसृत ध्रुवच्युत. दुध्रकृत.[१४] भ्राजदृष्टय. मरुत. प्रयोवृध. सन्तः हिरण्ययेभिः पविभिः पर्वतान् आपथ्यः न उज्जिघ्नन्ते.

युद्धसंघर्षणात चतुर, पवित्र, अरण्यात संचार करणारे व सर्वत्र परिभ्रमण करणारे असे जे रुद्राचे पुत्र त्यांचा धावा करून आम्ही त्यांचे स्तवन करितों. रजोलोकात जाणारे, बलिष्ट, सरळ गतीने धावणारे व अतिशय शक्तिमान् असे जे मरुद्गण त्यास तुम्ही वैभव प्राप्त होण्याकरिता भजा. १२

आपले साहाय्य अर्पण करून ज्याचे तुम्ही संरक्षण करिता तो मानव हे मरुत् हो आपल्या सामर्थ्यानें सर्व लोकांपेक्षा ज्यास्ती बलवान् होतो. तो आपल्या अश्वाच्या योगाने सामर्थ्य संपादन करितो, तो आपल्या पदरच्या शूर माणसाकडून संपत्ति मिळवितो, लोकानी जिच्याबद्दल कौतुकानें चौकशी[१५] करावी अशी शक्ति त्यास प्राप्त होते व तो भरभराटीस चढत जातो. १३

धनाची प्राप्ति करून देणारी, प्रशंसनीय, सर्व विश्वात विदित होणारी, अत्यंत स्तुत्य, युद्धांत हार न जाणारी व उज्वल अशी शक्ति हे मरुत् हो, तुम्हास हवि देणाऱ्या भक्तांचे अंगी आणा. आम्हास शतायु पुत्रपौत्र लाभोत. १४

हे मरुद्देवहो, आम्हास असे वैभव द्या की जे स्थिर राहील, ज्याचे योगाने शूर लोक आमचे पदरीं राहतील, ज्याचे योगाने शत्रू[१६] जेरीस येतील, ज्याची गणती शेकड्यानीं व हजारानीं करावी लागेल व जे नेहमी वृद्धिंगत होईल. ज्याची स्तोत्रसंपत्ति अपार आहे असा हा मरुद्गण प्रातःकाळीं आम्हाकडे सत्वर गमन करो. १५

---

१२ घृषु पावक वनिन विचर्षणि रुद्रस्य सूनु हवसा गृणीमसि । रजस्तुर, तवस, ऋजीषिण वृषण मारुतं गण श्रिये सश्चत

१३ मरुत व ऊती य आवत स मर्त शवसा जनान् अतितस्थौ । अर्वद्भिर्वाज भरते, नृभि धना भरते, आपृच्छ्य[१५] क्रतु आक्षेति पुप्यति

१४ मरुत धनस्पृत, उक्थ्य, विश्वचर्षणि, चर्कृत्य, पृत्सु दुष्टर, द्युमन्त शुष्म मघवत्सु धत्तन । शतं हिमा लोक तनय पुष्येम

१५ मरुत, स्थिर, वीरवन्त, ऋतिसह,[१६] सहस्रिण, शतिनं, शशुवासं रयिं अस्मासु नु सुधत्त । धियावसुः प्रातः मक्षु जगम्यात्.

॥ ६५ ॥ ऋषि–शक्तिपुत्र पराशर । देवता अग्नि ॥

## अनुवाक. १२

### सूक्त ६५.

ज्याप्रमाणें गुरें चोरून नेऊन एखादा चोर गुहेत लपून[1] बसला असता त्याच्या पावलांवरून त्याचा माग काढतात त्याप्रमाणे प्रज्ञाशील पुरुषांनी आपापसात एकमत करून सर्वांच्या नमस्कृति स्वतः स्वीकारून त्या देवाकडे पोचणाऱ्या तुझ्या पावलावरून तुझा शोध लावला व ते सर्व पुण्यशील पुरुष तुझ्यासमीप विराजमान झाले. १

सत्यनियमापासून उत्पन्न झालेल्या अनुशासनाचे देवांनी परिपालन केले. स्वर्गाप्रमाणे पृथ्वीही त्या सत्यनियमाचे आश्रयस्थान झाली. प्रत्यक्ष सत्याने जेथे जन्म घेतला अशा गर्भांतून अतिशय थाटमाटात ज्याचे जनन झाले तो अग्नि वृद्धिगत[2] होऊं लागला असता सर्व उदकांनी त्याचे स्तवन करून त्याच्या वर्धनास उत्तेजन दिले. २

उत्कर्ष जसा रमणीय असतो, पृथ्वी जशी विस्तीर्ण आहे, गिरि जसा (पुष्पफलादिक) भोग्यवस्तूंनी परिपूर्ण असतो, उदक[3] जसे शीघ्रकर असते, धावत असतांही त्यास चेतविलेला घोडा जसा आणखी दौड करितो अथवा एखादी महानदी त्याप्रमाणे आपले तट फोडून[4] टाकील अशी सामर्थ्यवान् असते, तसा हा अग्नि आहे. ह्याच्यावर ह्यास कोण प्रतिबंध करूं शकेल? ३

हा नद्यांचा जिवलग आप्त आहे की जणू काही त्या बहिणी व हा भाऊच. ज्याप्रमाणें एखादा नृपति शत्रूंचा[5] संहार करितो त्याप्रमाणे हा साध्या अरण्याचे भक्षण करितो. ज्याप्रमाणे वायूने प्रेरित होऊन ह्याचा मोर्चा वनांकडे वळलेला असतो त्यावेळी खरोखर हा अग्नि पृथ्वीचे (जणूं काही) केसच कापून टाकतो. ४

हंसाप्रमाणे उदकांत बसून हा श्वासोच्छ्वास करितो. हा आपल्या बुद्धिवानपणामुळे अतिशय ज्ञानशील आहे. सर्व लोकांस प्रभातकाली हा जागृत करितो. सोमाप्रमाणे ह्याचे अंगांत तरतरी आहे. ह्याचा जन्म सत्यापासून झालेला आहे. ज्याप्रमाणे एखादे जनावर पुष्ट[6] असले म्हणजे देखणे दिसते त्याप्रमाणे हा दिसतो. हा सर्वव्यापी आहे. ह्याची कांति दूरवर पसरते. ५ (९)

---

१ नमो युजाना नमो वहन्त त्वा सजोषाः. धीराः पश्वा गुहा चतन्तं तायुं न पदैः अनुग्मन्; विश्वे यजत्राः त्वा उप सीदन्

२ देवाः ऋतस्य व्रता अनु गुः द्यौर्न भूम परिष्टिः भुवन्. ऋतस्य योनौ गर्भे सुजातं सुशिश्विं ईं आपः पवा वर्धन्ति.

३ रण्वा पुष्टिः न, पृथ्वी क्षितिः न, भुज्म गिरिः न, शंभु क्षोदः न, अत्मन् सर्गप्रतक्तः अत्यः न, क्षोदः सिन्धुः न; ईं कः वराते

४ भ्रातेव स्वस्रां सिन्धूनां जामिः. राजा इभ्यान् वनानि अत्ति. यत् वातजूतः वना वि अस्थात् अग्निः पृथिव्याः रोम दाति ह.

५ अप्सु सीदन् हंसः न श्वसिति. चेतिष्ठः क्रत्वा विशां उषर्भुत्. ऋतप्रजातः सोमः न वेधाः. विभुः दूरेभाः शिश्वा पशुः न.

॥ ६६ ॥ ऋषि-शक्तिपुत्र पराशर । देवता-अग्नि ॥

सूक्त ६६.

तेजस्वी व प्रभावशील असा हा अग्नि आश्चर्यप्रद सपत्तीप्रमाणे, सर्वदर्शी सूर्याप्रमाणें, जीवनप्रद आयुष्याप्रमाणे, स्वतःच्या औरस पुत्राप्रमाणे, व चपल अश्वाप्रमाणे[1] असून ज्याप्रमाणे धेनु दुग्धास धारण करिते त्याप्रमाणे वनातील वृक्षाना बळकट धरून ठेवतो. १

सर्व लोकावर विजय मिळविणारा हा अग्नि पक्क झालेल्या शेतातील धान्याप्रमाणे अथवा शोभिवत अशा एखाद्या मंदिराप्रमाणे असून त्याने भक्ताचे क्षेम राहील असे केले आहे. स्तोत्रे गाण्यात[2] मग्न झालेला ऋषि अथवा सर्वांचा आवडता असा एखादा अश्व ह्याची जशी सर्व जनात तारीफ होते तशी ह्याची विश्वात प्रशंसा होत असते व हा सर्वांस त्याचें जीवन अर्पण करितो. २

शाश्वत टिकणाऱ्या सामर्थ्याप्रमाणे अथवा स्वगृहातील प्रियपत्नीप्रमाणे हा सर्वांस पूज्य व प्रिय असून ह्याचे तेज दूरपर्यंत[3] पसरणारे आहे व सर्व विश्वाची हा तृप्ति करणारा आहे. जेव्हा आपल्या चित्रविचित्र कांतीने हा विराजमान झालेला असतो त्यावेळी सुवर्णरथाप्रमाणे, अथवा जनसमुदायात आपल्या तेजाने तळपणाऱ्या एखाद्या तेजस्वी पुरुषाप्रमाणें, हा शोभावयास लागतो. संग्रामामध्ये ह्याचा त्वेष फार तीव्र असतो. ३

शत्रूविरुद्ध पाठविलेल्या सेनेप्रमाणे अथवा एखाद्या अस्त्रकुशल वीराने त्वेषाने[4] फेकलेल्या दीप्तिमान् बाणाप्रमाणे हा भीति उत्पन्न करतो. हा मूर्तिमान् यमच आहे—मग त्याने जन्म धारण केलेला असो अथवा त्याचे मानस जन्म घेण्याच्या तयारीत[5] असो. हा कुमारिकांचा वल्लभ व विवाहित स्त्रियांचा नाथ आहे. ४

ज्याप्रमाणे धेनु स्वगृहाकडे गमन[6] करितात त्याप्रमाणे, तुम्हांस प्रिय असा जो अग्नि तो प्रज्वलित झाला असताना, आम्ही आपल्या स्थावर व जंगम सपत्तीसह त्या अग्नीकडे गमन करितों. एखाद्या महानदीप्रमाणे जलाचे प्रवाह उतरत्या मार्गानें वहावयास ह्यानेच लाविले. धेनूही वरती सूर्याकडे[7] पाहून हंबरावयास लागल्या. ५ (१०)

---

१ रयिर्न चित्रा सूरो न संदृक् आयुर्न प्राणो नित्यो न सूनुः. तक्वा न भूर्णिः वना सिषक्ति पयो न धेनुः शुचिर्विभावा.

२ दाधार क्षेमं ओको न रण्वो यवो न पक्वो जेता जनानां. ऋषिर्न स्तुभ्वा विक्षु प्रशस्तः वाजी न प्रीतो वयो दधाति

३ दुरोकशोचिः क्रतुर्न नित्यो जायेव योनौ अरं विश्वस्मै. चित्रो यद् अभ्राट् श्वेतो न विक्षु रथो न रुक्मी त्वेषः समत्सु.

४ सेनेव सृष्टा अमं दधाति अस्तुर्न दिद्युत् त्वेषप्रतीका. यमो ह जातो यमो जनित्वं जारः कनीनां पतिर्जनीनां.

५ तं वः चराथा वयं वसत्या अस्तं न गावो नक्षन्त इद्धं. सिन्धुर्न क्षोदः प्र नीचीरैनोत् नवन्त गावः स्वर्दृशीके.

॥ ६७ ॥ ऋषि–शक्तिपुत्र पराशर । देवता–अग्नि ॥

## सूक्त ६७.

अरण्यें दग्ध करून विजय संपादन करणारा हा मनुष्य जातीचा कल्याणकर्ता, एखाद्या राजाप्रमाणें, जो उपासक सेवेने थकल्यासारखा[1] होणार नाही अशा सेवकास चाहतो. मनुष्याचें क्षेम जसे त्यास सुखदायक असतें अथवा बुद्धिसामर्थ्य जसे मनुष्याचे उपयोगी पडते त्याप्रमाणे सौख्यकारक असणारा हा अत्यंत प्रज्ञाशील अग्नि आमचे हवि देवाप्रत नेऊन त्यास ते अर्पण करो. १

सर्व वैभवें आपल्या हातात वागविणाऱ्या ह्या देवाने गुहेत (लपून) बसून देवांना मोठ्या घोरात[2] पाडले. मन तल्लीन करून रचलेल्या प्रार्थना जेव्हा बुद्धिवान् (भक्त) जन (प्रेमानें) गात बसलेले असतात त्यावेळी त्यास ह्या देवाचे ह्या जगात ज्ञान होते. २

जन्मरहित अशा परमेश्वराप्रमाणे ह्याने ह्या विस्तीर्ण पृथ्वीचे पोषण केले आहे, सत्यस्फुरित प्रार्थनांच्या योगाने त्याने द्युलोकास सावरून धरले आहे. हे अग्निदेवा, तू विश्वाचा प्राण आहेस, तू गुहागुहातून परिभ्रमण करीत असतोस, (परंतु) आमच्या पशूंची जेवढी (चरण्याची) आवडती ठिकाणे असतील तेवढ्याचा (अवश्य) बचाव कर. ३

गुहेमध्ये निवास करणाऱ्या ह्या अग्निदेवाचे ज्यास ज्ञान करून घेण्याची इच्छा आहे, सत्यरूपी अमृताची धारा प्राशन करण्याकरिता जो तिच्या सभोवती टपून बसलेला असतो व जो अग्नीच्या सत्य नियमाचे परिपालन करून त्यास त्याच्या निवासस्थानातून बाहेर आणतो त्याला तो संपत्ति प्राप्त होण्याबद्दल आशीर्वचने देतो. ४

जो आपल्या सामर्थ्याने लतासमुदायात वृद्धिंगत होतो, जो त्याचे अपत्यच होय, व जो आपल्या जननीमध्ये राहतो, जो प्रज्ञाशील[3] आहे व जो विश्वाचा जणू काही प्राणच होय, तो अग्निदेव जलाच्या गृहात वास करितो. सुज्ञलोकांना त्या गृहाचे माप घेऊन ते त्याचे जणू मंदिरच केले आहे. ५ (११)

---

१ वनेषु जायुः, मर्तेषु मित्रः, राजेव अजुर्य श्रुष्टिं वृणीते. क्षेमः न साधुः क्रतुः न भद्रः. स्वाधीः होता हव्यवाट् भुवत.

२ विश्वानि नृम्णा हस्ते दधानः गुहा निषीदन् देवान् अमे धात, यत् हृदा तष्टान् मन्त्रान् अशंसन् (तदा) धियधाः नरः ईं अत्र विदन्ति.

३ अजः न पृथिवीं क्षमां दाधार सत्यैः मन्त्रेभिः द्यां तस्तम्भ. पश्वः प्रिया पदानि निपाहि. अग्ने विश्वायुः त्वं गुहा गुहं गाः.

४ गुहा भवन्तं ईं यः चिकेत, यः ऋतस्य धारां आ ससाद, ये ऋता सपन्तः विचृतन्ति अस्मै वसूनि प्रववाच इत् आत्

५ महित्वा यः वीरुत्सु विरोधन्, उत प्रजाः, उत प्रसूषु अन्तः, चित्तिः विश्वायुः अपां दमे. धीराः समाय सद्मेव चक्रुः

॥ ६८ ॥ ऋषि-शक्तिपुत्र पराशर । देवता-अग्नि ॥

## सूक्त ६८.

सर्व वस्तु परिपक्वतेस[1] पोंचवीत हा चपल अग्नि द्युलोकावर आरूढ झाला आहे. स्थावरापासून[2] जंगमापर्यंत[3] सर्व वस्तूंस-(इतकेंच काय पण) रात्रींसही-त्यानें सुप्रकाशित केलें आहे. हा देव ह्या सर्व वस्तूंस एकटा वेष्टून टाकून आपल्या श्रेष्ठ गुणांमुळे देवातील प्रमुख देव होऊन बसला आहे. १

ज्यावेळीं हे देवा, तूं जीव बनून शुष्क काष्ठापासून जन्म घेतलास त्यावेळीं तुझ्या बुद्धि-सामर्थ्याची त्या सर्वांनीं वाहवा केली. आपापल्या मार्गांनीं तुझ्या अविनाशी सत्य नियमांचें जेव्हा त्यांनीं परिपालन केलें त्यावेळीं त्या सर्वांस 'देव' ही संज्ञा प्राप्त झाली. २

सत्यनियमाचा हा प्रेरक आहे. सत्यनियमाचा हा कल्पक आहे. सर्व विश्वाचा हा प्राण आहे. ह्याच्यामुळेच सर्व लोक आपापल्या कर्मास प्रवृत्त होतात. तू ज्ञानवान् आहेस. जो तुला हवि अर्पण करील, अथवा जो तुझी सेवा करील त्यास तू संपत्ति दे. ३

मनूच्या अपत्याचे समुदायात हा 'हविर्दाता' होऊन बसला आहे. सर्व संपत्तीचा हा खरोखर स्वामी आहे. आपल्या शरीरात वीर्य असावें अशी स्त्रीपुरुषांना परस्परास इच्छा झाली तेव्हा त्याचेवर मनोभंग[4] होण्याचा प्रसंग न येता त्यास आपल्या शक्तीच्या योगानें संततिलाभ करून घेता आला. ४

ज्यांनीं ह्याच्या आज्ञा तावडतोब ऐकलेल्या आहेत त्यांना, ज्याप्रमाणे पुत्राला पित्याचा अधिकार प्राप्त होतो त्याप्रमाणे, ह्याचें सामर्थ्य प्राप्त झालेलें आहे. सर्वांच्या पोषणाची[5] व्यवस्था करणाऱ्या ह्या अग्नीनें, एखाद्या गृहाचीं द्वारें खुलीं केल्याप्रमाणें, आपली संपत्ति खुली करून ठेविली आहे. सर्वांच्या गृहस्वास्थ्यात[6] आनंद मानणाऱ्या ह्या अग्नीने नक्षत्राचे योगानें स्वर्गास शोभा आणिली आहे. ५ (१२)

---

१ भुरण्युः श्रीणन्[1] दिवः उप स्थात् स्थातु[2] चरथ[3] अक्तून् वि ऊर्णोत्. विश्वेषां एषां एक परि यत् महित्वा देवानां देव भुवत्

२ देव यत् जीव शुष्कात् जनिष्ठा ते विश्वे क्रतु जुषन्त इत् आत्. एवं. अमृत ऋत सपन्त विश्वे देवत्व नाम भजन्त.

३ ऋतस्य प्रेषा ऋतस्य धीति. विश्वायु विश्वे अपांसि चक्रुः. तुभ्य य दाशात्, य. वा ते शिक्षात् तस्मै चिकित्वान् रयिं दयस्व

४ मनो अपत्ये निषत्त होता स चि आसा रयीणा पति नु. मिथ. तनूषु रेतः इच्छन्त. अमूरा.[4] स्वै. दक्षै सजानत

५ तुरास ये अस्य शास श्रोषन्, क्रतु, पितु पुत्रा न, जुपत पुरुक्षु[5] दमूना.[6] दुर.-रायः-वि औणोत् स्तृभिः नाक पिपेश

॥ ६९ ॥ ऋषि–शक्तिपुत्र पराशर । देवता–अग्नि ॥

## सूक्त ६९.

उषेच्या वल्लभाप्रमाणें हा उज्वल व देदीप्यमान्[1] असून स्वर्गातील ज्योतीप्रमाणें द्युलोक व पृथ्वी ह्याचे आक्रमण करितो. जन्म घेतल्याबरोबर ह्याने आपल्या सामर्थ्याने सर्व जग वेढून टाकलें व पुत्र असताही तो देवाचा पिता झाला. १

ह्या अग्नीचे ठिकाणी कर्तृत्वशक्ति फार आहे. ह्याचे ज्ञान विशाल असतांही ह्यास गर्वाचा विटाळ नाही. धेनूच्या कासेप्रमाणे पेय[2] पदार्थांतील हा मूर्तिमत माधुर्यच[3] आहे. ह्याचा ताप दुर्धर[4] असताही प्रत्यक्ष सौख्याप्रमाणे हा जनास आनद देणारा आहे; घराच्या[5] मध्यभागीं स्थित असताना हा रमणीय दिसतो. २

पोटी पुत्र जन्मास आला ह्मणजे तो जसा घरात पित्यास रमणीय दिसतो तसा हा रमणीय वाटतो. आवडत्या घोड्याप्रमाणे हा अवघड प्रसग निभावून नेतो. मनुष्याशी सहवास करण्यात ज्या देवसमुदायास आनद वाटतो त्यास मी जेव्हा जेव्हा ( आपल्या यज्ञाकडे ) बोलावतों तेव्हा तेव्हा त्या सर्वांचा हाच दूत होऊन येतो. ३

ज्या अर्थी ह्या सर्व मानवाकडे तू ( आजपर्यंत ) उत्तम लक्ष्य[6] पुरविलेले आहेस त्या अर्थी ह्या तुझ्या आज्ञा मोडण्यास वस्तुतः कोणीच उद्युक्त होणार नाही. खरोखर तो तुझाच पराक्रम होय की समबल अशा देवाच्या साहाय्याने तू शत्रूचा वध केला व वीर पुरुषास हाताशीं घेऊन तू दुर्भाषणी निदकाची[7] दाणादाण करून टाकली. ४

उषेच्या वल्लभाप्रमाणे देदीप्यमान व तेजस्वी असणाऱ्या ह्या अग्नीची कान्ति सर्वांच्यां ओळखीची आहे. आपल्या स्वतःच्या प्रेरणेनें रथ वाहून नेणाऱ्या अग्नीच्या अश्वानीं द्वारें उघडलीं व सूर्यदर्शन झाल्याबरोबर आनदाचा शब्द केला. ५ (१३)

---

१ उष जार न शुक्र शुशुक्वान्[1] दिव ज्योति न समीची पप्रा प्रजात. क्रत्वा परिबभूथ पुत्रः सन् देवानां पिता भुव

२ वेधा विजानन् अग्नि अदृम. गोना ऊध. न पितृना[2] स्वाद्म आहूर्य[4]. सन् जने शेवः न. दुरोणे[5] मध्ये निषत्त रण्व

३ पुत्र जात न दुरोणे रण्व प्रीत वाजी न विशः वितारीत यत् नृभिः सनीळाः विशः अह्वे अग्नि विश्वानि देवत्वा अश्याः.

४ यत् एष्य. नृष्य श्रुष्टि[6] चकर्थ एता ते व्रता नकि. मिनन्ति. तत् तु ते दस यत् समानैः ( रपांसि[7] ) अहन, यत् नृभि युक्त रपासि[7] विवेः

५ उष जार. न विभावा उस्र सज्ञातरूप अस्मै चिकेतत्. त्मना वहन्तः दुर विऋण्वन् स्वर्दृशीके विश्वे नवन्त.

॥ ७० ॥ ऋषि–शक्तिपुत्र पराशर । देवता–अग्नि ॥

## सूक्त ७०.

अग्नीची उपासना करणारे आह्मी त्याची मनःपूर्वक स्तुति करून भरपूर वैभव प्राप्त होण्याबद्दल याचना करूं. कारण हा अत्यंत तेजःपुंज अग्नि सर्व विश्वास व्याप्त करून टाकणारा आहे. देवलोकातील नियमाचे ह्यास पूर्ण ज्ञान आहे व मनुष्यजातींतील प्राणी कसे जन्म पावतात हें हा उत्तम रीतीने जाणतो. १

उदकाचा जो गर्भ आहे, जो तरुलतादिकाचा गर्भ आहे, जो चर व अचर सृष्टीचाही गर्भ आहे, त्या ह्या अग्नीपुढे, मग तो अंतर्भागात असो कीं गृहांच्या अन्तर्भागांत राहो, मानव जातींतील प्रत्येक मनुष्य व त्याचप्रमाणे अमराचा समुदायही संतोषाने नम्र होतो. २

जो ह्या अग्नीस उत्तम स्तोत्रासह तृप्ति होईपर्यंत हवि अर्पण करितो, त्याचेकरितां हा रात्रीचा स्वामी अग्नि धनाचे भांडार देतो. देवाचा जन्म व मर्त्यजन ह्याचे ज्यास ज्ञान आहे अशा हे ज्ञानशील अग्निदेवा, ह्या सर्व भूप्रदेशाचे संरक्षण कर. ३

स्वर्गांत अधिष्ठित झालेला हा हविर्दाता अग्नि सत्याने परिपूर्ण असे पराक्रम करीत असता त्याची आराधना आमचेकडून झालेली आहे. हा सत्याने[१] परिवेष्टित आहे. ह्याचें वर्धन भिन्न भिन्न स्वरूपाच्या अनेक रात्रीनी व त्याचप्रमाणे स्थावर जंगम सर्व पदार्थांनी, केले आहे. ४

तूं आमच्या धेनूंची प्रशंसा करवितोस, तू आमच्या ताब्यातील वनाची प्रशंसा करवितोस. आमच्या द्युलोकातील सर्व मनुष्ये तुला स्वर्गातील बलि अर्पण करितात. तुझी अनेक स्थानी मानवाकडून स्तुति झाली आहे व वृद्ध[२] झालेल्या पित्याची संपत्ति ज्याप्रमाणे त्याच्या पुत्रांस प्राप्त होते त्याप्रमाणे तुझेकडून त्यास संपत्ति मिळालेली आहे. ५

तो कार्यसाधु[३] मनुष्याप्रमाणे आपला मतलब पकडणारा[४], अस्त्रकुशल मनुष्याप्रमाणे शूर, सूड उगविणाऱ्या खुनशी माणसाप्रमाणे भयप्रद व संग्रामात उग्रपणा धारण करणारा आहे. ६ (१४)

---

१ मनीषा अर्यं पूर्वी. वनेम दव्यानि व्रता आ चिकित्वान् मानुषस्य जनस्य जन्म आ ( चिकित्वान् ) सुशोकः अग्नि विश्वानि अश्याः

२ य अपां गर्भ , वनानां गर्भ , स्थातां च गर्भ , चरथां गर्भ अस्मै अद्रौ चित् दुरोणे अत. विशां विश्व न अमृत स्वाधी

३ य सुव्रतं अर्मैं अर दाशत् स हि क्षपावान् अग्नि. रयीणां. चिकित्व देवानां जन्म मर्तान् च विद्वान् एता भूम नि पाहि.

४ य विरूपा पूर्वी. क्षप स्थातु रथ च ऋतप्रवीतं य वर्धन् ( सः ) होता, स्व निषत्त , विश्वानि सत्या अपांसि कृण्वन्, अराधि

५ गोषु वनेषु प्रशस्ति धिषे न विश्वे स्व बलि भर त. नर त्वा पुरुत्रा विसपर्यन्, जिव्रे.[२] पितु न वेदः विभरन्त

६ समन्तु त्वेपः, साधु.[३] न गृध्नु[४], अस्तेव शूर , यातेव भीम

॥ ७१ ॥ ऋषि–शक्तिपुत्र पराशर । देवता–अग्नि ॥

## सूक्त ७१.

ज्यांप्रमाणें प्रेमळ[1] बायका आपल्या प्रेमळ पतीस सतुष्ट करतात त्याप्रमाणे एकाच ठिकाणीं राहणाऱ्या ह्या स्त्रियानी त्यास सतुष्ट केले आहे. ज्याप्रमाणे उषेला पाहून गाईंना आनद होतो त्याप्रमाणे ह्यानी आश्चर्यकारक तेजाच्या योगाने प्रकाशमान होणारा शुभ्रवर्ण दिवस व कृष्णवर्ण रात्र ह्यास पाहून त्याचे आनदाने स्वागत केले आहे. १

आमच्या पितरांनी नुसत्या स्तोत्रसामर्थ्यांनी अत्यत दुर्भेद्य असे दुर्गही फोडून टाकले; त्याचप्रमाणे अंगिरसानी स्तोत्रघोषाने पर्वताचा भग केला. त्यांनी आमचेकरिता विस्तीर्ण द्युलोकाकडे जाण्यास मार्ग[2] तयार केला व दिवस, स्वर्ग, दीप्ति आणि प्रकाश ह्याचा लाभ करून घेतला. २

प्रेमाने त्याची उपासना करणारे जे त्याचे भिकर त्यांनी त्याच्या सत्यनियमाचे अवलबन केले व त्याच्या प्रार्थना[3] सफल करून घेतल्या. देवसमुदायास सतुष्ट करणाऱ्या कर्मव्यापृत परतु निर्लोभ अशा त्या अग्नीकडे गमन करीत असतात. ३

त्यास सर्वव्यापी **मातरिश्वा** ह्याने मन्थन करून उत्पन्न केले तेव्हापासून हा देदीप्यमान[4] अग्नि प्रत्येक घरात प्रादुर्भूत होऊ लागला. एखाद्या बलिष्ठ राजाची कामगिरी अगावर घेतल्याप्रमाणे त्या भृगुसारखा दिसणाऱ्या अग्निदेवाने प्रत्येक ठिकाणी हजर राहून सर्वांचे प्रतिनिधित्व पत्करिले आहे. ४

अग्निदेव हा चित्रविचित्र कान्तीने युक्त व प्रज्ञावान् आहे. आपला पिता जो श्रेष्ठ **द्युलोक** ह्याची हौस त्यानें पुरविली व मग तो खाली निघून गेला. (त्याबरोबर) त्याचेवर रागाने अस्त्रवेत्या पराक्रमी पुरुषाने प्रज्वलित बाण सोडला व त्या दिव्य द्युलोकाने आपल्या कन्येचे ठिकाणी प्रकाश उत्पन्न केला. ५ (१५)

---

१ उशती ' उशन्त नित्य पति न सनीळा: जनय. उप प्र जि वन् गाव उषस न स्वसार: श्याव्री चित्र उच्छन्तीं अरुषीं अजुषृत.

२ पितर: उक्थै वीळु चित् दृळ्हा म अगिरस रवेण अद्रि रुजन अस्मे बृहत. दिव: अस्मे गातु' चक्रु, अह', स्व, केतु, उस्रा. विविदु

३ अयं दिधिष्व विभृत्रा' ऋत दधन अय धीति धनयन् रत आन. देवान् जन्म प्रयसा वर्धयन्ती: अतृष्यन्ती: अपस. अच्छ यन्ति.

४ यन् विभृत: मातरिश्वा ई मथीन् श्वेत:' गृहेगृहे जे य' भून. सचा सन् भृगवाण: ई सहीयसे राज्ञे न दूत्यं आ विवाय.

५ यन् महे पित्रे दिवे ई रस क. चिकित्वान् पृशन्य. अव त्सरत, अरता धृषता अस्मै दिद्युं सृजत, देव: स्वायां दुहितरि त्विषि धान.

जो आपल्या घरी तुझे प्रीत्यर्थ तुझी ज्वाला प्रज्वलित करितो, आणि भक्तांच्या उपासनेचा आवडीनें[५] स्वीकार करणाऱ्या तुला जो प्रत्यही नमन करितो त्याचे, हे द्विगुणित कान्तीने विभूषित असणाऱ्या अग्निदेवा, तू आयुष्य वाढीव. त्याचा तू कैवार घेतोस त्यास वैभव प्राप्त होवून तो रथांत बसो. ६

ज्याप्रमाणें सप्त महानद्या[६] समुद्रास जावून मिळतात त्याप्रमाणे विश्वांतील सर्व हवि अग्नीकडेच जातात. आमच्या अगदीं जवळच्या नातलगास सुद्धा आमचें आयुष्य किती आहे ह्याचे ज्ञान नाहीं, पण तू इतका प्रज्ञावान् आहेस कीं देवा मनात काय विचार चालतात ते सुद्धा तुला विदित होतात. ७

ज्यावेळीं सर्व लोकाचा स्वामी जो अग्निदेव त्यास विश्वामध्ये सुखसमृद्धि नादावी म्हणून त्याच्या तेजानें व्यापून टाकले त्यावेळीं खरोखर उज्वल वीर्यानेंच ( त्याचे शरीरात ) संचार केला. हे सर्व पहाण्यास द्युलोक जवळच साक्षी होता. ( मग त्या वीर्याचे योगाने ) अग्नीने तारुण्ययुक्त, सुविचारसपन्न व निर्दोष अशी प्रजा[७] निर्माण केली आणि त्यास आपल्या कर्मास प्रवृत्त केलें. ८

ज्याचें आपल्या मार्गाने मनाप्रमाणे त्वरेने गमन होत असते तो सूर्य सपत्तीवर स्वत: एकटा अधिकार गाजवितो. मित्र आणि वरुण हे सुदर हस्तानी सुशोभित असलेले सार्वभौम, धेनूंचे ठिकाणीं असलेल्या गोड अमृताचे, रक्षण करीत असतात. ९

हे अग्निदेवा, ज्या अर्थी तू अतिशय ज्ञाता व प्रज्ञाशाली आहेस, त्या अर्थी आमच्या वाडवडिलापासून आमच्याशीं तुझा चालत आलेला स्नेहसबंध तू तोडून[८] टाकूं नकोस. वार्धक्य हें ( काळ्या ) ढगाप्रमाणे सुदर रूपाचा बिघाड[९] करणारे आहे, म्हणून त्या दुष्टाच्या येण्याचे[१०] अगोदर तूंच ( आमचेकडे ) ये. १० (११)

---

६ य तुभ्य स्वे दमे आ विभाति वा उशत[५] अनु द्यून् नम दाशात्, अग्ने, द्विबर्हा: अस्य वय: वर्धः य जुनासि राया सरथ यासत्

७ सप्त यह्वी[६] स्रवत समुद्र न विश्वा. पृक्ष अग्निं अभि सचन्ते न: वय: जामिभि विचिकिते, चिकित्वान् देवेषु प्रमति विदा .

८ यत् इषे नृपति तेज: आ आनट , शुचि रेत निषिक्त द्यौ: अभीके. अग्नि अनवद्य, युवान, स्वाध्यं शर्धं[७] जनयत् सूदयत् च.

९ मन: न य. अध्वन: सद्य: एति, सूर. एक सत्रा वस्व: ईशे. राजाना सुपाणी मित्रावरुणा गोषु प्रिय अमृत रक्षमाणा.

१० अभि पितु: कवि: सन् अग्ने न: पित्र्याणि सख्या मा प्रमर्षिष्टा:[८]. जरिमा नभ: न रूप मिनाति.[९] तस्या: अभिशस्ते:[१०] आधि इहि.

## सूक्त ७२.

॥ ७२ ॥ ऋषि–शक्तिपुत्र पराशर । देवता–अग्नि ॥

अनेक हितकारक लाभ[1] आपले हातीं ठेवणाऱ्या अग्निदेवानें कित्येक कवींची काव्ये आपल्याकडे आकर्षून घेतली आहेत. सर्व प्रकारचा शाश्वत संपत्ति सदैव निर्माण करून अग्नि वैभवाचा स्वामी झाला आहे. १

ज्याचे मन गोंधळून जाणे संभवनीय नाही अशा सर्व देवानीं आमचेसाठी आमचे भोंवती-भोवती बसून राहणाऱ्या ह्या **बालकाचा** मन:पूर्वक शोध केला तरी त्यास हे **बालक** सापडलें नाही. पण त्याच्या पावलामागे[2] जाता जाता श्रमाने थकलेल्या देवानीं त्याची स्तुति करिताच अग्नीच्या श्रेष्ठ पदाचे ठिकाणी ते सहज रीतीने जाऊन उभे राहिले. २

हे अग्निदेवा, तू देदीप्यमान आहेस. ज्यावेळी त्या तेजस्वी पुरुषानी तीन वर्षेपर्यंत तुझी घृताने पूजा केली त्यावेळी यज्ञात सर्वत्र विदित अशी पदवी त्यास प्राप्त झाली व त्या सुंदर पुरुषाना महत्कृत्ये करण्याकडे आपल्या स्वताची प्रेरणा[3] करिता येऊ लागली. ३

विशाल असे द्युलोक व पृथ्वीलोक ह्यातून शोध करिता करिता त्या यज्ञार्ह पुरुषास **रुद्राने** सामर्थ्याचा लाभ झाला. जेव्हा मर्त्य माणसाना हे विदित झाले तेव्हा अत्यंत श्रेष्ठ पदावर विराजमान झालेल्या अग्नीस ते उच्च[4] स्थानावर आरोहण करून जाणण्यास समर्थ झाले. ४

तुझे ज्ञान झाल्यावर ते गुडघे टेकून तुझे समीप बसले, आणि तू त्यास अत्यंत पूज्य असल्यामुळे तुला त्यानी वन्दन केले. एका मित्राचा डोळा लागला असता दुसऱ्या मित्रानें तेथे रक्षण करीत बसावे अशा रीतीनें अतिरिक्त[5] प्रयत्न करून त्यानी आपले स्वत:स ( अमर ) करून घेतलें. ५ (१७)

---

१ नर्या' पुरूणि हस्ते दधान शश्वत. वेधस काव्या निक. विश्वा अमृतानि सत्रा चक्राण: अग्नि: रयीणां रयिपति भुवत्.

२ अमूरा विश्वे अमृता , अस्मे परिषन्त वत्स इच्छ त , न विन्दन पदव्य ' श्रमयुव: धियंधा. अग्ने. परमे पदे चारु तस्थु

३ अग्ने यत् शुचय तिस्र शरद शुचि त्वो घृतेन सपर्यान् यज्ञियानि चित् नामानि दधिरे सुजाता ति ब: असूदयन्त'.

४ बृहती रोदसी आ वेविशाना: यज्ञियास रुद्रिया प्रजभ्रिरे मत विदत्; परमे पदे तस्थिवांस अग्नि नेमधिता' चिकित्वा त्

५ सजानाना' अग्निज्ञु उपसीदन्, पत्नी ब त, नमस्यं नमस्यन्. सख्यु: निमिषि सखा रक्षमाणा: रिरिक्वांस:' स्वा' त ब: कृण्वत.

जी एकवीस गुह्य पदे फक्त तुझ्याच ठिकाणीं ठेवलेलीं आहेत त्याचे त्या यज्ञार्ह पुरुषास ज्ञान झाले. त्या गुह्य पदाच्याच योगाने ते ऐक्यभावाने[६] राहून स्वतःच्या अमरत्वाचें रक्षण करीत असतात. (हे अग्निदेवा), तू आमच्या गुराबासराचे व स्थावर जंगम संपत्तीचें परिपालन कर. ६

हे अग्निदेवा, सर्व मनुष्याचे विचार[७] तूं जाणत असून त्याच्या जीवनार्थ त्यांच्या पोषणाची तू चिरकालिक योजना केलेली आहेस, देवाचे गमन करण्याचे अंतर्मार्गही तुला विदित आहेत व त्यामुळें तू त्यास हवि पोहोचविणारा दूत झाला आहेस. तुला आलस्य कसे ते माहीत नाही. ७

तुझे चिंतन करणाऱ्या व तुझे सत्यनियम पाळणाऱ्या त्या पुरुषास द्युलोकातील सप्त नद्या व संपत्तीची द्वारे ह्याचे ज्ञान झाले. सरमेसही गाई[८] कोंडून ठेवलेले दुर्भेद्यस्थान सापडले. ह्याचेयोगानेच मानवजातीस सुखात राहता येत आहे. ८

अमरत्व मिळविण्याकरिता मार्ग तयार करण्याच्या उद्देशानें जे पुरुष आपल्या सर्व अपत्याजवळ (साहाय्ययाचनार्थ) गेले त्या श्रेष्ठ पुरुषाकरिता पृथ्वी आपल्या सामर्थ्यानें विस्तृत झाली--त्या आपल्या पुत्राकरिता--आपल्या (चिमुकल्या) पाखरास[९] आपली तृषा भागवितां यावी म्हणून--अदिति मातेनें विशाल रूप धारण केले. ९

मृत्यूपासून मुक्त असलेल्या देवानी ज्यावेळीं स्वर्गलोकाचे दोन डोळे निर्माण केले त्यावेळी त्यांनी ह्या अग्नीचे ठिकाणी अत्यंत सुंदर तेज ठेवले त्याबरोबर अगदीं मोकळ्या सोडल्याप्रमाणें अग्नीपासून तेजाच्या नद्या वाहू लागल्या व त्या, खाली (पृथ्वीवर) आल्याबरोबर, अखिल प्राणिमात्रास त्याचे ज्ञान झाले. १० (१८)

---

६ यत् त्रि सप्त गुह्यानि पदा त्वे इत् निहिता यज्ञियासः. अविदन् तेभि सजोषा अमृत रक्षन्ते. पशून् च स्थातॄन् चरथ च पाहि

७ अग्ने क्षितीना वयुनानि विद्वान् जीवसे धा आनुषक् विभा देवयानान् अध्वन अन्तर्विद्वान् हविर्वाट् अतन्द्र दूत अभव

८ स्वाध्य ऋतज्ञा दिव सप्त यह्वी राय दुर आवि अजानन् येन मानुषी विट् क भोजते नु दळह ऊर्व गव्य सरमा विदत्

९ अमृतत्वाय गातु कृण्वानास ये विश्वा स्वपत्यानि आ तस्थु महद्भि पृथिवी महा वितस्थे. पुत्रैः, वे वायसे, अदिति माता.

१० यत् अमृता दिव अक्षी अकृण्वन् आसन् चारु श्रिय अधि नि दधुः. अध सृष्टा. न सिन्धवः क्षरन्ति अग्ने, प्रतीची अरुषी. अजानन्.

## सूक्त ७३.

॥ ७३ ॥ ऋषि–शक्तिपुत्र पराशर । देवता–अग्नि ॥

जो अग्निदेव बापापासून[1] मिळालेल्या संपत्तीप्रमाणें आयुष्यास वृद्धिकारक होतो, ज्ञानी मनुष्याच्या उपदेशाप्रमाणें जो सन्मार्ग दाखवून देतो, ज्याची बरदास्त उत्तम आहे अशा पाहुण्याप्रमाणे जो संतुष्ट होतो, अशा ह्या अग्निदेवानें भक्ताचे हवि पोंचविण्याचे कार्य करून उपासकाचे घर समृद्धीने भरून टाकलें आहे. १

जो सवितादेवाप्रमाणे सत्यबुद्धिशील[2] आहे, जो आपल्या सामर्थ्याने सर्व दुरिताचा निःपात करितो, ज्याची स्तुति अनेकाकडून झालेली आहे, स्वतःचे रूप[3] जसें बदलता येत नाहीं त्याप्रमाणें जो कधीही बदलत नाही, स्वतःच्या प्राणामुळे जो मनुष्यास सुखदायक वाटतो असा हा अग्निदेव सर्वांस प्रिय झाला आहे. २

एखाद्या देवाप्रमाणे विश्वाचें[4] पोषण करून, हितकारक व मित्रत्व धारण करणाऱ्या नृपती-प्रमाणें, अथवा युद्धात पुढाकार घेणाऱ्या व सुग्रात खेळणाऱ्या वीराप्रमाणे अथवा एखाद्या पतिप्रिय व निष्कलंक स्त्रीप्रमाणे (सर्वांस सन्माननीय होऊन) ह्या पृथ्वीवर तो विराजमान होतो. ३

हे अग्निदेवा, प्रत्येक गृहीं प्रज्वलित होणाऱ्या तुला ह्या सनातन विश्वात मनुष्ये भजत आलीं आहेत. ह्या अग्नीचे ठिकाणी त्यांनी पुष्कळ धन अर्पण केलें आहे, म्हणून (हे अग्नि-देवा), तूं त्याचे करिता वैभव घेऊन[5] ये. तू सर्व विश्वाचा प्राण आहेस. ४

हे अग्निदेवा, तुझी उपासना करणाऱ्यांना (पोटभर) अन्न मिळालेंच पाहिजे. तुला हवि अर्पण करणाऱ्या विद्वान् स्तोत्यास पूर्ण आयुष्य प्राप्त झालेंच पाहिजे. आम्हास विजय मिळावा म्हणून देवासाठी त्याचा हविर्भाग तयार करून ठेवणारे जे आम्ही भक्तिमान् लोक त्यास युद्धात शौर्याचा लाभ खात्रीनें होईल. ५ (१९)

---

१ य पितृवित्त' रयि न वयोधा, चिकितुष शासु न सुप्रणीति, स्योनशी अतिथि न प्रीणान होतेव विधत सद्म वितारीत्.

२ देव सविता न य सत्यमन्मा', क्रत्वा विश्वा वृजनानि निपाति, पुरुप्रशस्त, अमति' न सत्य, आत्मेव शेव दिधिषाय्य भूत

३ य देव न पृथिवीं विश्वधाया,' हितमित्र राजा न, पुर सद शर्मसद वीरा न, अनवद्या पतिजुष्टेव नारी उपक्षेति.

४ अग्ने, दमे नित्य इद्ध त त्वा ध्रुवासु क्षितिषु नर आ सचन्त अस्मिन अधि भूरि द्युम्न निदधु. विश्वायु र्धरुणो धरुण'. भव

५ अग्ने, मघवान पृक्ष वि अश्यु', ददत. सूरय. विश्व आयु श्रवसे देवेषु भाग दधाना अर्य सनिषेषु वाज सनेम.

तुझ्या सत्य नियमनांचा अभिमान[६] धारण करणाऱ्या व स्वर्गलोकांतील एक हिस्सा प्राप्त करून घेणाऱ्या धेनूंनीं (सर्व जगास), आपल्या सदोदित भरपूर भरलेल्या कांसेंतील दुग्ध, उत्सुकतेनें पाजलें. तुझ्या कृपेची याचना करणाऱ्या महानद्या फार लांबच्या प्रदेशापासून पर्वताचे संनिध येऊन ठेपल्या. ६

हे अग्निदेवा, पवित्र देवानीं तुझेजवळ कृपेची भिक्षा मागून स्वर्गलोकांत कीर्ति मिळविली. त्यानीं रात्र व उषा ह्या दोन भिन्न स्वरूपाच्या (देवतांस) उत्पन्न केले आणि ह्याप्रमाणे काळा रंग व तांबडा रंग ह्यास त्यानी एका जागीं आणलें. ७

हे अग्निदेवा, ज्या आम्हा मानवाचीं तू वैभवप्राप्त्यर्थ योजना[७] करून ठेविली आहेस त्या अर्थी आम्हींही तुला हवि अर्पण करू. द्युलोक व पृथ्वीलोक ह्यांची जोडी आणि अंतरिक्ष ह्यास व्याप्त करून तू छायेप्रमाणे ह्या (सर्व) विश्वास चिकटला आहेस. ८

हे अग्निदेवा, तू आमचा संरक्षक झालास तर आम्ही आपल्या अश्वानीं (शत्रूच्या) अश्वास जिंकू आम्ही आपल्या माणसाकडून (शत्रूंची) माणसें जेरीस आणू व आम्ही आपल्या लढवय्या-कडून (शत्रूकडील) योद्ध्यास पराभूत करू. आमच्या कुलातील विद्वान् पुरुषांस वाडवडिलानीं मिळविलेल्या सम्पत्तीचें स्वामित्व मिळून त्यास शंभर[८] वर्षें आयुष्य प्राप्त होवो. ९

हे कर्तृत्ववान् अग्निदेवा, हीं तुझी स्तोत्रे तुझ्या चित्तास व अंतःकरणास प्रिय होवोत. देवाच्या कृपेनें प्राप्त झालेली कीर्ति धारण करीत आम्ही सर्व वैभवांवर ताबा[९] चालविणारा जो तू त्या तुझे नियम पाळण्यास (खचित) समर्थ होऊ. १० (२०)

---

६ ऋतस्य वाजशाना[६] उभक्ता धेनव स्मदूध्नी. पीपयन्त सुमति भिक्षमाणा. सिन्धव. परावतः अद्रि समया सस्रु.

७ अग्ने, यज्ञियासः त्वे सुमतिं भिक्षमाणा. दिवि श्रव. दधिरे. विरूपे नक्ता उषसा च चक्रुः, कृष्ण च अरुण च वर्ण सधु .

८ अग्ने, यान् मर्तान् राये सूसुद[७] वय च ते मघवानः स्याम. रोदसी अन्तरिक्ष आपप्रिवान् छायेव विश्व भुवन सिसक्षि

९ अग्ने, त्वोता अर्वद्भि अर्वत, नृभि नृन्, वीरैः वीरान् वनुयाम. पितृवित्तस्य रायः ईशानासः नः सूरय शतहिमा[८] विअश्यु

१० बध अग्ने, एता उक्थानि ते मनसे हृदे च जुष्टानि सन्तु. देवभक्त श्रव अधिदधानाः रायः सुधुर.[९] ते यम शकेम.

## अनुवाक १३.

### सूक्त ७४.

॥ ७४ ॥ ऋषि-रहूगणपुत्र गोतम । देवता-अग्नि ॥

जो आपली हांक लांब[1] असतानासुद्धा ऐकतो अशा ह्या अग्निप्रीत्यर्थ आपण एक स्तोत्र म्हणूं या. १

जेव्हा एकमेकाचा वध करण्याच्या हेतूनें माणसें एकमेकांवर तुटून पडतात तेव्हा ह्या पुरातन अग्निदेवाने भक्ताकरिता त्याच्या घरादाराचा साभाळ केला आहे. २

आता लोकांना बिनधोक म्हणूं द्या कीं प्रत्येक युद्धातून धनाची लूट आणणाऱ्या ह्या अग्निदेवानें वृत्राचे वधार्थ जन्म घेतला होता.

ज्याच्या घरीं तूं देवाचा प्रतिनिधि ह्या नात्यानें राहतोस, ज्याच्या हवीचा आस्वाद घेण्याकरिता तूं तिकडे गमन करितोस, अथवा ज्याचा यज्ञ सुदर[2] व्हावा अशी तूं तजवीज करतोस, ४

त्याच मनुष्याचा हवि, हे अंगिरसा, हे सामर्थ्यापासून जन्म पावणाऱ्या अग्निदेवा, उत्तम झाला असे लोक ह्मणतात. तोच अतिशय तेजस्वी असे लोक समजतात, त्याचाच यज्ञ उत्तम अशी लोकात प्रशासा होते. ५ (२१)

हे अत्यंत आल्हाद[3] देणाऱ्या अग्निदेवा, हवींचा आस्वाद घेण्याकरितां व स्तवनाचा स्वीकार करण्याकरिता त्या सुप्रसिद्ध देवास तूं इकडे घेऊन येत असतोस. ६

---

१ आरे' च अस्मे शृण्वते अग्नये अध्वर उपप्रयन्त मन्त्र वोचेम.

२ नीहितीषु कृष्टिषु सजग्मानासु, पूर्व्य य दाशुषे गय अरक्षत्.

३ उत, रणेरणे धनजय अग्नि वृत्रहा अजनि जन्तव' ब्रुवन्तु

४ यस्य क्षये दूत असि, हव्यानि वीतये वेषि, अध्वर दस्मत्' कृणोषि

५ सहस' यहो, अगिर', तमित जना सुहव्य, सुदेव, सुबर्हिष आहु'

६ सुश्चन्द्र', हव्या वीतये प्रशस्तये तान् देवान् च इह उप आ वहसि

जेव्हां हे अग्निदेवा, तूं आपलें प्रतिनिधिपणाचें कार्य बजावण्याकरितां जातोस त्यावेळीं तुझ्या रथाचा अथवा अश्वाच्या चालण्याचा[४] शब्द मुळींच ऐकूं येत नाहीं. ७

अग्निदेवा जेव्हा तुला हवि अर्पण करणाऱ्यास तूं आपले संरक्षणाखालीं घेतलेंस तेव्हां त्याचे बल वाढून व हीन[५] स्थिति नाहीशी होऊन तो पूर्वीपेक्षा उच्च स्थितीस चढला व भरभराटीस पोंहोंचला. ८

अग्निदेवा, देवास हवि देणाऱ्यास तूं तेजानें युक्त असे विपुल सामर्थ्य अर्पण करितोस. ९(२२)

## सूक्त ७५.

॥ ७५ ॥ ऋषि–रहूगणपुत्र गोतम । देवता–अग्नि ॥

आपले मुखात[१] हवि ठेवीत असता, देवास प्रिय असे जे माझे एक मोठें स्तोत्र आहे, त्याचा स्वीकार कर. १

हे अग्ने, हे अगिरसा, हे अत्यत कर्तृत्वशील देवा, तुला आवडणारें असें एक सुंदर[२] स्तोत्र आता आम्ही म्हणणार आहो. २

---

७ अग्ने, यत् दूत्य यासि, रथस्य अश्व्य यो[४] उपब्दि. कत् चन न शृण्वे.

८ अग्ने त्वोत दाश्वान् वाजी अहृय[५] पूर्वस्मात् अपर अभि प्र अस्थात्

९ उत अग्ने देव, देवेभ्य दाशुषे द्युमत् बृहत् सुवीर्य विवाससि.

१ आसनि[१] हव्या जुह्वान देवप्सरस्तम सप्रस्तम वच जुषस्व.

२ अथ, अगिरस्तम वेधस्तम अग्ने ते प्रिय ते प्रिय सानसि[२] ब्रह्म वोचेम.

हे अग्निदेवा, सर्व मनुष्यात तुला कोण आप्त वाटतो ? तुला यज्ञ[3] समर्पण करणारा कोण? खरोखर तूं कोण आहेस ? व कोणाचे सनिध तुला रहावेसें वाटते ? ३

हे अग्निदेवा, तू सर्वांचा आप्त[6] आहेस, तू आमचा प्रिय मित्र आहेस, तुझ्यावर प्रेम करणाराचा तूं सन्माननीय स्नेही आहेस. ४

**मित्र** आणि **वरुण** ह्यास तू आमचा यज्ञ पोहोचीव, देव व तुझी श्रेष्ठ सत्यनियमनें ह्याना आमची पूजा अर्पण कर. अग्निदेवा, तू आमचा यज्ञ घरी घेऊन जात असतोस. ५ (२३)

## सूक्त ७६.

॥ ७६ ॥ ऋषि-रहूगणपुत्र गोतम । देवता-अग्नि ॥

कोणते स्तोत्र तुझ्या अगदी अंतःकरणापर्यंत भिडून[1] तुला आनंद देईल ? कोणती स्तुति, हे अग्निदेवा, तुला फार संतोषदायक वाटेल ? यज्ञ अर्पण करून तुझेपासून कोणी सामर्थ्यप्राप्ति करून घेतली ? कशा अंतःकरणानें आम्ही तुला हवि अर्पण करावे ? १

अग्निदेवा, इकडे ये. आमचा हविर्दाता होऊन येथे विराजमान हो. तूं आमचा पुढारी हो, कारण तुला कोणीही अपाय[2] करण्यास समर्थ होणार नाही. विश्वात[3] सर्वत्र पसरलेले द्युलोक व पृथ्वीलोक तुझें रक्षण करोत. देवाचा आमचेवर मोठा[4] अनुग्रह व्हावा म्हणून आमचा यज्ञ त्यास अर्पण कर. २

---

३ अग्ने, जनाना क. ते जामि , क दाश्वध्वर , क ह, कस्मिन् श्रित असि.

४ अग्ने, त्वं जनानां जामि[4] प्रिय मित्रः असि, सखिभ्य. ईड्य सखा.

५ अग्ने, न. मित्रावरुणा यज, देवान् बृहत् ऋत यज स्व दम यक्षि.

१ अग्ने, ते मनस वराय का उपेति.,[1] का मनीषा शन्तमा भुवत् ? यज्ञैः क. वा ते दक्षं परि आप ? केन वा मनसा ते दाशेम ?

२ अग्ने, आ इहि. होता इह निषीद. अदब्धः[1] नः पुरएता उ भव. विश्वमिन्वे[2] रोदसी त्वा अवताम्, महे[3] सौमनसाय देवान् यज.

सर्व राक्षसांचें, हे अग्निदेवा, तूं दहन करितोस, म्हणून ह्या आमच्या यज्ञाचा लौकिक[५] कायम राहील अशी तजवीज राख. शिवाय सोमरसाचा मुख्य भोक्ता जो इन्द्र त्याचे घोडे जोडवून इकडे आण. त्या उदार देवाच्या आदरातिथ्याची सर्व तयारी आम्ही करून ठेवली आहे. ३

आमच्या कुळातील सर्व मनुष्ये जी तुझी स्तुति गात आहेत तिच्या योगानें व स्वमुखानेंही मी तुझे पूजन करीत आहे म्हणून तू देवासह येथे येऊन बस. हे यज्ञार्ह देवा, हवि पोहोचविणें व यज्ञास पवित्रता[६] आणणे ही दोन्ही कामे तू संभाळीत असतोस. संपत्ति उत्पन्न करणाऱ्या व तिचें दान करणाऱ्या हे देवा, ( लवकर ) जागृत हो. ४

ज्याप्रमाणे विद्वान् मनूच्या हवींनी, तू बुद्धिमान् उपासकाचेसह, स्वतः प्रज्ञावत असल्यामुळे, देवाचें यजन केलेस, त्याचप्रमाणे हे अत्यंत सत्यस्वरूप हविर्दात्या, देवास आनंद उत्पन्न करणाऱ्या ह्या यज्ञचमसाने तू त्यास हवि अर्पण कर. ५ (२४)

## सूक्त ७७.

॥ ७७ ॥ ऋषि–रहूगणपुत्र गोतम । देवता–अग्नि ॥

ह्या अग्नीला आम्ही कोणत्या रीतीने हवि द्यावा बरे? जो अमर, सत्यधर्माचा प्रणेता, हविर्दाता व यज्ञार्ह असून देवाना मानवाचे समुदायात आणून बसविण्याचे काम ज्याचे एकट्याचेच हातून होतें अशा त्या देदीप्यमान[१] अग्नीकरिता देवाना पसंत पडेल असे आम्ही कोणतें स्तोत्र म्हणावे बरे? १

ज्याचे दर्शन घडल्याबरोबर मनास अत्यंत संतोष होतो, जो सत्यधर्माचा प्रणेता आहे, व जो देवाना हवि पोहोचवितो त्या अग्निदेवास अनेकदा वंदन करून तुम्ही येथें घेऊन या. ज्यावेळी मानवाच्या कामासाठी अग्नि देवाकडे जातो त्यावेळीं तो ( त्यापैकीं प्रत्येकास ) ओळखतो व त्याचें मनःपूर्वक पूजन करितो. २

---

३ अग्ने, विश्वान् रक्षस सु प्र धक्षि. यज्ञानां अभिशस्तिपावा[५] भव. अथ हरिभ्यां सोमपतिं आवह अस्मै सुदाम्ने आतिथ्य चकृम

४ प्रजावता वचसा आसा च वह्नि आहुवे देवैः च इह निसत्सि. यजत्र होत्र उत पोत्र[६] वेषि. वसूनां जनितः प्रयन्तः बोधि.

५ कविः सन् यथा कविभि, विप्रस्य मनुषः हविर्भि. देवान् अयजः, एव होत. सत्यतर अग्ने, मन्द्रया जुह्वा त्वं अद्य यजस्व.

१ अग्नये कथा दाशेम? यः अमृत, ऋतावा, होता, यजिष्ठः देवान् मर्त्येषु कृणोति इत् अस्मै भामिने[१] देवजुष्टा का गी उच्यते?

२ यः अध्वरेषु शन्तमः, ऋतावा, होता, तं ऊम् नमोभिः आ कृणुध्वम्. यत् मर्ताय अग्निः देवान् वेः सः बोधाति मनसा च यजाति.

जगात जे कोठेही बुद्धिसामर्थ्य आढळते ते तोच होय. तोच खरा मनुष्य होय. तो फार चांगला आहे. ज्याप्रमाणे **मित्र** आपल्या आश्चर्यकारक रथावर आरोहण करितो त्याप्रमाणे हाही अद्भुत रथावर विराजमान होतो. देवाचे श्रद्धालु[१] उपासक ह्याच सौन्दर्यवान् देवास यज्ञात प्रथम बोलावितात. ३

सर्व नरात अत्यत श्रेष्ठ आणि शत्रूचा सहार करणारा तो अग्नि आम्हास आपल्या सरक्षणाखाली घेऊन आमच्या स्तुतिस्तोत्राचा अंगिकार करो, आणि त्याचप्रमाणे, तुला हवि अर्पण करणाऱ्या आणि त्यामुळे सामर्थ्यवान् व पराक्रमी बनलेल्या अशा ज्या कोणी पुरुषानीं तुझे स्तवन केले असेल त्याचाही तू स्वीकार कर. ४

सत्यधर्माचा प्रणेता आणि सर्वज्ञ अशा ह्या अग्नीचो विद्वान् गौतमानीं ह्याप्रमाणे स्तुति केली. त्यानेच त्याना वैभव, सामर्थ्य व समृद्धि ह्याचा लाभ करून दिला. तो प्रज्ञाशील अग्नि सर्वांना आवडतो. ५ (२५)

## सूक्त. ७८

॥ ७८ ॥ ऋषि-रहूगणपुत्र गोतम । देवता-अग्नि ॥

हे सर्वज्ञ व सर्वसचारी (अग्निदेवा), आम्ही **गोतम**, तुला प्रार्थना व उत्तम उत्तम हवि[१] अर्पण करून, पुनः पुन्हा वदन करितों. १

वैभवाची इच्छा धरून हा गोतम तुझी ह्याप्रमाणे सेवा[२] करीत आहे. उत्तम उत्तम हवि अर्पण करून आम्ही तुला पुनःपुन्हा वदन करितो. २

---

३ स. हि क्रतु, स मर्य, स साधु, मित्र न अद्भुतस्य रथी भूत. देवयन्तो आरी.[१] विशः मेधेषु प्रथम दस्म त उपब्रुवते ।

४ नृणा नृतम. रिशादा स अग्नि अवसा न गिर धीति वेतु, ये मघवान. शविष्ठा. वाजप्रसूताः त्वा च मन्म[३] इष्यन्त[४] ।

५ ऋतावा जातवेदा अग्नि विप्रेभि गोतमेभि एव अस्तोष्ट. सः एषु द्युम्न पीपयत्, सः वाज, सः, पुष्टिं, चिकित्वान् जोष आयाति ।

१ जातवेद विचर्षणे, त्वा अभि गिरा द्युम्नै[१] गोतमा अभि प्र णोनुमः

२ रायस्कामः गोतमः तं त्वा गिरा दुवस्यति[२] द्युम्नैः अभि प्र णोनुमः ।

सामर्थ्याची अतिशय प्राप्ति करून देणाऱ्या त्या तुला आम्ही, अंगिरसाप्रमाणे, हांक मारितों. आम्ही उत्तम उत्तम हवि अर्पण करून, तुला पुनःपुन्हा वंदन करितों. ३

**वृत्राचा** विध्वंस करून **दस्यूंची** दाणादाण उडवून देणाऱ्या ह्या तुला उत्तम उत्तम हवि अर्पण करून, आम्ही पुनःपुन्हा वंदन करितो. ४

अग्निदेवास उद्देशून आम्ही **रहूगणांनीं** हे अत्यंत मधुर स्तोत्र म्हटले आहे; तुला उत्तम उत्तम हवि अर्पण करून, ( अग्निदेवा ), आम्ही तुला पुनःपुन्हा वंदन करितो. ५ (२६)

## सूक्त. ७९

॥ ७९ ॥ ऋषि–रहूगणपुत्र गोतम । देवता–अग्नि ॥

ह्याचे केश सुवर्णाप्रमाणे आहेत. हा जेव्हा रजोलोकाच्या विस्तीर्ण[१] प्रदेशांत असतो तेव्हांह भीतीने गडबड उडवून देणारा ( जणू काही ) सापच, अथवा सोसाट्याने[२] वाहणारा वाऱ्या सारखा आहे असा भास होतो ह्याची दीप्ति अत्यंत प्रज्वलित आहे. दासीप्रमाणे इमानाने काम करणाऱ्या व ( सदा ) यशस्वी अशा ज्या **उषा** त्याचे ह्यास ज्ञान[३] आहे. १

तुझे मोठमोठ्या पंखाचे पक्षी ( सर्व वस्तूंचा ) नाश करू लागले व काळ्या रंगाचा वृषभ मोठमोठ्याने डुरकण्या फोडू लागला. इकडे असे होऊं लागत आहे तोंच हासल्यासारखा आवाज करणाऱ्या कोल्ह्यानाही तो घेऊन आला. मग काय? पावसाची मुसळ धार लागलं व मेघ गर्जना करू लागले. २

ज्यावेळी सत्यधर्माच्या सरळ[४] मार्गांनीं लोकांना वाट दाखवीत हा सत्याच्या उदकांचे पान करितो त्यावेळीं **अर्यमा, मित्र,** आणि **वरुण** चोहोकडे हिंडून वर ( आकाशांत ) असलेल्या पखालीच्या चामड्यात तेथल्या तेथेंच पाणी भरून ठेवतात. ३

---

३ वाजसातमं त त्वा अंगिरवत् हवामहे द्युम्नै अभि प्र णोनुमः ।

४ यः दस्यून् अवधूनुषे तं त्वा वृत्रहन्तमं द्युम्नैः अभि प्र णोनुमः ।

५ रहूगणाः अग्नये मधुमत् वचः अवोचाम द्युम्नैः अभि प्र णोनुमः ।

१ रजसः विसारे हिरण्यकेशः भ्रजीमान् वातः इव धुनिः अहिः शुचिभ्राजः, यशस्वती सत्या अपस्युवः न, उषसः नवेदाः ।

२ ते सुपर्णाः एवैः आ अमिनन्त कृष्णः वृषभः नोनाव यदि इदं, स्मयमानाभिः शिवाभिः न आ अगात्. मिहः पतन्ति अभ्रा स्तनयन्ति ।

३ ऋतस्य रजिष्ठैः पथिभिः नयन् यत् ई ऋतस्य पयसा पियान, अर्यमा मित्रः परिज्मा वरुणः उपरस्य योनौ त्वचं पृञ्चन्ति ।

सामर्थ्यापासून जन्म घेणाऱ्या हे अग्ने, ज्यापासून गोधनाचा लाभ होतो अशा सामर्थ्यावर तुझी सत्ता आहे. हे सर्वज्ञ देवा, आमचे करिता अत्यत मोठ्या कीर्तीचा ठेवा तयार कर. ४

तो तू सर्वप्रसिद्ध अग्नि, देदीप्यमान्, वैभवाचा पुतळा, प्रज्ञावान् व स्तुतीनी गुण गाण्यास योग्य असा आहेस. अनेक सेनावर[५] आधिपत्य गाजविणाऱ्या हे देवा, आम्हास धन प्राप्त होईल अशा रीतीनें आपली ज्योति प्रज्वलित कर. ५

हे तीक्ष्णदंष्ट्र अग्निदेवा, हे राजाधिराजा, प्रत्येक रात्रीं व उषेच्या प्रकाश पडल्याबरोबर आपल्या[६] ज्वालानीं राक्षसाचे दहन कर. ६ (२७)

अखिल स्तोत्रात ज्याला नमन केलेले असतें अशा, हे अग्निदेवा, आम्ही गायत्री छन्दांतील स्तवने तुला अर्पण[७] करीत असल्यामुळे तू आमच्यावर कृपा करून आमचें रक्षण कर. ७

हे अग्निदेवा, आम्हास असे वैभव दे की जें नेहमीं टिकेल, जे आम्हास हवे असें वाटेल व जें आमच्यापासून कोणत्याही युद्धात[८] शत्रूस हिसकावून घेता येणार नाही. ८

---

४ सहस· यहो अग्ने, गोमत वाजस्य ईशान जातवेद असे महि श्रव. धेहि ।

५ स अग्निः इधान, वसु, कवि, गिरा ईळेन्यः पुर्वणीक' अस्मभ्य रेवत् दीदिहि ।

६ उत क्षपः उत उषस वस्तो तिग्मजम्भ राजन् अग्ने त्मना' रक्षसः प्रति दह ।

७ विश्वासु धीषु वन्द्य अग्ने गायत्रस्य प्रभर्मणि' ऊतिभि न. अव ।

८ अग्ने, सत्रासह, वरेण्य, विश्वासु पृत्सु´ दुष्टर रयि न आ भर ।

हे अग्निदेवा, आमच्या आपत्तींचा नीट विचार करून आम्हास सुखावह[९] होणारी व आमच्या पोषणास जन्मभर उपयोगीं पडणारी अशी संपत्ति आमचें जीवन चालण्याकरिता आम्हास अर्पण कर. ९

हे गोतमा, ह्या प्रखर ज्वालानीं युक्त असलेल्या ह्या अग्नीस संपत्तीची[१०] इच्छा धारण करून, पवित्र स्तुतिस्तोत्रें अर्पण कर. १०

हे अग्निदेवा, जो कोणी समीप अथवा दूर असतांना आम्हास उपद्रव देतो त्याचा नि.पात होवो. तूं केवळ आमच्याच अभिवृद्धीस कारणीभूत हो. ११

सहस्र नेत्रानीं युक्त व सर्वंसचारी असा हा अग्नि राक्षसास हाकून[११] लावतो. स्तवनास योग्य असा हा हविर्दाता ( हा पहा ) भाषण करीत आहे १२ (२८)

## सूक्त. ८०

॥ ८० ॥ ऋषि-रहुगणपुत्र गोतम । देवता-इन्द्र ॥

तुला संतोष उत्पन्न होण्याकरिता सोमरसाची ह्याप्रमाणे सिद्धता होताच ह्या विद्वान् उपासकानें तुझें महत्व वर्णन केलें आहे. हे अत्यत बलशाली व वज्रधारी देवा, स्वत.चे साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा धरून तू अहीस ह्या पृथ्वीवरून हाकून[१] लाविलेस. [ १

---

९ अग्ने, नः जीवसे विश्वायुपोषस मार्डीक[९] रयि आ धेहि ।

१० गोतम, सुम्नयुः[१०] तिग्मशोचिषे अग्नये पूता वाच गिर प्र भरस्व ।

११ अग्ने, य अन्ति दूरे न अभिदासति स पदीष्ट अस्माक इत् वृधे भव ।

१२ सहस्राक्ष विचर्षणिः अग्नि रक्षासि सेधति[११] उक्थ्यः होता गृणीते ।

१ इत्था हि मदे सोमे इत् ब्रह्मा वर्धन चकार शविष्ठ वज्रिन्, स्वराज्य अनु अर्चन् ओजसा पृथिव्याः अहि निः शशा[१] ।

त्या श्येन[२] पक्ष्यानें आणलेल्या व पिळून तयार ठेवलेल्या उत्साहवर्धक सोमरसानें तुला स्फुरण उत्पन्न केलें व त्याच्यायोगानें, हे वज्रधारी देवा, स्वत:चें साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा धरून तूं आपल्या सामर्थ्यानें वृत्राचा पाण्यांतून वध केलास. २

पुढें चालून जा, हल्ला कर, पराक्रम गाजीव. तुझ्या वज्राला कोणी प्रतिबंध करणार नाहीं. हे इन्द्रा, तुझें सामर्थ्य शौर्यगुणानें युक्त आहे. स्वत:चें साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा धरून तू वृत्रास मारिलेस व उदकास जिंकून आणलेस. ३

हे इंद्रा, तूं भूलोकांतून व द्युलोकांतून वृत्राचा नायनाट करून टाकलास. ( तर आतां ) स्वत:चें साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा धरून ह्या सर्व प्राणिवर्गाच्या जिविताचें धारण[३] करणाऱ्या व मरुत् देवांनीं प्रेरित केलेल्या उदकास खालीं मोकळें सोडून दे. ४

स्वत:चें साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा धरून व उदकाचा प्रवाह[४] सुरळीत सुरू होण्याकरितां त्यांत गति उत्पन्न करावी ह्या हेतूनें इंद्रानें, कोपाविष्ट[५] होऊन ( सर्व जगतास ) हालवून सोडणाऱ्या वृत्रावर हल्ला करून त्याचें शिर पायांनीं तुडवून टाकिलें आहे ( पहा ). ५ (२९)

---

२ स. श्येनाभृत: सुत: वृषा मद: सोम: त्वा अमदत् येन, वज्रिन्, स्वराज्यं अनु अर्चन् ओजसा वृत्रं अद्भ्य नि: जघन्थ, पृथिव्या नि शशा ।

३ प्रेहि, अभीहि, धृष्णुहि, ते वज्र: न नियसते इन्द्र ते शव: नृम्णं हि स्वराज्य अनु अर्चन् वृत्रं हन अप: जया: ।

४ इन्द्र, वृत्र. भूम्या: नि दिव: नि अधि जघन्थ स्वराज्य अनु अर्चन् इमा: जीवधन्या: मरुत्वती अप: अव सृज ।

५ स्वराज्यं अनु अर्चन् इन्द्र: समीय: अप: चोदयन् हीळित: अभिक्रम्य वज्रेण दोधत: वृत्रस्य सानु अव जिघ्नते ।

ज्याला शंभर सांधे होते असे आपले वज्र घेऊन इन्द्र वृत्राच्या मस्तकावर घाव घालीत आहे. स्वतःचें साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा धरणारा इन्द्र (भक्तांच्या) हवींनीं संतुष्ट होऊन आपल्या प्रेमांतील मनुष्याची चलती[६] व्हावी असा हेतु मनात बाळगतो. ६

हे शस्त्रास्त्रमंडित इंद्रा, हे वज्रधारी देवा, ज्याचा कोणास प्रतिकार[७] करितां यावयाचा नाहीं असे सामर्थ्य केवळ तुझ्याच जवळ आहे कारण स्वतःचे साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा धारण करून तूच युक्तिप्रयुक्तीने त्या कपटाचरणी पशूचा वध केलास. ७

तू उगारलेले वज्र नव्वद महानद्यावर दिसत[८] होतें. स्वतःचे साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा बाळगणारा जो तू (त्या तुझे) सामर्थ्य फार श्रेष्ठ आहे. तुझे बाहुबल जगताचे हितच करणारें आहे. ८

सहस्र माणसे एके ठिकाणीं जमून त्याचे पूजन करा. वीस मिळून त्याची स्तुति करा. शेकडों भक्तानीं त्याची स्तुति केली आहे. ह्या इंद्राकरिता एक स्तोत्र अगदीं तयार आहे. ह्यास स्वतःचे साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा आहे. ९

---

६ शतपर्वणा वज्रेण सानौ अधि नि जिघ्नते अधसः म दानः, स्वराज्य अनु अर्चन्, इन्द्रः सखिभ्यः गातुं इच्छति।

७ अद्रिवः वज्रिन् इन्द्र, यत् ह स्वराज्य अनु अर्चन् त्वं मायया त्य त मायिन मृग अवधीः अनुत्तं वीर्यं तुभ्य इत्।

८ नवति नाव्याः अनु ते वज्रासः वि अस्थिरन् इन्द्र, स्वराज्य अनु अर्चन् ते वीर्यं महत्, ते बाह्वोः बलं हितम्।

९ सहस्र साकं अर्चत, विंशतिः परि स्तोभत शता एनं अनु नोनुवुः, स्वराज्य अनु अर्चन् इन्द्राय ब्रह्म उद्यतम्।

इंद्रानें वृत्राच्या सामर्थ्याचा मोड केला, त्याने आपल्या बलाने त्याच्या बलाचा निरोध केला. वृत्राला मारून त्यानें जलप्रवाहास मोकळे सोडून दिले हा त्याचा फार मोठा पराक्रम होय. स्वतःचे साम्राज्य स्थापन करण्याची त्याची इच्छा होती. १० (३०)

तुझ्या क्रोधापुढें हे दोन्ही विस्तीर्ण लोक सुद्धा भीतीनें कापू लागतात; कारण स्वतःचे साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा धरून, हे इंद्रा, तूं मरुद्गणाचे साहाय्य घेऊन आपल्या सामर्थ्याने वृत्राचा वध केलास. ११

पृथ्वीस गदगदा हलवून अथवा मोठमोठ्या गर्जना करूनही वृत्रास इन्द्राचे मनात भीति उत्पन्न करिता आली नाही. ( पण उलट ) स्वतःचे साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा धरणाऱ्या इंद्राचेच हजार[८] धाराचे लोखंडी वज्र त्याचे अंगावर पडलें. १२

ज्यावेळीं तूं आपल्या वज्राचे योगाने वृत्रांची व तुझ्या शस्त्राची गाठ घालून दिलीस त्यावेळीं हे इंद्रा, स्वतःचे साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा धारण करणाऱ्या तुझे सामर्थ्य तू वृत्राचा वध करण्याचे मनात आणल्यामुळे स्वर्गलोकात सुद्धा अनुभवास[१०] आले. १३

---

१० इन्द्रः वृत्रस्य तविषीं निः अहन् सहसा सह वन् अस्य पौंस्य महत् यन् स्वराज्य अनु अर्चन् वृत्रं जघन्वान् असृजत् ।

११ यत्, वज्रिन् इन्द्र, स्वराज्यं अनु अर्चन्, मरुत्वान् वृत्र यन् ओजसा वधीः, तव मन्यवे इमे मही चित् भियसा वेपेते ।

१२ वृत्रः इन्द्र न वेपसा न तन्यता इन्द्र विबीभयत् स्वराज्य अनु अर्चन् सहस्रभृष्टिः[८] आयसः वज्रः एन अभि आयत ।

१३ यत् वृत्रं तव अशनि च वज्रेण समयोधयः, इन्द्र, स्वराज्य अनु अर्चन् अहिं जिघांसतः ते शव दिवि बद्बधे[१०] ।

हे वज्रधारी देवा, तूं गर्जना[११] केली असता चल वस्तु व अचल पदार्थ देखील कंपित होऊन जातात; फार तर काय पण स्वतःचे साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा धारण करणाऱ्य तुझ्या क्रोधाकडे पाहून प्रत्यक्ष त्वष्टा देखील भीतीने थरथर कापू लागतो. १४

सामर्थ्यांत इन्द्राच्याही पलीकडे जाईल असा कोणी आम्हास दिसत नाहीं. त्याच्या पराक्रमापुढें कोणाची गति आहे? स्वतःचे साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा धारण करणाऱ्या इंद्राचे अंगीं देवानीं शक्ति, सामर्थ्य व तेजस्वीपणा ह्याची स्थापना केली. १५

जी स्तुति अथर्वा, सर्वांचा पिता मनु आणि दध्यङ् ह्यानीं केली त्याचप्रमाणे जीं स्तोत्रे व स्तवनें त्यानीं गाइली[१२] ती सर्व आपले स्वतःचे साम्राज्य स्थापन करण्याची इच्छा धारण करणाऱ्या त्या इंद्रासच पूर्वीप्रमाणे जाऊन पोहोचली. १६(३१)

---

१४ अद्रिवः स्थाः यत् जगत् च ते अभिस्तने[११] रेजते इन्द्र, स्वराज्य अनु अर्चन् तव मन्यवे त्वष्टा चित् भिया वेविज्यते।

१५ इन्द्र यात् नहि अधीमसि नु वीर्या पर कः? स्वराज्य अनु अर्चन् तस्मिन् देवाः नृम्णं उत क्रतुं ओजांसि सदधुः।

१६ अथर्व, मनुः पिता, दध्यङ् यां धिय अत्नत, उक्था[१२] ब्रह्माणि, स्वराज्य अनु अर्चन् तस्मिन् इन्द्रे पूर्वथा स अग्मत।

# अध्याय ६.

## सूक्त ८१.

॥ ८१ ॥ ऋषि–रहूगणपुत्र गोतम । देवता–इन्द्र ॥

**वृत्राचा** वध करणाऱ्या इंद्रास आनंद व्हावा व त्यास प्रोत्साहन मिळावें म्हणून मनुष्यांकडून त्याचे स्तवन होत आले आहे. ज्यावेळीं मोठें युद्ध उपस्थित होते त्या वेळीं आम्ही त्यासच हाक मारितो व लहानशा युद्धातही आम्ही त्यास बोलावितो. पराक्रमाच्या कृत्यांत त्याने आमचे नेहमी रक्षण[1] केले आहे. १

हे वीरा, खरोखर तूच सेनानायक शोभतोस. अनेक तऱ्हेने भक्तास वैभव अर्पण करणारा तूच आहेस. (जगाच्या दृष्टीने) जे मनुष्य लहान[2] त्यांना सुद्धा तू उत्कर्षाप्रत पोहोचवितोस व सोमरस अर्पण करणाऱ्या आपल्या भक्तास, तुझ्याजवळ असलेली विपुल संपत्ति प्राप्त करून देण्याचे ज्ञान तूच देत असतोस. २

ज्यावेळी युद्धाला प्रारंभ होतो त्यावेळी धैर्यवान पुरुषावर तुझ्याकडून संपत्तीचा वर्षाव होतो. शत्रूच्या गर्वाचे हरण करणारा अपला अश्व तू रथास जोड. तू कोणाचा वध केलास बरे! तू वैभवावर कोणाची स्थापना केलीस? खरोखर, इंद्रा, तू आमची वैभवावर स्थापना केली आहेस. ३

आपल्या पराक्रमाच्या योगाने श्रेष्ठ व आपल्या स्वतःच्या युद्धपद्धतीमुळे[3] शत्रूंस भयंकर वाटणाऱ्या ह्या देवाने आपले सामर्थ्य (फार काळ) वृद्धिंगत केले आहे. सुंदर मुकुटाने विभूषित व पीतवर्ण अश्वांनी सपन्न असा ह्या श्रेष्ठ देवाने एकमेकांशी भिडलेल्या आपल्या दोन्हीं बाहूंवर शोभेकरिता लोखंडी वज्र धारण केले आहे. ४

ह्याने भूलोकासह रजोलोकाला व्याप्त करून टाकिले आहे. द्युलोकातील सर्व देदीप्यमान प्रदेशात हा भरून[5] राहिला आहे. हे इंद्रा, तुझ्या सारखा (ह्या जगात) अन्य कोणीही नाही. एवढेच काय परंतु असा पूर्वीही कोणी जाहला नाही, व पुढेही कोणी होणार नाही. तूं सर्वांपेक्षा सुद्धा जास्त मोठा जाहला आहेस. ५ (१)

---

१ वृत्रहा इंद्र मदाय शवसे वावृधे. तं इत् महत्सु आजिषु उत ईं अर्भे हवामहे. सः वाजेषु नः प्र अविषत्।

२ वीर सेन्य हि असि. भूरि परादृदिः असि दभ्रस्य चित् वृधः असि सुन्वते यजमानाय ते भूरि वसु शिक्षसि।

३ यत् आजयः उदीरते धृष्णवे धना धीयते मदच्युता हरी युक्ष्व कं हनः? कं वसौ दधः? इन्द्र, अस्मान् वसौ दध

४ क्रत्वा महान् अनुष्वधं भीमः शवः आ वावृधे। शिप्री हरिवान् ऋष्वः उपाकयोः हस्तयोः श्रिये आयसं वज्रं निदधे।

५ पार्थिवं रजः आ पप्रौ दिवि रोचना बद्बधे. इन्द्र, न त्वावान् कश्चन। न जातः, न जनिष्यते. विश्वं अति ववक्षिथ।

ते ( सुखांत ) राहिले, त्यांनी आनंद केला. त्याच्यावर तुझी प्रीति असल्यामुळें त्यांनीं हर्षानें आपली ( मस्तकें ) डोलविलीं. स्वतःच्याच तेजानें युक्त असलेल्या त्या विद्वान् लोकांनीं अभिनव स्तोत्रें रचून तुझें स्तवनही केलें. यास्तव, हे इंद्रा तूं खरोखर आपले अश्व आतां सिद्ध कर. २

ज्याचें दर्शन फार रमणीय आहे अशा तुला, हे उदार इंद्रदेवा, आम्ही वंदन करूं. आम्ही तुझी स्तुति केली असल्यामुळें, आपल्या रथामध्ये[1] सर्व प्रकारचीं वैभवें भरून घेऊन, तुझ्या सेवकांसमीप तूं आगमन कर. खरोखर, हे इंद्रा, तू आपले अश्व आतां जोड. ३

हे इंद्र देवा, सोमरसानें भरलेलें जें यज्ञपात्र, तुला आपले अश्व जोडण्यास प्रवृत्त करतें. त्याची रुची काय आहे हें जो कोणी जाणत असेल तो धेनूची[3] प्राप्ति करून घेण्यास समर्थ असलेल्या अशा आपल्या रथावर आरूढ होवो. इंद्र देवा, खरोखर आपले अश्व तू सिद्ध कर. ४

तुझा उजवे बाजूचा घोडा रथास जोडलेला असो, व अत्यंत प्रबल इंद्रा, तुझे डावे बाजूकडील घोडाही रथास जोडला जावो. त्या रथात बसून आम्ही अर्पण केलेल्या हवीत संतोष मानीत तू आपल्या प्रियपत्नीकडे गमन कर. खरोखर हे इंद्रा, तू आपले अश्व जोड. ५

तुझी [illegible] आम्ही तुझ्या अश्वांना तुझ्या रथास नियुक्त होण्याची प्रेरणा करीत आहों. त्यांची आयाळ किती दीर्घ आहे पहा. तू इकडे ये. कारण, तू आपल्या हातांत सर्व ( संपत्ति धारण करतोस. चित्तास हुरूप आणणाऱ्या त्या सोमरसानें तुला आनंद दिला आहे. आणि पूषादेव आपली पत्नी यांचे सहवर्तमान, हे वज्रधारी देवा, तू त्यात रममाण होऊन गेला आहेस. ६ (३)

---

२ अक्षन्, अमीमदन्त प्रिया अव अधूषत स्वभानवः विप्राः नविष्ठया मती अस्तोषत. इन्द्र, ते हरी योज नु।

३ मघवन् सुसंदृशं त्वा वयं वन्दिषीमहि स्तुतः पूर्णवन्धुरः नूनं वशान् अनु प्र याहि इन्द्र, ते हरी योज नु।

४ इन्द्र, हारियोजनं पूर्णं पात्रं यः चिकेतति सः घ तं गोविदं वृषणं रथं अधि तिष्ठाति. इन्द्र, ते हरी योज नु।

५ ते दक्षिणः युक्तः अस्तु उत, शतक्रतो सव्यः तेन अन्धसः मन्दानः प्रियां जायां उपयाहि. इन्द्र, ते हरी योज नु।

६ ब्रह्मणा ते केशिना हरी युनज्मि उप प्र याहि. गभस्त्योः दधिषे रभसाः सुतासः त्वा उत् अमन्दिषुः. वज्रिन् पूषण्वान् पत्न्या सं अमदः

## सूक्त. ८३

॥ ८३ ॥ ऋषि–रहूगणपुत्र गोतम । देवता–इन्द्र ॥

हे इंद्र देवा, आपल्या कृपासामर्थ्यानें तू ज्या मानवाचे संरक्षण[1] करितोस तो सर्वांचे अगोदर धेनू व अश्वयुक्त संपत्ति याप्रत प्राप्त होतो. ज्याप्रमाणे त्वेनें धावणारें पाणी चोहों-कडून येऊन समुद्रास भरून टाकितें, त्याप्रमाणे खरोखर तू त्यास (मानवास) विपुल धनानें भरून टाकितोस. १

पुण्यकारक नद्यांप्रमाणे ते त्या यज्ञार्ह (इंद्र) देवासभोंवतीं जमतात व जगताचे संरक्षण करण्याचें त्याचें रजोलोकाप्रमाणे सर्वत्र पसरलेलें सामर्थ्य[2] ते अवलोकन करितात. भक्तिमान् पुरुषास (सर्व) देव प्रमुखस्थानाकडे घेऊन जातात. व ज्याप्रमाणे विवाहोत्सुक पुरुष वधूंचा शोध करितात त्याप्रमाणे स्वस्तुति गाणाऱ्या भक्तास ते (देव) शोधीत जातात. २

यज्ञचमस सिद्ध करून जे प्रभूवर तुझें पूजन करितात त्या उभयतांवर तू प्रशंसायुक्त वचनांचा वर्षाव करितोस. जो कोणी तुझ्या आज्ञेत राहतो तो कोणाकडूनही उपद्रव[3] न पावतां भरभराटीस पोहोंचतो. जो भक्त तुला सोमरस अर्पण करितो त्यास कल्याणप्रद असे सामर्थ्य प्राप्त होतें. ३

सत्कृत्ये व भक्ति[4] यांच्या योगानें ज्या अंगिरसांनीं अग्नीस प्रदीप्त केलें होतें त्या सर्वांचे अगोदर ज्यांना दीर्घ आयुष्याची प्राप्ति झाली, त्या पुरुषास पणीची सर्व अन्नसामग्री व अश्वधेनू इत्यादि त्यानें बाळगिलेले सर्व पशु हेही मिळाले. ४

प्रथम अथर्वणानें यज्ञाच्या योगानें मार्ग तयार केला नंतर नीतिनियमनाचें परिपालन करणाऱ्या सुंदर सूर्यदेवानें जन्म घेतला. उशना काव्यानें (नंतर) लोंच धेनू हाकून आणिल्या. आम्ही आतां यमानें जन्म घेतल्याबद्दल त्याचें पूजन करीत आहों. ह्यास मृत्युची बाधा नाहीं. ५

---

१ इन्द्र, तव ऊतिभिः सुपार्वा.' मर्त्य प्रथम अश्ववति गोषु गच्छति यथा विचेतसः आप अभितः सिन्धुं, भवीयसा वसुना तं पृणक्षि ।

२ देवीः आप न होत्रम् उपयन्ति. रजः यथा विततं अवः' पश्यन्ति. देवयुं देवास प्राचैः प्र नयन्ति, वरा इव ब्रह्मप्रियं जुषन्त.

३ या यतस्रुचा मिथुना सपर्यतः द्वयो उक्थ्य वचः अधि अदधा ते व्रते क्षेति असयत्तः' पुष्यति. सुन्वते यजमानाय भद्रा शक्ति ।

४ सुकृत्यया शम्या ये इद्धमयः, अंगिराः प्रथम वय दधिरे आत नरः पणे सर्व भोजनं अश्ववन्तं गोमन्तं पशुं आ रा अविन्दन्त.

५ अथर्वा प्रथमः यज्ञ पथ तते. ततः व्रतपा वेन आ अजनि उशना काव्यः गाः सचा आ अजत. यमस्य अमृत जानं यजामहे ।

ज्यावेळीं चांगल्या आपत्याची प्राप्ति व्हावी म्हणून (भक्तिमान्) लोक दर्भ कापून आणितात अथवा ज्यावेळीं स्तोत्रें अथवा गायनें ह्याचा घोष द्युलोकापर्यंत जाऊन पोहोंचतो, अथवा जेथें सोमवल्लीतून तिचा रस बाहेर काढण्यास समर्थ अशा एखाद्या शोभिवंत यज्ञ-पाषाणाचा ध्वनि चाललेला असतो त्यावेळीं असा यज्ञ आपल्यासमीप[6] चाललेला पाहून इंद्रास फार हर्ष होतो. ६ (४)

## सूक्त. ८४

॥ ८४ ॥ ऋषि-रहूगणपुत्र गोतम । देवता-मरुत् ॥

हे इंद्रा, तुझ्याकरिता येथें सोमरस तयार[1] करून ठेविला आहे, म्हणून हे अत्यंत बलाढ्य व धारिष्टवान् देवा, तूं इकडे ये. ज्याप्रमाणे आपल्या किरणांनीं सूर्य रजोलोकास व्याप्त करून टाकितो त्याप्रमाणे तुझ्या शरीरात सर्वत्र उत्साह[2] प्रवेश करो. १

ज्याच्या बलाचा प्रतिरोध कोणास करितां यावयाचा नाहीं असा जो केवळ इंद्रच त्यास त्याचे अश्व, ऋषीजनाच्या स्तुति ऐकण्याकरिता व (इतर) मनुष्याच्या यज्ञाचा स्वीकार करण्याकरिता घेऊन येत असतात. २

हे वृत्राचा वध करणाऱ्या देवा, तू रथावर आरूढ हो. आम्ही स्तोत्रे गाऊन तुला आपले अश्व रथास जोडण्यास प्रवृत्त केले आहे. हा सोमफलक आपल्या मधुर[3] ध्वनीनें तुझे मन आमचेकडे वळवो. ३

हे इंद्र देवा, जणूं प्रत्यक्ष आनंदच अशा ह्या अत्युत्तम व अमरत्व प्राप्त करून देणाऱ्या सोमरसाचें प्राशन कर. ह्या उज्वल सोमाच्या धारा तुला उद्देशून यज्ञगृहामध्ये वाहू लागल्या आहेत. ४

खरोखर ह्या इंद्रास उद्देशून पूजा अर्पण करा. त्याचे सन्मानार्थ स्तोत्रें म्हणा. ह्या सोम-वल्लीतून काढलेल्या रसबिंदूंनीं त्यास आनंद उत्पन्न केला आहे. म्हणून ह्या सर्वश्रेष्ठ सामर्थ्यापुढे विनयानें प्रणाम करा. ५ (५)

---

६ स्वपत्याय यत् बर्हिः वा वृज्यते, अर्कः वा श्लोक दिवि अघोषते, यत्र कारु[1] उक्थ्य. ग्रावा वदति तस्य इत् अभिपित्वेषु इन्द्रः रण्यति ।

१ इन्द्र, ते सोम असावि[1] शविष्ठ धृष्णो आ गहि. सूर्यः रश्मिभिः रज न त्वा इन्द्रिय[1] आ पृणक्तु.

२ अप्रतिधृष्टशवस इन्द्र इत्, ऋषीणां स्तुती च उप मानुषाणां यज्ञ च, हरी वहत.

३ वृत्रहन्, रथ आ तिष्ठ. ब्रह्मणा ते हरी युक्ता ग्रावा वग्नुना ते मन अर्वाचीन सु कृणोतु ।

४ इन्द्र, इम ज्येष्ठ अमर्त्य मद सुत पिब शुक्रस्य धारा ऋत अभि ऋतस्य सदने अभि अक्षरन्

५ नून इन्द्राय अर्चत, उक्थानि ब्रवीतन च सुता इन्दवः अमत्सु . ज्येष्ठ सह नमस्यत ।

ज्यावेळीं हे इंद्रा, तूं आपले अश्व रथास जोडतोस त्यावेळीं रथ चालविण्यांत तुझ्यापेक्षां जास्त निपुण खरोखर दुसरा कोणीही नसेल. सामर्थ्यात तुझी बरोबरी करणारा खरोखर कोणीही नाही. व तुझ्यासारखे अश्वनैपुण्य संपादन करून आजपर्यंत कोणीही तुझ्यावर वरचढ केली नाही हे खचित आहे. ६

भक्तीनें हवि अर्पण करणाऱ्या मानवास जो धन अर्पण करितो असा हा अप्रतिहत सामर्थ्यवान् इंद्र प्रभूच एकटा होय. ७

इंद्राचें पूजन न करणाऱ्या मानवास तो तृणाप्रमाणे[४] पायाखालीं केव्हां तुडवून टाकील बरें ? खरोखर तो आमच्या प्रार्थना केव्हा ऐकेल ? ८

खरोखर दुसऱ्या अनेक[५] देवता सोडून मनुष्य सोमरसाने तुझी उपासना करितो असेंच उग्र सामर्थ्य खरोखर ह्या इंद्रदेवाजवळ[६] आहे. ९

ज्या उज्ज्वल धेनू इंद्राबरोबर[७] असतात, ज्या त्या पराक्रमी देवाच्या सहवासांत शोभा पावून आनंदाचा उपभोग घेतात, व ज्यांना त्याच्या अप्रतिहत जगत्प्रभुत्वामुळे तेज आलेले आहे, त्या धेनूही ह्याप्रमाणे सर्व शरीरांत एकदम प्रवेश[८] करणाऱ्या मधुर व उत्तम सोमरसाचे प्राशन करीत असतात. १० (६)

---

६ इन्द्र, यत् हरी यच्छसे त्वत् रथितर नकि मज्मना त्वा अनु नकि, स्वश्वः नकिः आनशे.

७ यः दाशुषे मर्ताय वसु विदयते अप्रतिष्कुत इन्द्र ईशान. एक इत् अंग ।

८ अराधस मर्तं क्षुम्प इव कदा पदा स्फुरत् ? अंग, इन्द्रः कदा न. गिरः शुश्रवत् ?

९ यः चित् हि त्वा सुतवान् बहुभ्य. आ विवसति तत् उग्र शवः इन्द्रः पत्यते अंग ।

१० याः इन्द्रेण सयावरी., वृष्णा शोभसे मदन्ति, स्वराज्य अनु वस्वी: गौर्यः इत्था स्वादोः विषुवतः, मध्वः[८] पिबन्ति ।

चित्रविचित्र[10] वर्णाच्या ह्या धेनूंना इंद्राच्या सान्निध्याची[10] फार आवड असते. व त्या सोमरसास परिपक्वत्व आणितात. ह्या धेनू इंद्रास प्रिय आहेत. सर्व विश्वावर जें इंद्राचें आधिपत्य आहे त्यामुळें ह्यानाही तेज चढून त्या ह्यांचें आयुध जें वज्र त्यास स्फुरण[11] चढवितात. ११

त्या ज्ञानवान् धेनू त्याचे सामर्थ्यास वंदन करून त्याचें पूजन करितात. सर्वांचे अगोदर आपणास ज्ञान प्राप्त व्हावें ह्या इच्छेनें, इंद्राच्या आधिपत्यामुळे तेज पावलेल्या त्या धेनूंनीं त्याच्या अनेक नियमनाचें योग्य परिपालन केलें. १२

ज्याच्या सामर्थ्यापुढें शत्रूचा निभाव लागत नाहीं अशा त्या इंद्रानें, दधिचाच्या अस्थि घेऊन त्याच्यायोगानें नव्याण्णव वृत्राचा वध केला. १३

पर्वतांत गुप्त होऊन राहिलेलें जें अश्वाचें शिर इंद्र शोधीत होता तें त्याला शर्यणावृतामध्यें सांपडलें. १४

त्वष्टा देवाच्या वृषभाचें नांव सुद्धां लुप्त[12] झालें असतां याच त्याच ठिकाणीं त्याचा शोध लागला व चंद्राच्या सदनांत सुद्धां तें ह्याचप्रमाणें उपलब्ध झालें. १५ (७)

सामर्थ्यवान्,[13] तेजस्वी, ताब्यांत[14] ठेवण्यास कठीण असलेले, मुखें[15] व वक्षस्थलें[16] बाणाप्रमाणें घातक असतांही जे सौख्य अर्पण करणारे आहेत अशा पशूंस सत्यनियमनांच्या धुरेस आज कोण जोडील बरें? खरोखर जो कोणी ह्यांच्या सेवेस[17] उत्तेजन देईल त्यास दीर्घ आयुष्य प्राप्त होईल. १६

( इंद्रास पाहून ) कोण पळ काढील? कोणास धडकी भरेल? कोण भिईल? इंद्र आमचे जवळच आहे असें कोणास वाटावयास लागेल? त्यास आपल्या वत्सांच्या विषयीं कोण प्रार्थना करील? आपल्या नोकरचाकरांविषयीं[18], व आपली चीजवस्त व शरीरस्वास्थ्य ह्याविषयीं त्यास कोण विनवील? आपल्या परिवाराच्या माणसाविषयीं त्याचेजवळ कोण विनती करील? १७

---

११ ताः पृश्नयः 'अस्य पृशनायुवः' सोमं श्रीणन्ति इन्द्रस्य प्रियाः स्वराज्यं अनु वस्वीः धेनवः सायकं वज्रं हिन्वन्ति।

१२ ताः प्रचेतसः नमसा अस्य सहः सपर्यन्ति. पूर्वचित्तये स्वराज्यं अनु वस्वीः. अस्य पुरूणि व्रतानि सश्चिरे।

१३ अप्रतिष्कुतः इन्द्रः दधीचः अस्थभिः नव नवतीः वृत्राणि जघान।

१४ पर्वतेषु अपश्रितं यत् अश्वस्य शिरः इच्छन् तत् शर्यणावति विदत्।

१५ त्वष्टुः गोः अपीच्यं नाम अत्र असमन्वत चन्द्रमसः गृहे इत्था।

१६ शिमीवतः भामिनः दुर्हृणायून् आसन् इषून् हृत्स्वसः मयोभून् गाः ऋतस्य धुरि अद्य कः युङ्क्ते? यः एषां भृत्यां ऋणधत् सः जीवात्।

१७ कः ईषते? कः तुज्यते? कः बिभाय? इन्द्रं अन्ति सन्तं कः मंसते? कः तोकाय कः इभाय[18] उत राये तन्वे अधिब्रवत्? कः जनाय?

हवीनें व घृतानें त्याचे कोण पूजन करितो? ठराविक योग्य वेळीं त्यास यज्ञचमसानें कोण हवि देतो? देव यज्ञद्रव्ये त्वरेने कोणाकरिता घेऊन येतात? कल्याणकर्त्या अशा देवाचा कोणता उपासक त्यास यज्ञ[१९] अर्पण करून त्याचे चिंतन करितो?                                                                                               १८

हे अत्यंत पराक्रमी देवा, खरोखर तू श्रेष्ठ देव असूनही मानवाची महती[२०] वाढविली आहेस. हे उदार (इंद्रा) तुझेवाचून सौख्याची प्राप्ति करून देणारा कोणी नाही हे मी तुला खचित सांगतो.                                                                                               १९

हे वैभवस्वरूपदेवा, तुझी कृपा व आमचे संरक्षण करणारे तुझे सामर्थ्य ह्याचा आमच्यात कधींही भंग न होवो. मानवाचे हित करणाऱ्या हे देवा, आमच्या व आमच्या जवळच्या माणसांच्या पदरात सर्व संपत्ति मोजून टाक.                                                                                               २० (८) १३

## अनुवाक १४.

## सूक्त ८५.

॥ ८५ ॥ ऋषि-रहूगणपुत्र गोतम । देवता-मरुत् ॥

अद्भुत पराक्रम करणारे व शीघ्रसंचारी असे जे रुद्राचे पुत्र स्वमार्गाने गमन करीत असतां, युवतीप्रमाणें आपलीं शरीरें नटवीत असतात त्यानीच-खरोखर त्या मरुतानीच-द्यावा-पृथ्वींना उत्कर्षाप्रत पोहोंचविले. ते शूर व युद्ध-संघर्षणात[१] चतुर आहेत. यज्ञ चालला असता त्याना फार आनंद होतो.                                                                                               १

वृद्धिंगत होत होत, ते महत्वास पोहोंचले. त्या रुद्रानी द्युलोकात आपले निवासस्थान केलें. अर्काची उपासना करीत व शरीरबलास[२] प्रगल्भता आणीत त्या पृश्नीच्या पुत्रानी पुष्कळ तेज संपादन केलें.                                                                                               २

---

१८ हविषा घृतेन अग्नि क ईट्टे? ध्रुवेभिः ऋतुभिः स्रुचा यजाते? देवाः होम आशु कस्मै आ वहान्? सुदेव. क. वीतिहोत्रः" ससते?

१९ शविष्ठ, त्वं अग देव. मर्त्यं प्र शसिष." मघवन् इन्द्र त्वत् अन्यः मर्डिता न अस्ति ते वचः ब्रवीमि ।

२० मा ते राधांसि, मा ते ऊतयः अस्मान् कदाचन, वसो, दभन्; मानुष, नः च चर्षणिभ्यः विश्वा वसूनि आ उपमिमीहि ।

१ ये सनय' सुदससः रुद्रस्य सूनव यामन् जनयः न प्र शुम्भन्ते मरुत. हि रोदसी वृधे चक्रिरे, वीराः वृषमय.' विदथेषु मदन्ति ।

२ उक्षितास. ते महिमान आशत. रुद्रासः दिवि सद. अधि चक्रिरे. अर्कं अर्चन्तः इन्द्रियं जनयन्तः पृश्निमातरः श्रिय अधिदधिरे ।

हे धेनूंचे देदीप्यमान पुत्र ज्या वेळीं भूषणानी स्वतःस सजवितात त्या वेळीं ते उज्ज्वल अलंकार आपल्या अगावर घालतात. ते सर्व दुष्टाचा[3] नाश करितात व त्यांचे मार्गावरून घृताचा प्रवाह चाललेला असतो. ३

स्वसामर्थ्यानें अचल[4] वस्तूंना सुद्धां चळावयास लावणारे जे परमपूज्य देव आपल्या आयुधामुळें शोभिवंत दिसत असतात, अशा हे मरुतानो, जेव्हां तुम्ही सर्व बलिष्ठ देव एकत्र जमता व आपल्या रथांस ठिपकेदार रंगाच्या हरिणी जोडितां त्यावेळीं तुमच्या गतींत मनाइतका वेग येतो. ४

ज्यावेळीं, हे मरुत्‌हो, मोठ्या आवेशानें आपले शस्त्र फेंकीत[5] तुम्ही ठिपकेदार रंगाच्या हरिणी स्वरथास जोडिता त्यावेळीं त्या तेजाच्याच धारा चोहोंकडे पसरतात व ज्याप्रमाणें पाण्याच्या योगानें एखादी पखाल चिंब भिजावी त्याप्रमाणें पृथ्वीस त्या स्वतःच्या प्रवाहांत बुडवितात. ५

हे मरुत्‌हो, शीघ्रगामी व चपल उड्डाण[6] करणारे असे तुमचे अश्व तुम्हांस घेऊन येवोत. तुम्ही याल तेव्हां तुमचे बाहू सरसावून या व ह्या आसनावर बसा. तुमच्याकरितां प्रशस्त जागा तयार केली आहे. आमचे मधुर हवि गोड करून घ्या. ६ (९)

स्वसामर्थ्यानें[7] युक्त असलेले ते ( मरुत् ) आपल्या सामर्थ्यानें वृद्धि पावले. स्वर्गापर्यंत ते आरूढ झाले. त्यांनी स्वतःकरिता विस्तीर्ण सदन निर्माण केले. शत्रूच्या गर्वाचें हरण करणाऱ्या त्या पराक्रमी देवास ज्यावेळीं विष्णूनें साहाय्य केले त्यावेळीं मरुत् देव पक्ष्याप्रमाणें आपल्या आवडीच्या कुशासनावर जाऊन बसले. ७

---

३ यत् गोमातरः अंजिभि शुभयन्ते शुभ्राः दिरुक्मतः तनूषु दधिरे. विश्वं अभिमातिनं अप बाधन्ते. एषां वर्त्मानि घृतं अनु रीयते.

४ ओजसा अच्युता चित् प्रच्यावयन्त ये सुमखासः ऋष्टिभिः वि भ्राजन्ते मरुतः यत् वृषव्रातासः रथेषु पृषती आ अयुग्ध्व मनोजुवः.

५ मरुतः यत् वाजे अद्रिं रहयन्तः पृषती रथेषु प्र अयुग्ध्व अरुषस्य धाराः. विस्यति उत उद्भिः चर्म इव भूम वि उन्दति ।

६ मरुत, रघु यदः रघुपत्वानः सप्तयः वः आ वहन्तु. बाहुभिः प्र जिगात. बर्हिः आ सीदत. वः उरु सदः कृतं मध्व अन्धसः मादयध्व ।

७ ते स्वतवसः महित्वना अर्धं न. नाकं आ तस्थुः. उरु सदः चक्रिरे. यत् विष्णुः मदच्युतं वृषणं आवत् ह प्रिये बर्हिषि वयः न अध सीदन् ।

शूरांप्रमाणें शत्रूवर त्वरेनें चाल करून जाणाऱ्या, योध्याप्रमाणे अथवा लढाईंत नांव कमवावयाची हाव असणाऱ्या लढवय्यांप्रमाणे ते युद्धांत आपली पराकाष्ठा करितात. ह्या मरुताची सर्व जगास भीति वाटते. राजाप्रमाणें ह्यांचें अंगांत त्वेष दिसतो. ८

ज्यावेळीं कुशल[९] त्वष्टा देवानें हजार धारांनीं युक्त असें एक सोन्याचें सुंदर वज्र घडवून तयार केलें त्यावेळीं शौर्याचीं[१०] कृत्ये[११] करण्याकरितां इंद्रानें त्याचा स्वीकार करून वृत्राचा वध केला व उदकाच्या प्रवाहास मार्ग मोकळा करून दिला. ९

त्यांनीं स्वसामर्थ्यानीं विहीर[१२] खालून वरती आणली व दृढ पर्वताचा सुद्धा भेद केला. त्या उदार मरुतानीं सोमरसाच्या आनंददायक स्फूर्तीचे भरात, (मधुर) वेणुध्वनि[१३] करीत, अनेक आश्चर्यकारक कृत्यें केलीं. १०

त्या वक्रकूपास त्यानीं त्या दिशेने (वर) नेलें, आणि तृषार्त गौतमासाटीं त्यांनीं उदकाचा झरा[१४] वहावयास लावला. चित्रविचित्र कान्तीनें युक्त असलेले हे (मरुत्) भक्ताचे संरक्षण करणाऱ्या आपल्या सामर्थ्यासह त्याचेकडे गेले व आपल्या तेजानें त्यानी त्या विद्वान् ऋषीची इच्छा परिपूर्ण केली. ११

जीं सौख्ये तुमचे स्तवन करणाऱ्या करितांच राखलेलीं आहेत त्यास त्रिगुणित[१५] करून ते हवि अर्पण करणाऱ्या भक्तांस द्या व हे मरुत् देवांनो, आम्हांसही त्याचा लाभ घडू द्या. हे शूर मरुतांनो, वीर्यशाली सततीनें युक्त असे वैभव आम्हांस अर्पण करा. १२ (१०)

---

८ शूराः इव इत्, जग्मयः युयुधयः न, श्रवस्यवः न, पृतनासु येतिरे.[८] मरुद्भ्य विश्वा भुवना भयन्ते. नरः राजान. इव त्वेषसन्दृशः

९ यत् त्वष्टा[९] त्वष्टा सहस्रभृष्टि हिरण्यय सुकृत वज्रं अवर्तयत् नरि[१०] अपांसि[११] कर्तवे इन्द्र धत्ते वृत्रं अहन् अपां अर्णव निः औब्जत्।

१० ते ओजसा अवत[१२] ... नुनुद्रे दद्दाग पर्वत चित् विबिभिदुः सुदानव मरुतः सोमस्य मदे वाणं[१३] धमन्त. रण्यानि चक्रिरे।

११ जिह्म अवत तया दिशा नुनुद्र तृष्णजे गोतमाय उत्स[१४] असिचन् चित्रभानव. अवसा आ गच्छंति ईम्, धामभि विप्रस्य काम तर्पयन्त।

१२ या शर्म व. शशमानाय सन्ति त्रिधातूनि[१५] दाशुषे अधि यच्छत. मरुत ताचि अस्मभ्यं वि यन्त. वृषणः सुवीर रयिं न. धत्त।

## सूक्त ८६.

॥ ८६ ॥ ऋषि-रहूगणपुत्र गोतम । देवता-मरुत् ॥

हे अत्यंत तेजःपुंज[1] मरुत् हो, द्युलोकातून (येऊन) खरोखर ज्याचे सदनांत[2] तुम्ही (सोमरसाचें) पान करितां त्यास त्याचें रक्षण करण्यास उत्तमच संरक्षणकर्ता भेटला (असे म्हटलें पाहिजे). १

यज्ञ करणाऱ्या भक्ताच्या यज्ञांकडे पाहून अथवा विद्वान उपासकाच्या स्तुतींचा[3] आदर करून, हे मरुत् हो, आपण आमची हांक श्रवण करा. २

शिवाय ज्या समर्थवान् पुरुषाविषयीं (तुमचा इतका आदर कीं) आपल्या विद्वान् भक्तास तुम्ही त्याचेप्रमाणें व्हावयास सांगतां त्यासच जेथें धेनु विपुल आहेत अशा (वैभवाचें) स्थान[4] प्राप्त होतें. ३

यज्ञामध्यें[5] ह्याच वीराच्या पवित्र दर्भांवर सोमरस काढून ठेवतात व स्तुति व संतोषप्रद गायन गातात. ४

जो सर्व मानवापेक्षां वरिष्ठ आहे[6] अशा या भक्ताची हांक (मरुत् देव) श्रवण करोत, ह्याचें वैभव सूर्यापर्यंत जाऊन पोंचेल इतकें (विपुल) आहे. ५ (११)

---

१ विमहस[1] मरुतः दिवः यस्य क्षये[2] पाथ हि सः जनः सुगोपातमः ।

२ यज्ञवाहसः यज्ञैः वा विप्रस्य मतीना वा, मरुतः, हवं शृणुत ।

३ उत यस्य वाजिनः अनु विप्र अतक्षत सः गोमति व्रजे[4] गन्ता ।

४ दिविष्टिषु[5] अस्य वीरस्य बर्हिषि सोम सुतः उक्थ मदः च शस्यते ।

५ यः विश्वाः चर्षणीः अभि भुव. अस्य श्रोषन्तु. इषः सूरं चित् सश्चुषीः ।

तुम्ही मानवांचे ( किती दक्षतेनें ) रक्षण करितां हे पाहून, हे **मरुत्** देवहो, आम्ही अनेक वर्षांपासून आपणांस ( हवि ) अर्पण करीत आहों. ६

हे अत्यंत पूज्य **मरुत्** देवहो, ज्याचे हवि[७] तुम्ही स्वीकारतां तो मनुष्य खचित परम भाग्यवान् होय. ७

सत्यबलसमृद्ध हे **मरुत्** देवांनो तुमची स्तुति भक्तजन किती परिश्रमपूर्वक[८] करतात व तुमचे संबंधीं प्रेम बाळगणाऱ्या भाविकाचे मनांत काय काय इच्छा असतात हें तुम्हास विदितच आहे. ८

सत्यबलपरिपूर्ण हे **मरुत्** देवहो, तुम्ही आपल्या सामर्थ्याचे योगानें त्याची प्रतीति[९] दाखवा, व विद्युत्प्रहार करून राक्षसांचे निदारण करा. ९

हा निबिड अंधकार नाहींसा करा व सर्व दुष्टांना पार घालवून द्या. ज्या प्रकाशाची आम्हांस आवड आहे तो प्रकाशही आम्हास अर्पण करा. १० (१२)

---

६ मरुतः चर्षणीनां अवोभिः पूर्वीभिः शरद्भिः ददाशिम हि ।

७ प्रयज्यव. मरुत', यस्य प्रयांसि पर्षथ स. मर्त्यः सुभग अस्तु ।

८ सत्यशवसः नर. शशमानस्य स्वेदस्य वा वेनतः कामस्य विद ।

९ सत्यशवस. महित्वना यूय तत् आवि. कर्त. विद्युता रक्ष· विध्यत ।

१० गुह्यं तमः गूहत विश्वं अत्रिणं वियात. यत् उश्मसि ज्योति· कर्त ।

## सूक्त. ८७

॥ ८७ ॥ ऋषि–रहूगणपुत्र गोतम । देवता–मरुत् ॥

ज्याप्रमाणें प्रकाशकिरण[1] नजरेस पडले कीं त्यांचेबरोबर (आकाशस्थ) ज्योति दृष्टीस पडावयाच्याच त्याचप्रमाणे (हें पहा) कित्येक मरुद्देव आपलीं सुंदर भूषणे धारण करून प्रकट झाले आहेत. ह्यांचे सामर्थ्य विशाल, बल अगाध, महत्व मोठे व पराक्रम अतिशय असून हे कोणापुढेंही नम्र होणारे नाहीत. हे कोणाकडूनही स्थानभ्रष्ट व्हावयाचे नाहींत. ह्यांचा स्वभाव सरळ आहे आणि त्यामुळे ते (सर्वांस) अत्यंत आवडते झाले आहेत. १

जेव्हां कोणत्या तरी अद्भुत मार्गांनीं पक्ष्याप्रमाणें येऊन, हे मरुतहो, तुम्ही पृथ्वीचे समीप[2] धावत्या[3] मेघास धाववून धरतां, त्यावेळीं तुमचे रथावर ते (उदकाचे) संचय कोसळूं लागतात. (म्हणून) आपल्या भक्ताच्या विनतीस मान देऊन तुम्ही मधुसदृश मधुर अशा उदकाची वृष्टि करा. २

ज्यावेळीं ते बाहेर जातानां आपण सुन्दर दिसावे म्हणून आपलीं भूषणे चढवूं लागतात त्यावेळीं ह्यांच्या प्रत्येक चलनवलनाबरोबर एखाद्या अस्थिर वस्तूप्रमाणें पृथिवी हालूं लागते. क्रीडा करणारे, जग हालवून सोडणारे, लकलकणारी शस्त्रास्त्रे धारण करणारे, व सर्वांची दाणादाण उडविणारे मरुत्‌देव आपला महिमा आपणच गावयास लावतात. ३

स्वतःसंचारी,[4] टिपकेदार रंगाच्या अश्वावर आरूढ होणारा, तारुण्ययुक्त आणि अशा प्रकारे सर्वांवर आपली सत्ता चालविणारा, हा मरुताचा समुदाय, खरोखर (अनेक प्रकारच्या) सामर्थ्यांनी परिवेष्टित झालेला आहे. ४

आमच्या पुरातनकालीं जन्म पावलेल्या पितराचें नांव घेऊन आम्ही सांगतों कीं सोमाचे दर्शन[5] घडल्याबरोबर (ह्या मरुतांची) जिव्हा लालसेनें पुढे येते. ज्यावेळीं उत्तेजनकारक शब्द करीत हे युद्धकालीं इंद्रास जाऊन मिळाले तेव्हांच त्यांस यज्ञयागांत विख्यात असलेलें (पवित्र) नाव प्राप्त झालें. ५

---

१ प्रत्वक्षसः प्रतवस. विराशिनः अनानताः अविथुराः ऋजीषिण जुष्टतमासः नृतमासः के ज्यित् उस्राः इव स्तृभि[1] अंजिभि. वि आनज्रे ।

२ मरुतः यत् वय. इव केन चित् पथा उपह्वरेषु[2] यथि[3] अचिध्वं, कोशाः वः रथेषु उप आ श्चोतन्ति अर्चते मधुवर्ण घृत उक्षत ।

३ यत् यामेषु शुभे युजते ह एषां अज्मेषु भूमि विथुरा इव प्र रेजते क्रीळय:, धुनयः भ्राजदृष्टयः धूतयः ते स्वय महित्व पनयन्त ।

४ स्वसृत्[4] पृषदश्व. युवा अया ईशानः सः गणः तविषीभि आवृतः हि. सत्य. ऋणयावा अनेद्यः अस्य. अथ वृषा गण अस्या धिय प्राविता ।

५ प्रत्नस्य पितुः जन्मना वदामसि सोमस्य चक्षसा[5] जिह्वा प्र जिगाति. यत् ईं इन्द्रं शमि ऋक्वाणः आशत यज्ञियानि नामानि दधिरे इत् आन् ।

उत्तम हवि ज्यांस सदोदित प्राप्त होतात अशा त्या **मरुतांनीं** सौंदर्याच्या वृद्धीसाठीं **कोणास** तेजस्विता अर्पण केली ? त्यांनीं प्रकाशाचा लाभ कोणास करून दिला ? व कोणाची **प्रशंसा**[६] व्हावयास लावली? चपल[७], निर्भय, व शस्त्रास्त्रे धारण करणाऱ्या त्या **मरुत्** देवांनीं आपल्या प्रिय निवासस्थानाकडे संचार केला. ६ (१३)

## सूक्त ८८.

॥ ८८ ॥ ऋषि–रहूगणपुत्र गोतम । देवता–मरुत् ॥

अश्व हेच ज्यांचे पक्ष आहेत, ज्यात आयुधांचा भरपूर पुरवठा आहे, ज्यांची फार स्तुति झालेली आहे, व ज्यांत विजा लखलखत आहेत अशा आपल्या रथांत बसून, हे **मरुत्**हो, इकडे या. युक्तिप्रयुक्तीत अत्यंत चतुर असणाऱ्या हे देवांनो, (सर्व लोकात) अत्यंत विपुल समजली जाईल अशी पोषणसामर्थ्री[१] बरोबर घेऊन येथे पक्ष्याप्रमाणे उड्डाण करा. १

कोणा श्रेष्ठ पुरुषाचे (गृह) सुशोभित करण्याकरिता ते रथास वेगानें वाहून[२] नेणाऱ्या आपल्या ताम्रवर्ण आणि पीतवर्ण अश्वावर आरूढ होऊन चालले आहेत ? (स्वहस्तांत) आयुधें धारण करणारा हा (**मरुत्** देवाचा समुदाय) सुवर्णाप्रमाणें आश्चर्यकारक कान्तीनें[३] युक्त दिसत आहे. ह्या (**मरुतां**नी) आपल्या रथचक्राच्या धावेनें[४] जमीन विदारण करून टाकली आहे. २

(जगश्रीनें) कोणास विभूषित करण्याकरिता तुमच्या देहावर शस्त्रास्त्रें चमकत आहेत ? ज्याप्रमाणे लतादिक आकाशात डोकें उंच वर काढतात त्याप्रमाणे (तुझे भक्त) वर तुझ्याकडे स्तोत्रें[५] पाठवून देत आहेत. मोठ्या वैभवात जन्म पावलेल्या व अत्यंत तेजानें युक्त असलेल्या हे **मरुत्** देवांनो, तुमच्यासाठींच– खरोखर तुमच्याशिवाय दुसऱ्या कोणाकरिता **बरे**– हे भक्तजन यज्ञपापाणाचें[६] (सोमरस काढण्याचे) काम चालू करीत आहेत. ३

जिच्यामध्ये उदकवृष्टि[७] घडवून आणण्याचे सामर्थ्य आहे अशा ह्या दिव्य स्तुतीभोंवतीं व तुमच्याही सभोंवार, हे गृध्रहो, (उज्ज्वल प्रकाश देणारे) दिवस आकर्षित झाले. स्तुति करणाऱ्या गोतमांनींही आपल्या स्तवनाच्या योगानें आपणास उदकपान करावयास सापडावें म्हणून, पाण्याच्या झऱ्यास[८] वर पाठविलें. ४

---

६ सुखादयः प्रयसा भानाज क स मिमिक्षिरे ? ते रश्मिभि (क स मिमिक्षिर) ? ते ऋक्वभि (क सं मिमिक्षिरे) ? इष्मिण अर्मत्र वाशीमन्त प्रियस्य मारुतस्य धाम्नः विद्रे ।

१ मरुत विद्युन्मद्भि स्वर्क ऋष्टिमद्भि अश्वपर्णै रथेभि आ यात सुमायाः वर्षिष्ठया इषा वयः न नः आ पप्तत ।

२ अरुणेभि पिशङ्गैः रथतूर्भिः अश्वैः क वर यान्ति? रुक्मवक्षसः रुक्मः न चित्र रथस्य पव्या भूम जघनन ।

३ क श्रियं वः तनूषु अधि वाशी ? वना न मेधा ऊर्ध्वा कृणवन्ते. सुजाताः तुविद्युम्नासः क अद्रि धनयन्त ? युष्मभ्य ।

४ गृध्रा वार्कार्यो इमा देवी धिय व अहानि परि आ अगु ब्रह्म कृण्वन्त गोतमास पिबध्यै अवं: उत्सधिं ऊर्ध्वं नुनुद्रे ।

ज्यांनीं सुवर्णचक्र हातांत धारण केलें आहे व ज्यांच्या दंष्ट्रा लोखंडाप्रमाणें बळकट आहेत असे जे आपण सर्वत्र संचार करणारे वराह[९] त्यांचें प्रत्यक्ष दर्शन होत असतांना, हे **मरुत्** देवानो, गोतमानें जें स्तोत्र गाइलें[१०] तें इतकें यशस्वी होतें कीं कोणत्याही दुसऱ्या स्तोत्रास त्याची सर[११] आली नाहीं. ५

हे **मरुत्**हो, तुमच्या मनास संतोष[१२] अर्पण करणारी ही स्तुति, तुमच्या ( इतर ) भक्तांच्या वाणीप्रमाणेच तुमचें स्तवन करण्यात निमग्न झाली आहे. ज्या अर्थी तुमच्या हातीं वैभवाचा ठेवा आहे त्या अर्थी उपासकांनीं तुमचें स्तवन केलें हें साहजिकच[१३] होय. ६ (१४)

## सूक्त ८९.

॥ ८९ ॥ ऋषि–रहूगणपुत्र गोतम । देवता–विश्वेदेव ॥

ज्यांस प्रतिरोध करिता येणें अशक्य आहे, ज्यास कधींही पराभव माहीत नाहीं व जीं ( सर्वदा ) विजयशाली होतात अशीं कल्याणप्रद सामर्थ्यें चोहोंकडून आम्हास प्राप्त होवोत. ह्यामुळेच देव आम्हास सदोदित उत्कर्षप्रद व आमचे रोजचेरोज अविश्रांत[१] संरक्षणकर्ते होतील. १

सरळत्व गुणानें युक्त अशा देवाची कल्याणकारक कृपा व त्यांची उदारता[१] आम्हांस अनुलक्षून प्रवृत्त होवो. देवाच्या मित्रत्वाचा आम्हास उपयोग घडो. आमचें जीवमान दीर्घकाल-पर्यंत कायम रहावें म्हणून देव आमचें आयुष्य वर्धन करोत. २

त्या देवास म्हणजे भग, मित्र, अदिति, ज्यास कोणाकडूनही अपाय होणे शक्य नाहीं असा दक्ष ह्याना, व ( त्याचप्रमाणे ) अर्यमा, वरुण, सोम व अश्विनद्वय ह्यानाही मी एक प्राचीन स्तोत्र[३] गाऊन निमंत्रण करितो. दयाळू सरस्वती आम्हास सौख्य[४] अर्पण करो. ३

---

५ मरुतः, हिरण्यचक्रान् अयोदंष्ट्रान् विधावतः वराहून्[९] वः पश्यन् यत् गोतम सस्व[१०] एतत् त्यत् योजन न अचेति[११]

६ मरुत एषा स्या वः अनुभर्त्री वाघतः वाणी न प्रति स्तोभति. गभस्त्योः स्वधां अनु आसां वृथा[१३] अस्तोभयत् ।

१ अदब्धासः अपरीतास उद्भिदः भद्राः क्रतवः नः विश्वतः आ यन्तु, यथा देवासः सद इत् नः वृधे दिवेदिवे अप्रायुव[१] रक्षितारः असन् ।

२ ऋजूयतां देवानां भद्रा सुमतिः देवानां रातिः[१] नः अभि निवर्तताम्. देवानां सख्यं वयं उप सेदिम. जीवसे देवाः नः आयुः प्र तिरन्तु ।

३ वय तान् भग, मित्र, अदितिं, अस्रिध दक्षं, अर्यमणं, वरुणं, सोम, अश्विना, पूर्वया निविदा[३] हूमहे. सुभगा सरस्वती नः मयः[४] करत् ।

ते हितकारक औषध आमचेकडे वायु वाहून आणो. त्याचप्रमाणे माता पृथिवी व पिता द्युलोक देहो ( तें औषध घेऊन येवोत ). सोमनिष्पादन करणारे असे सुखदायक यज्ञपाषाण व अश्विनीदेवही तें .( आम्हास आणून देवोत ). हे स्तवनार्ह ( अश्विनी ) देव हो, तुम्ही आमची ( प्रार्थना ) ऐका. ४

बुद्धीस प्रेरणा[5] करणाऱ्या व स्थावर जंगम वस्तुमात्रावर अमल गाजविणाऱ्या त्या सत्ताधीश देवास आम्ही स्वसंरक्षणार्थ आमंत्रण करितो. ह्यायोगानें पूषा आमच्या वैभवाची[6] वृद्धि करणारा व आम्हांस सुखशांतता अर्पण करणारा होईल. कारण तो अजिंक्य असून आमचे संरक्षण व परिपालन करणारा आहे. ५ (१५)

ज्याची कीर्ति अतिशय विस्तार पावली आहे असा इंद्र आम्हांस क्षेम अर्पण करो, सर्वज्ञ पूषा देव आम्हांस क्षेम अर्पण करो, ज्याच्या रथाच्या धावेस कोठेंही प्रतिबंध[7] नाहीं असा तार्क्ष्य आम्हांस क्षेम अर्पण करो, व बृहस्पतीही आम्हांस क्षेम अर्पण करोत. ६

ज्याच्या अश्वांचा वर्ण ठिपकेदार आहे, ज्यांची माता पृश्नि ही होय, सर्वांचें शुभ करण्याकडे ज्यांची प्रवृत्ति आहे व जे यज्ञामध्यें नेहमीं गमन करतात असे मरुत्देव व त्याचप्रमाणे अग्नि हीच ज्यांची जिव्हा आहे व जे सूर्याचे निरीक्षण करणारे आहेत असे मनु असे हे सर्व देव, सर्वांचे संरक्षण करणारे असें आपलें सामर्थ्य बरोबर घेऊन, येथे गमन करोत. ७

हे देवहो, तुमच्या कृपेने आम्हांस कानानीं चांगले ऐकूं येईल, व हे यज्ञार्ह पुरुष हो, ( तुमच्याच कृपेनें ) आमच्या नेत्रांनीं आम्हास चांगलें दिसेल; खरोखर जे आयुष्य देवांनीं आम्हास दिलें असेल त्याचा, आमचीं गात्रे शाबूत राहून व शरीरस्थैर्य चांगलें टिकून, त्यांचें स्तवन करीत करीत, आम्ही उपभोग घेऊ. ८

---

४ तत् मयोभु भेषज वातः न. वातु. तत् माता पृथिवी, तत् पिता द्यौः तत् मयोभुव. सोमसुत ग्रावाण तत् अश्विना. धिष्ण्या युवं शृणुत ।

५ धियजिन्व[5] जगत. तस्थुष: पतिं ईशान त वय अवसे हूमहे, यथा अदब्ध पायु पूषा न. वेदमां वृधे स्वस्तये असत् ।

६ वृद्धश्रवाः इन्द्रः न. स्वस्ति, विश्ववेदाः पूषा नः स्वस्ति, अरिष्टनेमि[7] तार्क्ष्य न स्वस्ति, बृहस्पते नः स्वस्ति दधातु ।

७ पृषदश्वा:, पृश्निमातर:, शुभयावान , विदथेषु जग्मय मरुत अग्निजिह्वा सूरचक्षस मनव विश्वे देवाः नः अवसा इह आ गमन् ।

८ देवा., कर्णेभिः भद्र शृणुयाम, यजत्रा:, अक्षभिः भद्र पश्येम. यत् आयुः देवहित स्थिरै. अगै तनूभिः तुष्टुवांस: वि अशेम ।

हे देवहो, आमचे (आयुष्याचीं) कायती शंभरच वर्षे असतात व त्यात तुम्ही आमच्या शरीरास वार्धक्य आणता व त्यातच ( आज ) जे पुत्र म्हणून आहेत ते ( उद्या ) बाप व्हावयाचे असतात. हासाठीं आमच्या आयुष्यक्रमणाच्या मध्यतरीच त्याची ( साखळी ) तोडू नकोस. ९

**अदिति** हीच द्युलोक होय. **अदिति** हीच अंतरिक्ष होय. **अदिति** हीच माता, तीच पिता व तीच पुत्रही होय. **अदिति** हीच सर्व देव व पाचही प्रकारचे मानव होय. जें सर्व कांहीं उत्पन्न झाले आहे तीं **अदितिच** होय व जें कांहीं अजून उत्पन्न व्हावयाचें आहे तेंही **अदितिच** होय. १० (११)

## सूक्त ९०.

॥ ९० ॥ ऋषि-रहूगणपुत्र गोतम । देवता-विश्वेदेव ॥

**वरुण,** प्रज्ञावान मित्र आणि सर्व देवांसहवर्तमान **अर्यमा,** आम्हास सरळ मार्गाने[1] घेऊन जावोत. १

वैभवाचा संग्रह करणारे हे देव, आपल्या सामर्थ्यामुळे आपल्या दक्षतेत[2] कधींहीं अतर न पडू देता सदैव आपल्या अनुशासनाचे संरक्षण करीत असतात. २

दुष्ट लोकांचे निर्मूलन करून या मृत्युबाधेपासून निर्मुक्त अशा देवांनी आम्हा मानवास सौख्य अर्पण केले आहे. ३

---

९ देवाः शतम इत् नु अन्ति, यत्र न तनूनां जरस चक्र, यत्र पुत्रास पितरः भवन्ति, मा नो मध्या नः आयुः मा रिरिषत ।

१० अदितिः द्यौः, अदितिः अन्तरिक्षं अदितिः माता स. पिता, सः पुत्रः. विश्वे देवाः पञ्च जनाः अदितिः, अदितिः. जातं, अदितिः. जनित्वं ।

१ वरुणः, विद्वान मित्रः, देवैः सजोषाः अर्यमा ऋजुनीती[1] नः नयतु ।

२ वस्वः वसुदाना महोभिः अप्रयुच्छ[2] ते विश्वाहा व्रता रक्षन्ते हि ।

३ द्विषः अप बाधमाना अमृता ते अस्मभ्यं मर्त्येभ्यः शर्म यसन. ।

ते वंद्य असे इन्द्र, मरुत्, पूषा, व भग हे देव आमच्या कल्याणासाठीं[3] मार्ग हुडकून काढोत. ४

आपआपल्या मार्गांनीं[4] गमन करणाऱ्या हे पूषा व विष्णु देवांनो, आमच्या प्रार्थना आम्हांस मुख्यत्वेंकरून[5] धेनूंचा लाभ घडवितील असे करा, व आम्हांस सुखी ठेवा. ५ (१७)

जो नीतिनियमनांचें[6] योग्य परिपालन करितो त्याचेकरिता वारे संतोषदायक रीतीनें वाहूं लागतात व त्याचेकरिता नद्याही मधुर रीतीनें वाहतात. आमच्या ओषधी आमच्याकरिता माधुर्य-युक्त होवोत. ६

रात्र व प्रभातकाल हे गोड असोत, व भूलोक व रजोलोक हेही माधुर्यानें भरलेले असोत. आमचा प्रिय पिता द्युलोक हाही आमचेसाठीं सुखावह होवो. ७

आमचेसाठीं वनस्पति माधुर्ययुक्त असोत व (आमचेसाठीं) सूर्यही सुंदर होवो. धेनु आम्हांस गोड दूध देणाऱ्या होवोत. ८

मित्र आम्हांस सुखावह होवो, वरुण आम्हांस सुखावह होवो, अर्यमाही आम्हांस सुखावह होवो, इंद्र व बृहस्पति आम्हांस सुखावह होवोत व अनेक प्रदेशांवर गमन[7] करणारा विष्णुही आम्हांस सुखावह होवो. ९ (१८)

---

४ वन्द्यासः इन्द्रः मरुतः, पूषा, भगः न सुविताय[3] पथः वि चियन्तु ।

५ उत, एवयावः[4] पूषन् विष्णो, नः धियः गोअग्राः,[5] नः स्वस्तिमतः कर्त ।

६ ऋतायते[6] वाताः मधु, सिन्धवः मधु क्षरन्ति, नः ओषधी माध्वी. सन्तु ।

७ उत, नक्तं उषसः मधु, पार्थिवं रजः मधुमत्, नः पिता द्यौः नः मधु अस्तु ।

८ वनस्पतिः नः मधुमान्, सूर्यः नः मधुमान् गावः नः माध्वीः भवन्तु ।

९ मित्रः नः शं, वरुणः अर्यमा नः शं भवतु इन्द्रः बृहस्पतिः नः शं, उरुक्रमः[7] विष्णुः नः शं ।

## सूक्त ९१.

॥ ९१ ॥ ऋषि–रहूगणपुत्र गोतम । देवता–सोम ॥

**हे सोम**–देवा, तूं अत्यंत प्रज्ञावान् व विचारी आहेस. तूच ( सर्व जगास ) सरळ मार्गाकडे नेऊन पोंचवितोस. हे **इन्दो**, तुझ्या मार्गदर्शकपणाखालीं[1] आमच्या **सुज्ञ** वाडवडिलांस देवसमुदायामधून उत्तम उत्तम देणग्याचा लाभ झाला. १

**हे सोम**–देवा, तुझ्या ठायीं अनेक सामर्थ्यें एकत्र झाल्यामुळें **तूं सामर्थ्यवान् झालास.** तूं **सर्वज्ञ** असून अनेक प्रकारची शक्ति[2] तुझ्या ठायीं वास करीत असल्यामुळें तूं शक्तिमान् बनलास. आपल्या श्रेष्ठपणामुळे अनेक बलें तुला संपादन करतां आलीं म्हणून बलवान्पणा तुझ्या अंगीं आला. अनेक प्रकारची उज्ज्वल संपत्ति तुला प्राप्त झाली म्हणून तुला वैभवशालित्व आलें. सर्व मानवांवर तुझी दृष्टि आहे. २

जीं जीं नियमनें[3] ( ह्या पृथिवीवर ) प्रचलित आहेत तीं तीं तूं जो राजा **वरुण** त्याचींच होत. हे **सोमा**, तुझें निवासस्थान विशाल व भव्य आहे. तूं देदीप्यमानही आहेस. हे **सोम**–देवा, तूं **मित्रा**प्रमाणें सर्वांचा आवडता व **अर्यमा**प्रमाणें सामर्थ्यवान् आहेस. ३

द्युलोकांत, पृथिवीवर, पर्वतांवर, औषधींत, अथवा उदकामध्यें जीं जीं तुझीं निवासस्थानें असतील त्या त्या सर्व ठिकाणीं, हे **सोम**-राजा, तूं ( आमच्यावरचा ) राग[4] टाकून प्रसन्न मनानें ह्या हवींचा स्वीकार कर. ४

हे **सोमा**, तूच ( सर्वांचा ) दयाशील अधिपति आहेस. तूं राजा आहेस, तूं वृत्राचा वध करणारा आहेस, तूं कल्याणकारिक अशी श्रेष्ठ शक्ति आहेस. ५ (१९)

---

१ सोम, त्वं प्र चिकितः मनीषा; त्वं रजिष्ठं पन्थां अनु नेषि. इन्दो, तव प्रणीती नः धीराः पितरः देवेषु रत्नं अभजन्त ।

२ सोम, क्रतुभिः त्वं सुक्रतुः भूः, विश्ववेदाः त्वं दक्षैः सुदक्षः, महित्वा वृषत्वेभिः त्वं वृषा. नृचक्षाः द्युम्नेभिः द्युम्नी अभवः ।

३ व्रतानि ते वरुणस्य राज्ञः नु सोम तव धाम बृहत् गभीरं त्वं शुचिः असि, मित्रः न प्रियः. सोम अर्यमा इव दक्षाय्यः असि ।

४ राजन् सोम, या ते धामानि दिवि, या पृथिव्यां, या पर्वतेषु, ओषधीषु, अप्सु, तेभिः विश्वैः अहेळन् सुमनाः हव्या गृभाय ।

५ सोम, त्वं सत्पतिः असि, त्वं राजा, उत वृत्रहा, त्वं भद्रः क्रतुः असि ।

**हे सोमा,** आम्हीं आपल्या आयुष्याचा उपभोग घ्यावा असें तूं मनांत[6] आणशील, तर आम्हास ( मध्येंच ) मृत्यु येणार नाहीं. तूं अरण्यांतील वृक्षांचा मालक आहेस व तुला स्तुति प्रिय आहे. ६

**हे सोमा,** तुझे नीतिनियम[7] पाळणाऱ्या भक्तास, तो तरुण असताना अथवा वृद्धत्व पावल्यावरही तूं सौख्य अर्पण करितोस; त्याची आयुष्यवृद्धि व्हावी म्हणून तूं त्यास उत्तम सामर्थ्य देतोस. ७

**हे सोमराजा,** पातकी[8] मनुष्यापासून तूं आमचें चोहोंकडून रक्षण कर. तूं ज्याचा संरक्षक आहेस अशा तुझ्या प्रिय भक्तांचा नाश होणें युक्त नाहीं. ८

**हे सोमा,** तुला हवि अर्पण करणाऱ्या भक्तांच्या संरक्षणाकरिता जीं सुखपरिणामी साधनें तूं सज्ज करून ठेवलीं असशील तीं घेऊन आमचें संरक्षण कर. ९

हा यज्ञ व ही स्तुति ह्यांचा स्वीकार[10] करीत इकडे ये. **हे सोमा,** तूं आमचा उत्कर्ष करणारा हो. १० (२०)

---

६ सोम, त्वं च नः जीवातु वशः[6] न मरामहे. प्रियस्तोत्रः, वनस्पतिः ।

७ सोम, ऋतायते,[7] यूने महे, त्वं भगं, जीवसे दक्ष दधासि ।

८ सोम राजन, अघायत[8] त्वं न विश्वत रक्ष त्वावत सखा न रिष्येत.

९ सोम, या' ते मयोभुव' ऊतय दाशुषे सन्ति ताभि न अविता भव ।

१० इमं यज्ञ, इद वच जुजुषाण[10] उपागहि सोम. त्व न वृधे भव ।

**हे सोमा,** स्तुति[9] कशी करावी ह्याचें ज्ञान संपादन करून आम्ही स्तोत्रानीं तुला संतुष्ट करीत आहांत. ह्यासाठीं तू प्रसन्न अंतःकरणानें आम्हांकडे ये. ११

**सोमा,** तू आमच्या वैभवाची वृद्धि कर,[10] आमचे रोग हरण कर, आम्हास संपत्ति दे, आमचे घरीं धनधान्याची वृद्धि होऊं दे, व तू आमचा उत्तम मित्र हो. १२

**हे सोमा,** ज्याप्रमाणें स्वगृहीं[11] मनुष्य आनंदात असतो अथवा तृण पाहून धेनु संतुष्ट होतात, त्याप्रमाणें आमच्या अंतःकरणात संतोष उत्पन्न कर. १३

**हे सोम**देवा, जो मानव तुझ्या मित्रत्वांत आनंद[12] मानतो त्याच्याच सहवासाची सामर्थ्यवान् व प्रज्ञावान् लोक इच्छा करितात. १४

हे **सोमा,** दुरुक्तीपासून आमचा बचाव[13] कर, व पातकापासून आमचे संरक्षण कर. सौख्य अर्पण करून तू आमचा उत्तम स्नेही हो. १५ (२१)

---

११ सोम, वचोविदः[9] गीर्भिः त्वा वर्धयामः, सुमृळीकः नः आ विश ।

१२ सोम, गयस्फानः,[10] अमीवहा, वसुवित्, पुष्टिवर्धनः, नः सुमित्रः भव ।

१३ सोम, स्वे ओक्ये[11] मर्यः इव, गावः यवसेषु न, नः हृदि आ ररन्धि ।

१४ सोम देव, यः मर्त्यः तव सख्ये ररणत्,[12] तं दक्षः कविः सचते ।

१५ सोम, अभिशस्तेः नः उरुष्य,[13] अंहसः नि पाहि. नः सुशेवः सखा एधि ।

हे **सोमा**, तू प्रवृद्ध[16] हो, सामर्थ्याचा प्रवाह चोहोंकडून तुझ्याकडे चालू होवो. जेथे अनेक पराक्रम एकवटलेले असतील त्या ठिकाणी तुझा वास असो. १६

हे अत्यंत आनंद[17] अर्पण करणाऱ्या **सोमा**, आपल्या सर्व प्रकाशकिरणांनी तू वृद्धिगत हो. तुझी मनोहर कीर्ति सर्वत्र विदित आहे, व तू आमचा प्रेमळ स्नेही आहेस, म्हणून तू आम्हास उत्कर्ष प्राप्त करून दे. १७

दुष्टाचा[18] पराभव करणाऱ्या ( हे **सोमा**, ) ( ह्या जगात ) जेवढे म्हणून दुग्ध आहे तेवढे सर्व तुझ्याकडे येवो, सर्व सामर्थ्य तुला प्राप्त होवो, व सर्व शक्तींचा ओघ तुझ्याकडे वळो. हे **सोमा**, आपले अमरत्व प्रस्थापित होण्याकरिता तू अभिवृद्धि पावून द्युलोकात उत्तम कीर्ति धारण कर. १८

तुझ्या ज्या निवासस्थानांची ( सर्व लोक ) हवींनी पूजा करितात, ती सर्व आमच्या यज्ञावर हरएक बाजूंनी कृपादृष्टि ठेवोत. हे **सोमा**, आमच्या घरांची वृद्धि करोत, आम्हाविषयी दानशूरता धारण करोत, आपले वीर्य गाजवोत, व जे मित्र असतील त्यांचे हनन करोत, तूं आमच्या गृहाकडे[19] येण्यास प्रवृत्त हो. १९

**जो** ह्या ( सोमास ) हवि अर्पण करितो, त्यास सोम **धेनूंचा** लाभ घडवितो, वेगाने **धांवणारा अश्व** देतो, व स्वकर्माविषयी दक्ष, घरादाराची काळजी घेणाऱ्या, यज्ञकर्मे चुकू न **देणाऱ्या, समाजात प्रतिष्ठितपणे वागणाऱ्या,** व आपल्या पित्याची कीर्ति वाढविणाऱ्या अशा **शूर अपत्याची प्राप्ति करून देतो.** २० (२२)

---

१६ सोम, आ प्यायस्व," ते वृष्ण्य विश्वत. स एतु वाजस्य सगथे भव ।

१७ मन्दितम" सोम, विश्वेभि अंशुभि आ प्यायस्व सुश्रवस्तम सखा न. वृधे भव ।

१८ अभिमातिसह" सोम, पयांसि ते स ( यन्तु ), वाजा स य न्तु, वृष्ण्यानि स ( यन्तु ) अमृताय आप्यायमान: दिवि उत्तमानि श्रवांसि धिष्व ।

१९ या ते धामानि हविषा यजन्ति ता ते विश्वा यज्ञं परिभू अस्तु सोम, गयस्फान, प्रतरण, सुवीर, अवीरहा, दुर्यान्" प्र चर ।

२० य अस्मै ददाशत, सोम. धेनु, सोम. आशु अर्वन्त, सोम कर्मण्य, सादन्य, विदथ्य, सभेय **पितुश्रवण, वीर ददाति ।**

युद्धात अजिक्य, संग्रामात साहाय्यकारक, स्वर्गातून उदकास आणणारा, **सकटकाली**[18] रक्षण करणारा, यज्ञात आविर्भूत होणारा, उत्तम मंदिरात वास्तव्य करणारा, उत्तम कीर्तीने मंडित असलेला, व सर्वदा विजयी, असा जो तू त्या तुला पाहून हे **सोमा,** आम्ही प्रमुदित होऊ. २१

हे **सोमा,** तू ह्या सर्व वनस्पति उत्पन्न केल्यास, तू पाणी उत्पन्न केलेस, व तू धेनू निर्माण केल्यास, हे विशाल अंतरिक्ष तूं सर्वत्र पसरलेस, व प्रकाशाच्या योगाने तू अंधकाराचा नाश[19] केलास. २२

हे सामर्थ्यवान् **सोम**–देवा, आमच्याकरिता संपत्तीची भरती करण्याकरिता तुझ्या दिव्य अंतःकरणात जितकी कळकळ असेल तितक्या कळकळीने युद्ध कर. तुला कोणीही प्रतिबंध[20] न करो. ( सर्व ) सामर्थ्याचा स्वामी तूंच आहेस. धेनुप्राप्तीकरिता युद्ध चालले असता तूं दोन्ही पक्षांना आपले तेज जाणावयास[21] लाव. २३ (२३)

## सूक्त ९२.

॥ ९२ ॥ ऋषि–रहूगणपुत्र गोतम । देवता–उषा ॥

त्या ह्या ( सर्व प्रसिद्ध ) **उषांनी** आपले निशाण फडकाविले आहे. अंतरिक्षाच्या पहिल्या अर्ध्या भागात त्या आपले सुंदर किरण फेकीत आहेत. आपली शस्त्रे परजणाऱ्या ( शूर ) योद्ध्याप्रमाणे आपले लखलखणारे[1] तेज प्रकट करीत ह्या माता– ह्या धेनु– इकडे येऊं लागल्या आहेत. १

२१ सोम, युत्सु अषाळ्हं पृतनासु पप्रिं अप्सां स्वर्षां, वृजनस्य[18] गोपां, भरेषुजां, सुक्षितिं, सुश्रवसं जयन्तं त्वा अनु मदेम ।

२२ सोम, त्वं इमाः विश्वाः ओषधीः, त्वं अपः, त्वं गाः अजनयः, त्वं उरु अन्तरिक्षं आ ततन्थ, त्वं ज्योतिषा तमः वि ववर्थ[19] ।

२३ सहसावन् देव सोम, देवेन मनसा, नः रायः भागं अभि युध्य. त्वा मा आ तनत्[20] वीर्यस्य ईशिषे. गविष्टौ उभयेभ्यः प्र चिकित्स[21] ।

१ एताः त्याः उषसः केतुं अक्रत रजसः पूर्वे अर्धे भानुं अञ्जते धृष्णवः आयुधानि इव निष्कृण्वानाः अरुषीः गावः मातरः प्रति यन्ति ।

ह्यांचीं रक्तवर्ण किरणें कशीं सहज रीतीनें वर उड्या मारीत येत आहेत. रथास जोडण्यास कधींही त्रास न देणाऱ्या अशा लखलखीत प्रकाशाच्या गाई, ह्यांनी ( आपल्या रथास ) जोडल्या आहेत. पूर्वीप्रमाणें ( आजही सर्व जगावर उजेड पाडावा असा ) विचार[1] ह्या **उषांनीं** केला आहे. ह्या उज्ज्वल उषांनी झळझळणारें तेज धारण केलें आहे. २

सदाचारी, उत्तम हवि अर्पण करणाऱ्या, व सोमरस सिद्ध ठेवणाऱ्या, अशा आपल्या भक्ताकरितां त्यांच्या पोषणास भरपूर होईल इतकी संपत्ति सदैव घेऊन येणाऱ्या ह्या **युवति** फार लांबच्या प्रदेशापासून एकाच रथांत बसून येऊन, मोठ्या आवेशानें[3] जणूं काही आपण किती पराक्रमी आहों ह्याचें प्रदर्शनच करीत आहेत. ३

ज्या प्रमाणें एखादी नटी[4] ( निरनिराळे ) वेष धारण करिते त्या प्रमाणें ही **(उषा)** ( निरनिराळीं रूपें[4] घेऊन येते. जशी धेनु आपली कास[4] सर्वांच्या दृष्टीस पडूं देते. त्याप्रमाणें ही आपला वक्षःप्रदेश अनावृत ठेविते. सर्व जगास प्रकाश देणाऱ्या ह्या **उषेनें** ज्या प्रमाणें गाई आपला गोठा उघडा टाकून जातात, त्या प्रमाणें अन्धकारास उघडें टाकून दिलें आहे. ४

हिचा उज्ज्वल प्रकाश दिसूं लागला आहे. तो सर्वत्र पसरत असून निबिड[5] अन्धकाराचा नाश करीत आहे. यज्ञामध्यें ज्या प्रमाणें यज्ञस्तंभास[5] शोभवितात त्या प्रमाणें स्वशरीरास हिनें भूषविलें आहे. ही द्युलोकदुहिता आश्चर्यकारक प्रकाश आपले बरोबर घेऊन आली आहे. ५ (२४)

ह्या अन्धकाराचे बाहेर आम्ही ( एकदाच ) निघालों. ही ( पहा ) **उषा** आपला प्रकाश पाडीत आपले हेतू व्यक्त करीत आहे. ह्या दीप्तिमान **उषेनें** कवितेप्रमाणें चारुता धारण केलेली असून तिचें हसरें मुख व्यक्त होत आहे. आपल्या अत्यंत मनोहर स्वरूपानें[6] ती ( आम्हावर ) कृपाप्रसाद करण्याकरिता आली आहे. ६

---

२ अरुणा भानव. वृथा उत् अपप्तन्. स्वायुज. अरुषीः गाः अयुक्षत. पूर्वथा उषसः वयुनानि[1] अक्रन्. अरुषीः रुशन्त भानु अशिश्रयुः

३ सुकृते सुदानवे सुन्वते यजमानाय विश्वा इत अह इषं वहन्तीः नारीः परावतः समानेन योजनेन विष्टिभि.[3] अपरा न अर्चन्ति ।

४ नृतू[4] इव पेशांसि[4] अधि वपते उस्रा इव बर्जह[4] वक्षः अप ऊर्णुते. विश्वस्मै भुवनाय ज्योतिः कृण्वती उषाः, गाव व्रज, न तम वि आव. ।

५ अस्याः रुशत् अर्चि प्रति अदर्शि. वि तिष्ठते. अभ्व[5] कृष्णं बाधते. विदथेषु स्वरुं[5] न पेशः अंजन्. दिवः दुहिता चित्र भानु अश्रेत् ।

६ अस्य तमसः पार अतारिष्म. उषाः उच्छन्ती वयुना कृणोति विभाती छन्दः न श्रिये स्मयते, सुप्रतीका[6] सौमनसाय अजीगः ।

सत्य व माधुर्य ह्यांची स्फूर्ति करविणारी जी ही देदिप्यमान द्युलोककन्या, तिचे स्तवन **गोतमांनीं** केले आहे. हे **उषा–देवि,** ज्याचे योगाने आम्हास संतति व शूर लोक ह्यांचा लाभ होईल, अश्वाच्या योगाने ज्याचे अस्तित्व दृग्गोचर होईल, व मुख्यतः ज्याचे योगाने धेनूची प्राप्ति होईल, अशी सामर्थ्यें तूं आम्हास देत असतेस. ७

सामर्थ्यापासून जन्म पावून जी तू, आश्चर्यकारक पराक्रम[10] व कीर्ति प्रकट करीत, अत्यंत उज्ज्वल तेजानें प्रकाशत आहेस असे हे दयाशील **उषा–देवि,** ( तुझ्या कृपेने ) वीर पुरुष आमचे पदरी असल्याविषयींची कीर्ति मला प्राप्त होईल व नोकरचाकराची विपुलता असलेलें व ( अश्वशालेत अनेक ) अश्व असल्यामुळे सहज ओळखता येण्याजोगें असें वैभवही मला उपभोगण्यास सांपडेल. ८

सर्व जगताकडे ( एकदा ) नजर फेकून ही देवी आपली दृष्टि परत फिरविते व ( मग ) उज्ज्वल प्रकाश पाडावयास लागते. सर्व जीवाना संचारार्थ जागृत करून हिनें अखिल प्रतिभाशाली[11] कवींची स्तवनें संपादन करून घेतलीं आहेत. ९

पुनः पुन. जन्म घेत असून ही जी अति पुरातन म्हणून प्रसिद्ध आहे, त्याच त्याच रंगाच्या ( वस्त्रांनीं ) जी आपणास भूषवीत असते व श्वानाचा[12] वध करण्याकरिता त्याचेवर हत्यार चालविणाऱ्या[13] व त्यामुळे भीति उत्पन्न[14] करणाऱ्या हिंसक मनुष्याप्रमाणे जी ( सर्वांच्या आयुष्याची ) हानि करते, ती ही ( **उषा** ) देवी, मानवांचे आयुष्य हरण करीत ( येथे उभी आहे ). १० (२५)

द्युलोकाच्या सीमेपर्यंत प्रकाश पाडीत ही जागृत झाली आहे. आपली भगिनी ( जी रात्र ) तिला ही अतिशय दूर[15] घालवून देत आहे. मानवाच्या आयुष्याचा अवधि कमी कमी करीत ही युवति आपल्या वल्लभाच्या कांतीनें युक्त होऊन ( येथें ) प्रकाशत आहे. ११

---

७ भास्वती सूनृतानां नेत्री दिवः दुहिता गोतमेभि. स्तवे. उष , प्रजावतः, नृवत , अश्वबुध्यान्, गोअग्रान् वाजान् उप मासि ।

८ वाजप्रसूता या सुदंससा[10] श्रवसा बृहन्त विभासि सुभगे उष , त सुवीर यससं दासप्रवगं अश्वबुध्य रयिं अश्याम ।

९, विश्वानि भुवना अभिचक्ष्य देवी चक्षु. प्रतीची उर्विया वि भाति. विश्व जीव चरसे बोधयन्ती विश्वस्य मनायो.[11] वाच अविदत् ।

१० पुन पुन जायमाना पुराणी, समानं वर्णं अभि शुम्भमाना, कृत्नु.[13] विज.[14] स्वघ्नी[12] इव आ मिनाना देवी मर्तस्य आयु. जरयन्ती ।

११ दिवः अन्तान् वि ऊर्ण्वती अबोधि. स्वसारं सनुतः[15] अप युयोति. मनुष्या युगानि प्रमिनती योषा जारस्य योषा वि भाति ।

ज्याप्रमाणे उदधि हा आपल्या उदकाचें प्रदर्शन मांडतो त्याप्रमाणे सर्व पशूंना ( बाहेर मैदानात आणून ) त्याचे जणू काही प्रदर्शन मांडीत ही कृपाशील परंतु आश्चर्यकारक प्रकाशानें मंडित अशी **उषा** दूरवर[१६] प्रकाशली[१७] आहे. देवांच्या आज्ञाचा कधीही भंग न होऊं देता सूर्याच्या किरणांनी प्रकाशणारी ही **उषा** येथें दृग्गोचर[१८] होत आहे. १२

हे सामर्थ्यवान् **उषोदेवते,** ज्याच्या योगानें मुलें आणि नातवंडे ह्यांचा लाभ होईल असलें दुर्मिळ भाग्य आम्हास प्राप्त होईल असे कर. १३

सत्य व माधुर्य ह्यांनें परिप्लुत भाषण करणारे हे **उषे,** धेनु व अश्व ह्यांनीं सुसंपन्न असणारे हे देवि, आम्हास वैभव प्राप्त होण्यासाठीं तुझा मंगल प्रकाश आम्हांवर पाड. १४

सामर्थ्यसंपन्न हे **उषादेवि,** आपले रक्तवर्ण अश्व आज जोड आणि सर्व सौख्ये आम्हांकडे घेऊन ये. १५ (२६)

शत्रूंचा नाश करणाऱ्या हे **अश्विनी-**देवांनो, आमचें घर[१९] धेनूंनीं व सुवर्णानें मंडित करण्याकरिता आपण एकमतानें आपला रथ तिकडे घेऊन या. १६

---

१२ सिन्धु न क्षोद पशून् न प्रथाना सुभगा चित्रा उर्विया[१६] वि अश्वैत्[१७]. देव्यानि व्रतानि अमिनती सूर्यस्य रश्मिभिः दृशाना चेति[१८] ।

१३ वाजिनीवति उषः येन तोकं च तनयं च धामहे तत् चित्रं अस्मभ्यं आ भर ।

१४ सूनृतावति गोमति अश्ववति विभावरि उषः अद्य इह अस्मे रेवत् वि उच्छ ।

१५ वाजिनीवति उषः, अद्य अरुणान् अश्वान् युक्ष्व हि. अथ विश्वा सौभगानि नः आ वह ।

१६ दस्रा अश्विना, समनसा रथं अस्मत् वर्तिः[१९] गोमत् हिरण्यवत् अर्वाक् नि यच्छतम् ।

हे अश्विनहो, आम्हाकरितां ( पुष्कळ ) सामर्थ्य[१७] इकडे घेऊन या; ह्या ( सर्व ) लोकांकरितां प्रशंसायोग्य[१७] असें ( उज्ज्वल ) तेज द्युलोकांतून आपणच ह्याप्रमाणें इकडे आणलें. १७

सौख्याची प्राप्ति करून देणारे, शत्रूचा नाश करणारे, व सुवर्णमय[१८] मार्गावरून गमन करणारे हे दोघे ( अश्विनी देव ) प्रातःकालाच जागृत होणाऱ्या देवास सोमपानार्थ इकडे घेऊन येवोत. १८ (२७)

## सूक्त ९३.

॥ ९३ ॥ ऋषि–रहूगणपुत्र गोतम । देवता- अग्नि व सोम ॥

हे सामर्थ्यवान् **अग्नि** व **सोम**हो, माझी हाक नीट ऐका, माझ्या सुंदर स्तोत्राचा स्वीकार करा व आपणास हवि अर्पण करणाऱ्या आपल्या उपासकास सौख्य ( अर्पण करणारे ) व्हा. १

हे **अग्नि** व **सोम**हो, जो आज आपणास स्तोत्र ( अर्पण करून ) आळवीत आहे त्यास अशा उत्तम सौख्याची प्राप्ति करून द्या, कीं त्याच्या योगानें त्यास सुंदर अश्व प्राप्त व्हावे व त्याच्या धेनूंच्या समृद्धीत भर पडत जावी. २

हे **अग्नि,** व **सोम**हो, जो ( भक्त ) आपणास आहुति अर्पण करितो अथवा आपणास उद्देशून यज्ञ करितो त्यास उत्तम संतति व शौर्य प्राप्त होवो आणि त्यास पूर्ण आयुष्याचा उपभोग मिळो. ३

---

१७ आ नः, या जनाय श्लोकं ज्योति दिव इत्था आ चक्रथु, युवं न ऊर्जं आ वहत ।

१८ मयोभुवा, दस्रा, हिरण्यवर्तनी, देवा उषर्बुध सोमपीतये इह आ वहतु ।

१ वृषणा अग्नीषोमौ इमं मे हवं सु शृणुत, सूक्तानि हर्यत, दाशुषे मयः भवत ।

२ अग्नीषोमा यः अद्य इदं वचः वां सपर्यति तस्मै गवां पोष स्वश्व्य सुवीर्यं धत्त ।

३ अग्नीषोमा य आहुतिं यः वां हविष्कृतिं दाशात् स प्रजया सुवीर्यं विश्व आयुः वि अश्नवत् ।

हे **अग्नि**, व **सोम**हो, ज्यावेळीं तुम्ही **पणीनें** अगदीं जपून[1] ठेवलेलें धन—म्हणजे धेनु—ह्याचे हरण केलें, ज्यावेळीं तुम्ही **बृसयाच्या** शेष राहिलेल्या (अनुचरांचा) पराभव केला, व ज्यावेळीं अनेकांच्या हिताकरिता तुम्ही एकच (देदिप्यमान) ज्योति घेऊन आला त्यावेळीं तें आपले (सर्वप्रसिद्ध) वीर्य सर्वास विदित झाले. ४

हे **सोमा**, तूं आणि **अग्नि**, हे दोघेही सामर्थ्यवान् असल्यामुळे तुम्ही दोघांनीं ह्या (नक्षत्ररूपी) ज्योतींची द्युलोकांत संस्थापना केली. हे **अग्नि** आणि **सोम**हो, प्रतिबंधांत पडलेल्या (सर्व) नद्यास तुम्हींच अमंगळ निंदेपासून मुक्त केले. ५

तुम्हा दोघांपैकीं एकास **मातरिश्वा** देवानें द्युलोकांतून येथें आणिलें व दुसऱ्यास **श्येन**-पक्षी पर्वतांतून मन्थनक्रियेनें उत्पन्न करून घेऊन आला. हे **अग्नि** व **सोम**हो, स्तुतिस्तोत्राच्या योगानें तुम्हीं प्रमुदित होऊन यज्ञकर्माच्या सिद्धतेसाठीं ह्या जगतास विस्तीर्णता आणली. ६ (२८)

हे **अग्नि** व **सोम**हो, हा (येथें तुमच्याकरितां) हवि सिद्ध[2] आहे, त्याचा आस्वाद[3] घ्या, त्याचा स्वीकार करा, हे पराक्रमी देवानों, तो गोड मानून घ्या. आपण आमचें कल्याण करणारे व आमच्या रक्षणाचा भार घेणारे व्हा. आपणास शरण येणाऱ्या भक्तास जे सौख्य आपण अर्पण करिता तेंच याग करणाऱ्या उपासकासही अर्पण करा. ७

हे **अग्नि** व **सोम**हो, जो उपासक हवि अर्पण करून आपलें पूजन करील अथवा अंतःकरण[4] भक्तियुक्त करून जो आपलें घृतानें अर्चन करील त्याच्या सत्कर्माचें आपण रक्षण करा, व संकटापासून त्यास बचावून न्या. सर्व लोक हे आपली प्रजा असल्यामुळें त्यानाही आपण उत्तम सुख अर्पण करा. ८

---

४ अग्नीषोमा, यत् पणिं अवस[1] गाः अमुष्णीत बृसयस्य शेषः बहुभ्यः एकं ज्योतिः अविन्दत तत् वा वीर्यं चेति ।

५ सोम, अग्नि च सक्रतू युवं एतानि रोचनानि दिवि अधत्तं. अग्नीषोमौ गृभीतान् सिन्धून् अवद्यात् अभिशस्ते. अमुञ्चत ।

६ अन्य मातरिश्वा दिव आ जभार अन्य श्येन. अद्रे. परि अमथ्नात् अग्नीषोमा ब्रह्मणा वावृधाना यज्ञाय लोकं उरु चक्रथु ।

७ अग्नीषोमा, प्रस्थितस्य[2] हविष. वीत[3] हर्यत, वृषणा, जुषेथां सुशर्माणा स्ववसा भूत हि अथ योः शं यजमानाय धत्त ।

८ अग्नीषोमा, य. हविषा सपर्यात्, यः देवद्रीचा[4] मनसा घृतेन तस्य व्रतं रक्षतं, अहसः पात, जनाय विशेमहि शर्म यच्छतं ।

हे **अग्नि** व **सोमहो**, आपणांस सर्व गोष्टी सारख्याच विदित होत असल्यामुळें व ( आम्ही ) आपणा दोघास एकदमच हाक[५] मारीत असल्यामुळें, आमच्या स्तोत्रावर आपण प्रेम ठेवा. देवसमुदायांत आपण एकदम प्रकट झाला. ९

हे **अग्नि** व **सोमहो**, जो घृताचे योगानें आपणांस ( हवि ) अर्पण करितो त्याचेकरितां उत्तम संपत्ति धारण करून आपण सुप्रकाशित व्हा. १०

हे **अग्नि** व **सोमहो**, ह्या हवींचा आपण आवडीनें स्वीकार करा व दोघे[१] मिळून आम्हां-कडे या. ११

हे **अग्नि** व **सोमहो**, आमच्या अश्वांच्या पोषणाची उत्तम तजवीज करा. ज्यांच्या ( दुग्धा )-मुळें आम्हांस हवि[७] तयार करितां येतात त्या आमच्या गाईही वृद्धि पावोत. आम्ही आपणास आहुति[८] अर्पण करीत असल्यामुळें आमचे अंगी अनेक प्रकारचें सामर्थ्य आणा व आमच्या यज्ञाची कीर्ति दूरवर जाईल असें करा. १२ (२९) (१४)

## अनुवाक १६.

### सूक्त ९४.

॥ ९४ ॥ ऋषि-कुत्स आंगिरस । देवता-अग्नि ।

( सन्मानास ) योग्य व सर्वज्ञ अशा ( अग्निदेवास ) आपण, एखाद्यास जसा रथ आणून द्यावा, त्याप्रमाणें हें स्तोत्र अंतःकरणपूर्वक अर्पण केलें पाहिजे. खरोखर ह्याची कृपाशील बुद्धि सर्व लोकांत आमच्या सभेमधें फार अनुकूल आहे. हे **अग्नि**–देवा, तुझें सख्य आम्हीं जोडलें असल्यामुळें आमचा नाश होऊं देऊं नको. १

---

९ अग्नीषोमा सवेदसा । सहूती गिरः वनतं, देवत्रा सं बभूवथुः ।

१० अग्नीषोमा, यः वां अनेन घृतेन दाशति तस्मै बृहत् दीदयतं ।

११ अग्नीषोमा, इमानि नः हव्या युवं जुजोषतं सचा नः उप यातं ।

१२ अग्नीषोमा, नः अर्वतः पिपृतं, हव्यसूदः उस्रियाः आ प्यायन्ताम् मघवत्सु अस्मे बलानि धत्तं, नः अध्वरं श्रुष्टिमन्तं कृणुतं ।

१ अर्हते जातवेदसे इमं स्तोमं रथं इव मनीषया सं महेम अस्य प्रमतिः हि संसदि नः भद्रा अग्ने, तव सख्ये वयं मा रिषाम ।

ज्याचेकरितां तूं यज्ञ संपादन करितोस त्याचे हेतु सिद्ध होतात. त्याचेजवळ अश्व नसले तरी ( पराभव न पावता ) त्यास राहता येते. उत्तम प्रकारचे शौर्य तो संपादन करून घेतो. अभिवृद्धिही[1] त्यास प्राप्त झालीच ( असे समजावे ) त्याला कसलीही अडचण[2] येत नाही हे अग्नि–देवा, तुझे सख्य आम्ही जोडलेले असल्यामुळे आमचा नाश होऊं देऊ नको. २

तुला प्रज्वलित करण्याचे सामर्थ्य आम्हास ( खचित ) प्राप्त होईल. तू आमच्या प्रार्थना सफळ कर. तुझे ठिकाणी अर्पण केलेल्या हवींचच ( सर्व ) देव सेवन करितात. तूं आदित्यांना ( इकडे ) घेऊन ये. त्यांच्याविषयी आम्हास फार प्रेम आहे. हे अग्नि–देवा, तुझे सख्य आम्ही जोडलेले असल्यामुळें आमचा नाश होऊं देऊ नको. ३

तुला आम्ही इन्धन अर्पण करून व पर्वणीपर्वणीला तुला प्रदीप्त करीत तुला हवि देत जाऊं. आमचे आयुष्य वृद्धि[3] पावावे म्हणून तू आमच्या प्रार्थना उत्तम रीतीने सफल कर. हे अग्नि–देवा, तुझे सख्य आम्ही जोडलेले असल्यामुळे आमचा नाश होऊ देऊ नको. ४

हा सर्व लोकांचा संरक्षक आहे. ह्याच्याच मुळे द्विपाद व चतुष्पाद असे सर्व प्राणी, रात्रीं संचार करण्यास समर्थ होतात. तू उषेचा अत्यंत तेजस्वी ज्ञापक परंतु श्रेष्ठ असा ( कीर्ति ) ध्वज[4] आहेस. हे अग्निदेवा, तुझे सख्य आम्ही जोडलेले असल्यामुळे आमचा नाश होऊं देऊ नको. ५ (३०)

तूं अध्वर्यु आहेस, ( हवि अर्पण करणारा ) तू पुरातनकालीन होता आहेस. तूं (यज्ञामध्ये) आपलें अनुशासन चालविणारा व यज्ञास पवित्रता आणणारा आहेस. जन्मतःच तू ( यज्ञाचा ) अग्रणी आहेस. तूं प्रज्ञावान् असल्यामुळें, हे सुज्ञवर ( अग्निदेवा, ) ऋत्विजांची सर्व कार्ये तू ( सहजच ) सभाळून नेतोस. हे अग्निदेवा, तुझे सख्य आम्ही जोडलेले असल्यामुळे आमचा नाश होऊं देऊ नको. ६

---

२ यस्मै त्व आ यजसे स साधति, अनर्वा क्षेति, सुवीर्य दधते. स तूताव[1]. एन अंहति[2] न अश्नोति अग्ने, तव सख्ये वय मा रिषाम ।

३ त्वा समिध शकेम, धिय साधय, त्वे आहुत देवा अदन्ति हवि आदित्यान आ वह, तान हि उश्मसि ।

४ इध्म भराम पर्वणापर्वणा चितयन्त वय ते हवींषि कृणवाम जीवातवे धिय प्रतर साधय ।

५ विशा गोपाः, यत् द्विपत् उत च चतुष्पत् जन्तव अक्तुभि अस्य चरन्ति उषस महान् चित्र प्रकेत[4] असि ।

६ त्व अध्वर्युः उत पूर्व्य होता प्रशास्ता, जनुषा पोता, पुरोहित असि धीर विद्वान् विश्वा आर्त्विज्या पुष्यसि ।

हे अग्निदेवा, तूं सर्व प्रकारें सारखा देखणा आहेस. दूर असतांनासुद्धा तूं जवळ[7] असल्याप्रमाणेंच अति प्रखर तेजानें तळपत असतोस. रात्रीच्या अंधकारांतूनसुद्धा[9] हे देवा, तूं अवलोकन करण्यास समर्थ होतोस. आम्ही तुझें सख्य जोडलेलें असल्यामुळें तू आमचा नाश होऊ देऊ नको. ७

हे देवहो, सोमरस सिद्ध करणाऱ्या उपासकाचा रथ सर्वांच्यापुढें असो, आणि आमची स्तुती दुष्ट[8] हृदयाच्या माणसाना ओलांडून पुढें जावो. ती आमची प्रार्थना ( नीट ) समजून घ्या व तिला वृद्धिंगत करा. हे अग्निदेवा तुझें सख्य आम्हीं जोडलेलें असल्यामुळें आमचा नाश होऊं देऊं नको. ८

आपल्या घातक शस्त्रांनीं दुष्ट हृदयाच्या[9] मनुष्यास व त्याचप्रमाणे जे कोणी दुरात्मे तुझ्या समीप अथवा तुझ्यापासून दूर असतील त्यासही मारून टाक. तुझी स्तोत्रें गाणाऱ्या भक्ताकरिता यज्ञाचा मार्ग सुगम कर. हे अग्निदेवा, तुझें सख्य आम्हीं जोडलेलें असल्यामुळें आमचा नाश होऊं देऊं नको. ९

ज्यावेळी देदिप्यमान कान्तीनें युक्त व जणुं काय काहीं वाऱ्यानें प्रेरणा केल्याप्रमाणें धावणारे असे रक्तवर्ण अश्व तू जोडलेले असतात त्यावेळीं एखाद्या वृषभाप्रमाणें तुझी गर्जना होते, व धूम्ररूपी निशाण फडकविणाऱ्या आपल्या ज्वाळांनी तू वृक्षाना व्यापून[10] टाकतोस. हे अग्निदेवा, तुझें सख्य आम्हीं जोडलेलें असल्यामुळें आमचा नाश होऊ देऊ नको. १० (३१)

ज्या तुझ्या ठिणग्या तृणाचा संहार करीत चोहोंकडे पसरतात[11] त्यावेळीं तुझी गर्जना ऐकून पक्षीसुद्धा भयभीत होतात. तुझ्या रथाचा मार्गही त्यावेळी सुलभ होतो. हे अग्निदेवा तुझें सख्य आम्ही जोडलेले असल्यामुळे आमचा नाश होऊं देऊं नको. ११

---

७ य विश्वत सदृङ सुप्रतीकः असि दूरे चित् सन् तळित्[7] इव अति रोचसे. देव, रात्र्या अन्धः[9] चित् अति पश्यसि ।

८ देवा . सुन्वत रथ पूर्व भवतु अस्माक शंस. दूढय[8] अभि अस्तु. तत वच. आ जानीत उत पुष्यत ।

९ दु शसान,[9] दूढय , ये केचित् अत्रिण दूरे वा अन्ति, वधैः अप जहि अथ गृणते यज्ञाय सुग कृधि ।

१० यत् अरुषा वातजूता रोहिता रथे अयुक्था ते रवे वृषभस्य इव. धूमकेतुना वनिन इन्वसि[10] आत ।

११ यत् यवसादः ते द्रप्सा.[11] वि अस्थिरन् अध स्वनात् पतत्रिण उत बिभ्युः तत् तावकेभ्यः रथेभ्यः ते सुग ।

**मित्र** व **वरुण** ह्यांच्या संतोषार्थ[12] खालीं आगमन करणाऱ्या **मरुतांचा** हा क्रोध[13] खरोखर आश्चर्य उत्पन्न करणारा आहे. हे अग्निदेवा आम्हास सौख्य अर्पण कर. त्या ( मरुतांचे ) मन पुन्हा ( आम्हाकडे ) आकर्षित होवो. तुझें सख्य आम्ही जोडलेले असल्यामुळें आमचा नाश होऊं देऊं नको. १२

तूं ( सर्व ) देवांत ( श्रेष्ठ ) देव आहेस, तूं अद्भुत मित्र आहेस; तू ( सर्व ) **वसूंत** ( श्रेष्ठ ) **वसु** आहेस; सर्व यज्ञात तूं शोभणारा आहेस. तुझ्या सर्वविस्तृत अशा मगल आश्रयाखालीं आम्ही राहूं. हे अग्निदेवा तुझें सख्य आम्ही जोडलेलें असल्यामुळे आमचा नाश होऊं देऊं नको. १३

हेंच तुझें मांगल्यकारक कृत्य कीं तुझ्या सदनात तुला सोमाचा हवि दिला असता तूं प्रदीप्त होऊन ( भक्तास ) अत्यंत सौख्य प्राप्त करून देण्याकरिता ( मधुर ) शब्द बोलतोस[16] व आपल्या अर्चकास उत्तम उत्तम वस्तु व धन अर्पण करतोस. हे अग्निदेवा आम्ही तुझें सख्य जोडलेलें असल्यामुळे आमचा नाश होऊं देऊं नको. १४

हे वैभवसंपन्न व अखंड ( सामर्थ्य ) युक्त देवा,[17] सर्व तऱ्हेनें[18] निष्पापपणा ( राखण्याविषयीं ) तूं ज्यास ( सामर्थ्य ) देतोस व ज्यास सौख्य व बल अर्पण करून तूं भरभराटीस पोचवितोस ( तसे ) आम्हीही होऊन, उत्तम सतति प्राप्त करून देणाऱ्या तुझ्या कृपाछत्राखालीं ( आनंदाने ) राहू. १५

हे अग्निदेवा, खरें कल्याण कशात आहे ह्याचें तुला ज्ञान असल्यामुळे ह्या जगात तूं आमचे आयुष्य वृद्धिंगत कर. ह्या ( आमच्या ) विनतीस **मित्र** व **वरुण** हे व त्याचप्रमाणे **अदिति, सिन्धु, पृथिवी,** व **द्युलोक** हेही संमति[17] देवोत. १६ (३२) (६)

---

**१२ मित्रस्य वरुणस्य धायसे" अवयातां मरुतां अय हेळः"** अद्भुत मृळ, एषां मन. न सु भूतु ।

**१३ देवानां देवः, अद्भुत.** मित्रः असि. **वसूनां वसु ,** अध्वरे चारु. असि. तव **सप्रथस्तमे** शमन् स्याम ।

**१४ तत् ते भद्रं, यत् स्वे दमे सोमाहुतः समिद्धः मृळयत्तमः जरसे,"** दाशुषे रत्न द्रविण च दधासि ।

**१५ सुद्रविणः अदिते" यस्मै त्वं सर्वताता" अनागास्त्व** ददाश , य भद्रेण शवसा चोदयासि, प्रजावता **ते राधसा स्याम ।**

**१६ देव अग्ने, सौभगत्वस्य विद्वान् त्व इह अस्माकं आयुः** प्रतिर. मित्र वरुणः अदिति सिन्धु पृथिवी **उत द्यौः नः तत् ममहन्तां"** ।

# अध्याय ७.

## सूक्त ९५.

॥ ९५ ॥ ऋषि-आङ्गिरस कुत्स । देवता-अग्नि ॥

रूपांत अगदींच भिन्न अशा ह्या दोघी ( युवती ) आपआपल्या सुंदर मार्गांनी गमन करीत असतात. ( दोघींपैकी ) प्रत्येक, एक एक बालकाला पाजीत असते. एकीजवळ पीतवर्ण बालक पुष्ट[1] होत असते व दुसरीजवळ शुभ्रवर्ण बालक झपाट्याने वाढत असलेले आढळले आहे. १

त्वष्टा देवाच्या निरलस अशा दहा युवतींनी ह्या खेळकर[2] बाळास जन्म दिला. जेव्हा ह्याची प्रखर कान्ति दृष्टीस पडून ह्याची ख्याति ( सर्व ) लोकात पसरली तेव्हा ह्या देदीप्यमान बालकास इकडे तिकडे ( सर्वत्र ) घेऊन जाऊ लागले. २

समुद्रातील एक, द्युलोकातील एक व ( अन्तरिक्षातील ) जलात (एक) अशा रीतीने ह्याच्या तिन्ही जन्माचे[3] ( कविजन ) सुंदर वर्णन करितात. पूर्व दिशेपासून पृथिवीच्या भागातील सर्व दिशांचे नियमन करून व त्याचप्रमाणे ऋतूवर आपला अधिकार चालवून ह्याने त्याच्या त्याच्या क्रमाप्रमाणे[4] त्याची संस्थापना केली आहे. ३

अन्तर्हित[5] असताना हा तुम्हांपैकी कोणास ओळखू येतो[6] ह्या बालकाने आपल्या स्वतःच्या सामर्थ्याने आपल्या मातासही जन्म दिला. अनेक वस्तूंना गर्भरूप, श्रेष्ठ, प्रज्ञावान् व सामर्थ्यशाली[8] असा हा अग्नि आपल्या ( अद्भुत ) पराक्रमाच्या[9] जोरावर[10] ( बाहेर निघून ) सर्वत्र सञ्चार करीत आहे. ४

---

१ विरूपे द्वे स्वर्थे चरत । अन्याअन्या वत्स उप धापयेते । अन्यस्यां हरि: स्वधावान्[1] भवति, अन्यस्यां शुक्रः सुवर्चा: ददृशे ।

२ त्वष्टुः अतन्द्रास: दश युवतयः इमं विभृत्र[2] गर्भ जनयन्त । तिग्मानीकं जनेषु स्वयशसं विरोचमानं सीं परि नयन्ति ।

३ समुद्रे एकं, दिवि एकं, अप्सु (एकं), अस्य त्रीणि जाना[3] परि भूषन्ति । पूर्वां अनु पार्थिवानां प्रदिशं ऋतून् प्रशासन् अनुष्ठु[4] वि दधौ ।

४ निण्य[5] इमं वः कः आ चिकेत[6] वत्सः स्वधाभिः[7] मातॄः जनयत । बह्वीनां गर्भः, महान्, कविः, स्वधावान् अपसः[8] उपस्थात्[9] नि चरति ।

हा सुंदर ( **अग्नि** ) ( जलां ) मध्ये राहून सर्वांच्या दृष्टीस[9] पडेल अशा रीतीनें वृद्धिंगत होतो. हा स्वतःच्या कीर्तीनें मंडित होऊन, तीं जलें वक्र गतीनें वहात असताही त्यांच्यामध्ये सरळ उभा राहतो. ह्याचा जन्म होत असता, **त्वष्टा** देवानें निर्माण केलेल्या ( द्युलोक व पृथिवी ह्या ) दोघीस त्याची भीति वाटली, परंतु पुन्हा परत वळून त्यांनी ह्या सिंहाचा आश्रय केला. ५ (१)

त्या उभयता कल्याणप्रद ( द्यावापृथिवींनी ), दोघी स्त्रियांप्रमाणें, ह्याचे परिपालन केले. वत्सासाठी हंबरणाऱ्या गाईंप्रमाणें त्या धावत धावत ह्याचेजवळ आल्या. ज्यास दक्षिणबाजूनें ( सर्व उपासक लोक ) हवि अर्पण करून भूषवीत असतात असा तो ( अग्नि ) सर्व सामर्थ्यवान् पुरुषांत सामर्थ्यवान् ठरला. ६

**सवित्या**प्रमाणें हा आपले बाहु उभारतो व वृष्टिकारक अशा त्या दोघी ( द्यावापृथिवीस ) अलंकृत करीत हा सत्कृत्यांत जोमानें गढून जातो. सर्वांपासून हा त्यांचीं उज्ज्वल प्रावरणें[10] हिसकावून घेतो. स्वतःच्या जननींपासून सुद्धा हा त्यांचीं नूतन वसनें काढून घेतो. ७

हा स्वसदनांत धेनू व उदक ह्यांच्याशीं जेव्हा संपर्क ठेवतो तेव्हा ह्यास अति उज्ज्वल रूप धारण करितां येतें. मूर्तिमन्त बुद्धिच असा हा प्रज्ञावान अग्नि ( स्वर्लोकाच्या ) मूळ स्तंभास निर्मलत्व आणतो, व म्हणून हीच ( त्याची कृति ) त्याची सकल देवांबरोबर भेट होण्यास कारणीभूत होते. ८

श्रेष्ठ असा जो तू त्या तुझें वसतिस्थान ( स्वर्लोकाच्या ) मूळ प्रदेशावर आहे व त्यास तुझें विस्तृत व देदीप्यमान तेज[11] व्याप्त करून टाकीत आहे. हे **अग्नि–देवा**, सर्वविख्यात अशा आपल्या ( सकल ज्वालांचे योगानें ) प्रदीप्त हो व कधीही कुंठित न होणाऱ्या अशा आपल्या भक्तसंरक्षक सामर्थ्यांनीं[12] आमचें रक्षण कर. ९

---

५ चारुः आविःऽत्यः आसु वर्धते । स्वऽयशाः जिह्मानां उपऽस्थे ऊर्ध्वः । त्वष्टुः उभे जायमानात् बिभ्यतुः, प्रतीची सिंहं प्रति जोषयेते ।

६ भद्रे उभे मेने न जोषयेते । वाश्राः गावः न एवैः उप तस्थुः । यं दक्षिणतः हविःऽभिः अञ्जति सः दक्षाणां दक्षऽपतिः बभूव ।

७ सविता इव बाहू उत् यमीति । सिचौ उभे सुक्रतुः भीमः ऋञ्जते । निः अस्मात् शुक्रं अत्कं[10] उत् अजते । मातृभ्यः नवा वसना जहाति ।

८ यत् सदने गोभिः अद्भिः समृञ्जानः उत्तरं त्वेषं रूपं कृणुते । धीः कविः बुध्नं परि मर्मृज्यते । सा देवताता सम्ऽइतिः बभूव ।

९ ते उरु विरोचमानं ज्रयः[11] महिषस्य धाम बुध्नं परि एति । अग्ने स्वयशोभिः विश्वेभिः इद्धः अदब्धेभिः पायुभिः[12] अस्मान् पाहि ।

सर्व मानवांचा संरक्षणकर्ता, द्युलोक आणि भूलोक ह्यांचा उत्पादक, स्वर्गाची प्राप्ति करून देणारा व असल्य[4] वैभवें जवळ बाळगणारा असा जो हा मातरिश्वा त्याने आपल्या अपत्या-करिता ( उत्तम नीति ) मार्ग शोधून काढला व ( म्हणूनच ) ह्या वैभवदायक अग्नीचा ( सर्व ) देवांनीं आश्रय केला आहे. ४

नेहमीं आपली अंगकान्ति बदलणाऱ्या[5] अशा **रात्र** व **उषा** एकत्र जमून[6] ह्या एकाच बालकास दुग्धपान करवितात. सुवर्णाप्रमाणे शोभणारा हा देव द्युलोक व भूलोक ह्या दोन्ही लोकांत आपली प्रभा पसरवितो. ह्या वैभवदायक अग्नीचा ( सर्व ) देवांनीं आश्रय केला आहे. ५ (३)

हा संपत्तींचें मूळ भांडार, धनाची प्राप्ति करून देणारा, यज्ञाची ध्वजा व याजकाचें[7] इच्छित[8] पुरविणारा आहे. आपलें अमरत्व कायम राहण्याकरितां प्रयत्न करणाऱ्या देवांनीं ह्या वैभवदायक अग्नीचा आश्रय केला. ६

जो आतां[9] व पूर्वींही वैभवाचें मंदिरच होता, आजपर्यंत जन्म पावलेल्या व जन्मास येत असलेल्या सर्व जीवांचें जो ( आनंद ) स्थान[10] आहे, व जे अनेक जीव आतां अस्तित्वांत आहेत अथवा पुढें अस्तित्वांत येणार आहेत त्यांचा जो संरक्षणकर्ता आहे त्या वैभवदायक अग्नीचा ( सर्व ) देवांनीं आश्रय केला आहे. ७

ह्या वैभवदायक देवानें, सत्वर[11] वृद्धि पावणारी संपत्ति, आम्हांस दिली आहे; त्यानें वीर पुरुषांनीं युक्त अशी संपत्ति आम्हांस दिली आहे; त्यानें वीर्यशाली संततीसह आमच्या पोषणास अगदीं पुरेसें होईल इतकें द्रव्य आम्हांस दिलें आहे: हा वैभवदायक देव आम्हांस दीर्घ आयुष्यही देत आहे. ८

---

४ विशां गोपाः रोदस्योः जनिता स्वर्विन् पुरुवारपुष्टिः॰ स. मातरिश्वा तनयाय गातुं विदत् ।

५ वर्ण आमेम्याने॰ नक्तोषसा समीची॰ एकं शिशुं धापयेते । रुक्मः द्यावाक्षामा अन्तः वि भाति ।

६ रायः बुध्नः वसूनां संगमनः यज्ञस्य केतुः वेः॰ मन्मसाधनः॰ । अमृतत्वं रक्षमाणासः देवाः एनं द्रविणोदां अग्निं धारयन् ।

७ नु॰ च पुरा च रयीणां सदनं, जातस्य च जायमानस्य च क्षाः॰ भूरेः सतः च भवतः च गोपां द्रविणोदां अग्निं देवाः धारयन् ।

८ द्रविणोदाः तुरस्य॰ सनरस्य द्रविणसः प्र यंसत् । द्रविणोदाः नः वीरवतीं इषं । द्रविणोदाः दीर्घं आयुः रासते ।

हे अग्निदेवा, आम्हीं अर्पण केलेल्या इन्धनामुळें अशा रीतीने वृद्धिंगत होऊन, हे सर्वांस पावन करणा‍ऱ्या देवा, तू आपला प्रकाश सर्वत्र पाड व आम्हास धन देऊन (उत्तम) कीर्ति मिळव. ह्या आमच्या विनंतीस मित्र व वरुण व त्याचप्रमाणे अदिति, सिन्धु, पृथिवी व लोक ह्यांचेही अनुमोदन असो. ९(४)

## सूक्त. ९७

॥ ९७ ॥ ऋषि–अङ्गिरस कुत्स । देवता–सोम ॥

हा (अग्नि) प्रज्वलित होऊन आमचे पाप नाहींसे करो–हे अग्निदेवा, आमचेवर संपत्तीचा प्रकाश पाड–(खरोखर) हा (अग्नि) प्रज्वलित होऊन आमचे पाप नाहींसे करो. १

सुस्थळी[1] राहणा‍ऱ्या व सुमार्गानी[2] मिळणा‍ऱ्या संपत्तीची इच्छा धरून आम्ही (ह्याचे) यजन करीत आहो. हा (अग्नि) प्रज्वलित होऊन आमचे पाप नाहींसे करो. २

ह्या (सर्वांत) ज्या अर्थी हाच (तुझा भक्त) तुझे अतिशय स्तवन[3] करीत आहे व त्याचप्रमाणे आमच्या कुलांतील इतर विद्वान् लोकही (तुझ्या स्तुतीत अत्यंत निमग्न आहेत), त्या अर्थी हा (अग्नि) प्रज्वलित होऊन आमचे पाप नाहींसे करो. ३

हे अग्निदेवा, ज्या अर्थी आम्हीं तुझे उपासक होऊन जन्मलो आहो–ज्या अर्थी आम्ही तुझे आहोत–त्या अर्थी हा (अग्नि) प्रज्वलित होऊन आमचे पाप नाहींसे करो. ४

ज्या अर्थी प्रबळ अग्नीचे रश्मि सर्वत्र प्रसरले आहेत त्या अर्थी हा (अग्नि) प्रज्वलित होऊन आमचे पाप नाहींसे करो. ५

---

९ पावक अग्ने, एव नः समिधा वृधानः श्रवसे रेवत् वि भाहि। मित्र, वरुण, अदिति, सिन्धु, पृथिवी उत द्यौः तत् नः ममहन्ताम्।

१ नः अघ अप शोशुचत्। अग्ने, रयिं आ शुशुग्धि। नः अघं अप शोशुचत्।

२ सुक्षेत्रिया[1] सुगातुया[2] च वसुया यजामहे.

३ यत् एषां प्र भन्दिष्ठः, अस्माकासः सूरयः च, नः अघ अप शोशुचत्।

४ अग्ने, यत् वयं ते सूरयः प्र जायेमहि, नः अघ अप शोशुचत्।

५ यत् सहस्वतः अग्नेः भानवः विश्वतः प्र यन्ति, नः अघ अप शोशुचत्।

सर्व मानवांविषयीं स्नेह बुद्धी बाळगणाऱ्या हे (**अग्निदेवा**), ते तुझे सख्य (निरन्तर) तुझे जवळ असो. विपुल[३] संपत्ति आमचेकडे येऊन प्राप्त होवो. ह्या आमच्या प्रार्थनेस **मित्र** व **वरुण** आणि त्याचप्रमाणे **अदिति, सिंधु, पृथिवी,** व **द्युलोक** ह्यांचेही अनुमोदन असो. ३(६)

## सूक्त ९९.

॥ ९९ ॥ऋषि–मरीचिपुत्र, काश्यपऋषि । अग्निर्देवता ॥

(चला), त्या सर्वज्ञ (**अग्नी**)च्या सन्मानार्थ आपण सोमरस काढून ठेवूं या. (आमच्या-विषयीं) शत्रुत्व आचरणाऱ्या मनुष्यांचे धन हा दग्ध करून टाकतो. जहाजांत बसवून समुद्राच्या पार नेल्याप्रमाणें हा **अग्नि** सर्व संकटें व दुरितें यांतून आम्हास निभावून नेवो. १(७)

## सूक्त १००.

॥ १०० ॥ ऋषी–ऋज्राश्व, अंबरीष, सहदेव, भयमान, सुराधा । देवता इन्द्र ॥

तो बलवान् **इन्द्र**–कीं जो दुसऱ्या (अनेक) वीर्यशाली देवतांसहवर्तमान वास करितो, जो ह्या विस्तीर्ण द्युलोकाचा व पृथ्वीचा अधिपती आहे, ज्याच्या बलाचें अस्तित्व[१] खरोखर अनुभवास येण्याजोगें आहे व सोमरस सिद्ध झाल्याबरोबर जो हवींनीं संतुष्ट करण्यास सर्वथैव योग्य आहे–तो **इन्द्र, मरुतां**सहवर्तमान, आमचें संरक्षण करण्याची इच्छा धारण करून (येथें) येवो. १

तो **इन्द्र,**—कीं ज्याचा मार्ग[१] सूर्याच्या मार्गाप्रमाणें अप्रतिहत[२] आहे, जेव्हां जेव्हां सोमरस सिद्ध होतो तेव्हां तेव्हां ज्या वृत्रघातक इन्द्राची पराक्रमाकडे प्रवृत्ति होते, व स्वमित्रांचें साहाय्य असल्यामुळें जो अत्यन्त सामर्थ्यवान् झालेला आहे—तो **इन्द्र, मरुतां**सहवर्तमान, आमचें संरक्षण करण्याची इच्छा धारण करून आपली वाट[४] चालत (येथें) प्राप्त होवो. २

---

३ वैश्वानर, तव तत् सत्यं अस्तु । मघवानः[३] रायः अस्मान् । सचन्तां मित्र, वरुण, अदिति, सिन्धु, पृथिवी उत द्यौ न तत् ममहन्तां ।

१ जातवेदसे सोमं सुनवाम । अरातीयतः वेदः नि दहाति । सः अग्निः नावा इव सिन्धुं विश्वा दुर्गाणि दुरिता नः अति पर्षत् ।

१ यः वृषा वृष्ण्येभिः समोकाः, महः दिवः पृथिव्याः च सम्राट्, सतीनसत्वा, भरेषु हव्य, सः मरुत्वान् इन्द्रः नः ऊती भवतु ।

२ सूर्यस्य इव यस्य याम[१] अनाप्त,[२] भरेभरे वृत्रहा शुष्मः अस्ति, सखिभिः वृषतमः मरुत्वान् इन्द्रः ह्वेभिः एवैः[४] नः ऊती भवतु ।

सामर्थ्यामुळें अप्रतिहत झालेले **ज्याचे मार्ग,** द्युलोकांतील उदकाचें **जणूं कांहीं दोहनच** करीत, पुढें सुरू असतात, जो आपल्या **शत्रूंतून सहज** निभावून निघून जातो व जो आपल्या पराक्रमामुळे ( सर्वत्र ) विजयी झालेला **आहे—तो इन्द्र, मरुतां**सहवर्तमान, **आमचे संरक्षण** करण्याची इच्छा धारण करून ( येथें ) प्राप्त होवो. ३

आपल्या मित्राशीं मित्र होऊन वागणारा व **पराक्रमी** पुरुषांत पराक्रमी म्हणून गाजणारा जो **इन्द्र,** तो सर्व अंगिरसांतील श्रेष्ठ अंगिरस झाला. **स्तवनार्ह**[५] देवतांत जो ( अत्यंत ) स्तवनार्ह ठरला आहे व स्तवनाच्या योगानें ज्याचें माहात्म्य प्रस्थापित झालें **आहे** असा तो **इन्द्र, मरुतां**सहवर्तमान, आमचें संरक्षण करण्याची इच्छा धारण करून ( येथें ) प्राप्त होवो. ४

युद्धांत[६] आपल्या द्वेष्ट्यास जिंकणारा[७] हा इंद्र, जणूं कांहीं पुत्राच्याच साहाय्याप्रमाणें **रुद्रांचें** साहाय्य मिळाल्यामुळें ( अतिशय ) श्रेष्ठतेस[८] चढला. आपल्या बरोबरच निवास करणारे जे देव त्यांच्यासह कीर्तिप्रद पराक्रम करीत[९] हा इन्द्र, **मरुतांसहवर्तमान, आमचे** संरक्षण करण्याची इच्छा धारण करून, ( येथें ) प्राप्त होवो. ५ (८)

शत्रूंच्या क्रोधाची धुंदी[१०] उतरविणाऱ्या व (अनेक) युद्धे[११] **करणाऱ्या ह्या (इंद्रानें)** आमच्या शूर पुरुषांचें साहाय्य घेऊन **सूर्याचा** शोध लावला. ज्यास **अनेक** ( भक्तजन नेहमीं ) बोलावीत असतात व जो सज्जनाचा प्रतिपालक आहे असा तो इंद्र आज, **मरुतां**सहवर्तमान, आमचें संरक्षण करण्याची इच्छा धारण करून ( येथें ) येवो. ६

शूर लोक जेथें धनप्राप्त्यर्थ युद्ध करीत असतात अशा प्रसंगीं त्यास त्याच्या स्वतःच्या सामर्थ्यानेंच उत्साह[१२] उत्पन्न केला. (सर्व) मनुष्यांनीं ह्यासच आपल्या कल्याणाचा जबाबदार[१३] केलें आहे. ( ह्या जगांतील ) अखिल सत्कृत्याचा[१४] हाच एकटा अधिपति आहे. ( ह्यास्तव ) हा **इंद्र, मरुतां**सहवर्तमान, आमचें संरक्षण करण्याची इच्छा धारण **करून** ( येथें ) येवो. ७

---

३ शवसा अपरीताः यस्य पथासः दिवः न रेतसः दुघानाः यन्ति, तरद्द्वेषाः, पौंस्येभिः ससहिः मरुत्वान् इन्द्रः नः ऊती भवतु ।

४ सखिभिः सखा सन् वृषभिः वृषा सः अंगिरोभिः अंगिरस्तमः भूत् । ऋग्मिभिः[५] ऋग्मी, गातुभिः ज्येष्ठः मरुत्वान् इन्द्रः नः ऊती भवतु ।

५ नृषह्ये आमित्रान् ससह्वान्[६] सः सूनुभिः न रुद्रेभिः ऋभ्वा[८] । सनीळेभिः श्रवस्यानि तूर्वन्[९] मरुत्वान् इन्द्रः नः ऊती भवतु ।

६ मन्युमीः[१०] समदनस्य[११] कर्ता सः अस्माकेभिः नृभिः सूर्यं सनत् । पुरुहूतः सत्पतिः मरुत्वान् इन्द्रः अस्मिन् अहन् नः ऊती भवतु ।

७ तं स्मातौ तं ऊतयः रणयन्[१२] । क्षितयः तं क्षेमस्य त्रां[१३] कृण्वत । विश्वस्य करणस्य[१४] सः एकः ईशे । मरुत्वान् इन्द्रः नः ऊती भवतु ।

आनंदोत्सवाचे समर्थी त्यास ( नवीन ) स्फुरण चढत असे व स्वसंरक्षण व धनप्राप्ति ह्याची इच्छा धरून शूर पुरुष ह्या पराक्रमी देवाचा आश्रय करीत असत. अत्यंत निबिड असा अन्धकार पडला असताही त्यातून ह्याने तेजाची प्राप्ति करून घेतली. ( ह्यास्तव ) हा **इन्द्र मरुतांस**हवर्तमान आमचे सरक्षण करण्याची इच्छा धारण करून येथे येवो. ८

आपल्या डाव्या ( हाताने ) हा बलिष्ठांचेही[14] नियमन करितो आणि (हरण) केलेले धन तो उजव्या हातात धारण करितो. ( स्तवन ) करणाऱ्या उपासकाने ( निर्बल असता )ही हा धनाची प्राप्ति करून घेतो. असा हा **इन्द्र, मरुतांस**हवर्तमान, आमचे सरक्षण करण्याची इच्छा धारण करून येथे येवो. ९

सैनिकांच्या समुदायाच्या व रथांच्या योगाने हा धन जिंकून आणतो. सर्व मानवांस तो आज विदित झाला आहे. आपली स्तुति न करणाऱ्या ( दुष्टाचा[15] ) तो आपल्या सामर्थ्याने पराभव करतो. असा हा **इन्द्र, मरुतांस**हवर्तमान, आमचे सरक्षण करण्याची इच्छा धारण करून ( येथे ) येवो. १० (९.)

अनेक ( भक्तांनी ) ज्यास पाचारण केले आहे असा हा **इन्द्र,** आपले आप्त अथवा अनाप्त ह्यांनी ( बोलाविल्यावरून ) जेव्हां युद्धाकडे[17] ( शीघ्र ) गतीने गमन करितो तेव्हा, उदक, पुत्र, व पौत्र ह्यांची आम्हास प्राप्ति करून देण्याकरिता तो **मरुतां**सहवर्तमान, आमचे सरक्षण करण्याची इच्छा धारण करून, ( येथे ) येवो. ११

हा वज्र धारण करणारा आहे, हा शत्रूचा नाश करणारा आहे, हा भीतिप्रद, उग्र, सहस्र प्रज्ञानी युक्त, शतावधि सैनिकांचा नायक व सामर्थ्यवान् आहे. उत्साहीपणात हा सोमरसासारखा[18] आहे व पांचही[19] मानवसमाजाचा हा संरक्षणकर्ता आहे. हा **इन्द्र, मरुतां**सहवर्तमान, आमचे सरक्षण करण्याची इच्छा धारण करून ( येथे ) येवो. १२

---

८ उत्सवेषु शवसः त अप्सन्त । अवसे धनाय नर तं नर । अन्धे चित् तमसि सः ज्योतिः विदत् ।

९ स. सव्येन यमति व्राधत.[14] चित् यमति । स. दक्षिणे कृतानि सगृभीता । कीरिणा चित् सः धनानि सनिता ।

१० सः ग्रामेभिः सनिता । सः रथेभिः । विश्वाभिः कृष्टिभिः अद्य विदे नु । स पौंस्येभि. अभिभूः अशस्तीः.[15] ।

११ पुरुहूतः स जामिभिः अजामिभि. वा मीळ्हे[17] एव. समजाति, अपां तोकस्य तनयस्य जेषे मरुत्वान् इन्द्र न ऊती भवतु । ११

१२ सः वज्रभृत्, दस्युहा, भीम, उग्रः, सहस्रचेता , शतनीथः, ऋभ्वा । शवसा चम्रीष[18] न, पांचजन्य.[19] ।

द्युलोकाच्या प्रबळ व त्वेषाच्या गर्जनेप्रमाणें[20] ह्याचे वज्र स्वर्गलोकासही गवसणी घालून जोराने गर्जना करते. ( अनेक प्रकारचे ) लाभ व संपत्ति त्याचेकडे चालत येत असतात. हा **इन्द्र, मरुतां**सहवर्तमान, आमचें संरक्षण करण्याची इच्छा धारण करून, ( येथ ) येवो. १३

ज्याच्या सामर्थ्यामुळें त्याचे माहात्म्य व कीर्ति ही **द्युलोक** व भूलोक ह्यांना सर्वत्र व सतत वेढून टाकतात तो ( **इन्द्र** ) आमच्या अर्चनांनी[21] संतुष्ट होऊन आम्हास ( संकटातून ) पलीकडे घेऊन जावो. हा **इन्द्र, मरुतां**सहवर्तमान, आमचे संरक्षण करण्याची, इच्छा धारण करून, ( येथ ) प्राप्त होवो. १४

ज्याच्या सामर्थ्याचा अंत, देव, देवता, मर्त्य, अथवा उदकें ह्यापैकी कोणासही लागला नाही तो **इन्द्र** आपल्या बलानें[22] द्युलोक व भूलोक ह्यांचे आक्रमण करणारा तो **इन्द्र, मरुतां**सहवर्तमान, आमचे संरक्षण करण्याची इच्छा धारण करून ( येथ ) प्राप्त होवो. १५ (१०)

हा सामर्थ्यवान् देव आपल्या रथात विराजमान झाला असताना त्याच्या रथाचे जू वाहून नेणारी किंचित् रक्तवर्ण व किंचित् श्यामवर्ण अशी त्याची द्युलोकात[23] निवास करणारी देदीप्यमान[24] व सुंदर तुरगी **ऋज्राश्वास** संपत्ति अर्पण करण्याकरिता मानवसमुदायातून[25] आनंदानें ( येत ) असताना दिसत आहे. १६

हे इन्द्रा, **ऋज्राश्व, अम्बरीष, सहदेव, भयमान** आणि **सुराधा** हे **वृषागिराचे** पुत्र, आपआपल्या मित्रगणासह,[26] सामर्थ्यवान् असा जो तू त्या तुझ्या सन्मानार्थ हे तुझें आनंददायक स्तोत्र गात आहेत. १७

---

१३ दिवः शिमीवान् त्वेषः स्वथः[20] म तस्य स्वर्षाः वज्रः क्रन्दति । सनयः धनानि त सचन्ते ।

१४ यस्य शवसा मानं उक्थ अजस्रं विश्वतः सीं रोदसी परिभुजत्, स. ऋतुभि.[21] मन्दसानः पारिषत् ।

१५ देवाः, देवता, मर्ताः, आपः चन यस्य शवसः अन्त न आपु. त्वक्षसा[22] क्ष्मा दिवः च परिक्रा स मरुत्वान् इन्द्रः नः ऊती भवतु ।

१६ रोहिन्त रथ धूर्षु बिभ्रती रोहित् श्यावा द्युक्षा[23] सुमदंशु ललामी.[24] ऋज्राश्वस्य राये नाहुषीषु[25] विक्षु मन्द्रा चिकेत ।

१७ इन्द्र, वार्षागिरा, ऋज्राश्वः, अम्बरीषः, सहदेव, भयमान, सुराधा, प्रष्टिभि[26] वृष्णे ते एतत् त्यत् राधः उक्थं अभि गृणन्त ।

ज्याचा अनेक ( भक्तजन ) धावा करीत असतात अशा त्या ( **इन्द्रानें** ) पृथिवीवर दुष्ट लोक व पीडा देणारे शत्रु[27] ह्याचे क्रमाक्रमानें[28] हनन **करून टाकलें.** त्या **वज्रधारी**[29] देवानें आपल्या तेजस्वी[30] मित्राच्या साहाय्यानें भूमीची **प्राप्ति करून घेतली, सूर्याचा शोध लावला,** व उदकास उपलब्ध केलें. १८

**इन्द्र** आम्हांस नेहमीं मंगल आशीर्वचनें **देणारा असो.** ( **ह्यायोगानें** ) मार्गांत कोणतेंही विघ्न न येता ( खरोखर ) आम्हास सामर्थ्याची प्राप्ति होईल. ह्या आमच्या विनंतीस **मित्र,** व **वरुण,** व त्याचप्रमाणें **अदिति, सिंधु, पृथिवी,** व **द्युलोक** ह्यांचेंही अनुमोदन असो. १९ (११)

## सूक्त १०१.

॥ **ऋषि**–आङ्गिरस कुत्स । देवता–**इन्द्र** ॥

ज्यानें **ऋजिश्वा** ह्याचे हातून, ज्यांची संतती कृष्णवर्ण **असे** अशा लोकांचा, वध करविला त्या आनन्ददायक इन्द्रास, हवीसह[1] एक स्तोत्र अर्पण करा. त्यानें आमचें संरक्षण व्हावें ह्यासाठीं, त्याच्या मित्रत्वाची इच्छा धरून, आम्हीं त्या दक्षिण हस्तात वज्र धारण करणाऱ्या पराक्रमी देवास **मरुतांसहवर्तमान** निमंत्रण करितों. १

ज्यानें क्रोधाच्या भरात **व्यंसाचा** वध केला, ज्यानें **शम्बराला** मारिलें व ज्यानें भक्तिहीन पिप्रूचेंही हनन केलें, ज्याचा नाश करणें शक्य नव्हतें[2] अशा **शुष्णा**चाही ज्यानें नायनाट[3] केला त्या **इन्द्रा**च्या मित्रत्वाची इच्छा धरून आम्हीं त्यास **मरुतां**सहवर्तमान निमंत्रण करितों. २

द्युलोक आणि पृथिवीलोक हा ज्याचा मोठा पराक्रम आहे, ज्याच्या आज्ञेत **वरुण** राहत असतो, सूर्यही ज्याच्या आज्ञेत आहे, ज्याच्या आज्ञेस सर्व नद्याही **अनुसरतात,** त्या इन्द्रास, मित्रत्वाची इच्छा धरून, आम्हीं **मरुतां**सहवर्तमान निमंत्रण करितों. ३

---

१८ पुरुहूत पृथिव्या [illegible] हत्वी शर्वा [illegible] । **सुवज्रः** श्वित्न्येभि. सखिभ सनत, सूर्य [illegible] ।

१९ इन्द्र विश्वाहा न. [illegible] मनुयाम ।

१ य ऋजिश्वना कृष्णगर्भा निरहन [illegible] वच प्र अचत । अवस्यवः **वज्रदक्षिण** मरुत्वत वृषण सख्याय हवामहे ।

२ य. जहृषाणेन म[illegible] व्यंस, य शम्बर, य [illegible] पिप्रु अव्रत, य [illegible] **अशुष** **शुष्ण** निअवृणक मरुत्वत सख्याय हवामहे ।

३ द्यावापृथिवी य [illegible] परग, य [illegible] सूर्य, यस्य इन्द्रस्य **व्रते वरुणः, यस्य सूर्य, यस्य इन्द्रस्य व्रत सिन्धव सश्चति,** मरुत्वत सख्याय हवामहे.

जो अश्वाचा प्रभु आहे, जो धेनूचाही प्रभु आहे, जो (ह्या सर्वांना) वश ठेवतो, जो (सर्वत्र) सन्मान पावलेला असून प्रत्येक कार्यात ज्याचे अस्तित्व निश्चयाने दृग्गोचर होते, व हवि अर्पण न करणारा (अभक्त) कितीही प्रबळ असला तरी त्याचा जो वध करतो त्या इन्द्रास, त्याच्या मित्रत्वाची इच्छा धरून, आम्ही **मरुतां**सहवर्तमान निमंत्रण करितो. ४

सर्व प्राणिमात्राचा जो प्रभु आहे, ज्यानें भक्तिशील उपासकाप्रीत्यर्थ प्रथमतः धेनूची प्राप्ति करविली व ज्याने दुष्ट लोकाना दूर खाली फेंकून दिले त्या **इन्द्रास,** त्याच्या मित्रत्वाची इच्छा धरून, आम्ही **मरुतां**सहवर्तमान आमंत्रण करितो. ५

शूरांनी जो हाक मारण्यास योग्य आहे व भीरु जनांनींही जो हाक मारण्यास योग्य आहे, (युद्धांतून) पळ काढणारे ज्याचा धांवा करितात व (युद्धात) विजयी झालेले पुरुषही ज्याचा धांवा करितात, सर्व जगानेही ज्या इन्द्राच्या संगतीची इच्छा धरलेली[४] आहे त्या इन्द्रास, त्याचे मित्रत्व प्राप्त होण्याकरिता, आम्ही **मरुतां**सहवर्तमान आमंत्रण करितो. ६ (१२)

हा प्रज्ञावान् (**इन्द्र**) रुद्राच्याच दिशेकडून येतो व ह्या रुद्राचेसहवर्तमान तो **सुवर्ती**ही आपले विशाल तेज[५] पसरते. (भक्तांची) स्तोत्रें ह्या कीर्तिमान् इन्द्राचेंच अर्चन करित असतात. आम्हीही त्याचेंच मित्रत्व प्राप्त होण्याकरिता त्यास **मरुतां**सहवर्तमान आमंत्रण करितो. ७

**मरुतां**सहवर्तमान असणाऱ्या हे (**इन्द्रा**), सर्व देव एकत्र जमण्याच्या एखाद्या मोठ्या ठिकाणी तू आनंद करीत असलास अथवा एखाद्या क्षुद्र[६] स्थलांतच तू आनंदाने (वसत) असलास तरी तेथून ह्या आमच्या यज्ञाकडे आगमन कर. सत्यात संतोष मानणाऱ्या हे देवा, तुझ्या प्रेमामुळे[७] आम्ही हा हवि तयार केला आहे. ८

---

४ यो अश्वानां यो गवां गोपतिः वशी, यः आरितः कर्मणिकर्मणि स्थिरः, यः इन्द्रः वीळोः चित् असुन्वतः वधः, मरुत्वन्तं सख्याय हवामहे।

५ यः विश्वस्य जगतः प्राणतः पतिः, यः ब्रह्मणे प्रथमः गाः अविन्दत्, यः दस्यून् अधरान् अवातिरत्, मरुत्वन्तं सख्याय हवामहे।

६ यः शूरेभिः हव्यः, यः च भीरुभिः, यः धावद्भिः हूयते, यः च जिग्युभिः, यं इन्द्रं विश्वा भुवना अभि संदधुः, मरुत्वन्तं सख्याय हवामहे।

७ विचक्षणः रुद्राणां प्रदिशा एति। रुद्रेभिः योषा पृथु त्वचः तनुते। मन्मानि श्रुतं इन्द्रं अभि अर्चन्ति। मरुत्वन्तं सख्याय हवामहे।

८ मरुत्वः, यत् वा परमे सधस्थे, यत् वा अवमे वृजने मादयासे, अतः नः अध्वरं अच्छ आ याहि। सत्यराध त्वाया हविः चकृम।

हे वीर्यशाली **इन्द्रा,** तुझ्याविषयीं प्रेम बाळगून आम्हीं सोमरस तयार केला, व, हे स्तुतींचा स्वीकार करणाऱ्या देवा, तुझ्या प्रेमानें प्रेरित होऊनच आम्हीं हविही सिद्ध केला. ह्यासाठीं, हे अश्वावर[1] आरूढ होणाऱ्या **इन्द्रा,** तूं आपल्या गणांसह कुशासनांवर विराजमान होऊन **मरुतांचे**-बरोबर ह्या यज्ञांत आनंद कर. ९

तुझे जे पीतवर्ण अश्व आहेत त्यांचेसह (ह्या यज्ञांत) आनंद कर. तूं आपले ओंठ उघड व आपल्या (**सुंदर**) मुखाचे[2] दोन्ही भाग तूं हालवूं लाग. हे उत्तम मुकुटानें शोभणाऱ्या **इन्द्रा,** तुला तुझे अश्व घेऊन येवोत. आमच्या हवींविषयीं आवड[10] बाळगून तू त्यांचे सेवन कर. १०

ज्या ठिकाणीं **मरुतांची** स्तुति चाललेली असते त्याचें[11] संरक्षण करणारा हा (**इन्द्रच**) होय. **इन्द्राच्याच** कृपेमुळे आम्हास सामर्थ्याचा लाभ करून घेता येईल. ह्या आमच्या विनंतीस **मित्र,** व **वरुण,** हे व त्याचप्रमाणें **अदिति, सिंधु, पृथिवी** आणि द्युलोक हेही अनुमोदन देवोत. ११ (१३)

## सूक्त १०२.

॥ ऋषि–आङ्गिरस कुत्स । देवता–अग्नि ॥

हे (**इन्द्रा**) ज्या अर्थी तुझें मन ह्या स्तोत्रात आसक्त[1] झालेलें दिसतें त्या अर्थी हें उत्कृष्ट स्तोत्र तूं जो श्रेष्ठ देव त्या तुला मी अर्पण करितो. आनंदोत्सव प्रसंगीं अथवा स्वातंत्र्यसमयीं[2] (दोन्ही वेळीं) जो विजयीच[3] असतो त्या इन्द्रास पाहून, त्याच्या सामर्थ्यामुळे, देवांना हर्ष झाला. १

ह्याची कीर्ति सप्त नद्या भरून नेतात व ह्याच्या सुंदर देहास स्वर्ग व भूमि (हे दोन) विशाल लोक[6] धारण करितात. म्हणून, हे **इन्द्रा,** तुझेवर (आमची) श्रद्धा बसावी म्हणूनच हे सूर्य आणि चन्द्र, आम्हास प्रकाश देण्याकरिता, एकमेकांची गांठ[7] न पडू देता, संचार करीत असतात. २

---

९ सुदक्ष, इन्द्र, त्वाया सोमं सुषुम । ब्रह्मवाहः, त्वाया हविः चकृम निषुत्य,[8] अथ सगण बर्हिषि आसद्य यज्ञे मरुद्भिः मादयस्व ।

१० इन्द्र, ये ते हरिभिः मादयस्व, शिप्रे विष्यस्व, धेने[9] वि सृजस्व । सुशिप्र, त्वा हरयः आ वहन्तु । उशन्[10] न हव्यानि प्रति जुषस्व ।

११ मरुत्स्तोत्रस्य वृजनस्य[11] गोपाः वयं इन्द्रेण वाजं सनुयाम ।

१ यत् ते धिषणा अस्य स्तोत्रे आनजे[1] मही इमां धियं महः ते प्र भरे । उत्सवे प्रसवे[2] च सासहिं तं देवाः शवसा अमदन् ।

२ सप्त नद्यः अस्य श्रवः बिभ्रति । पृथिवी[4] द्यावाक्षामा दर्शतं वपुः इन्द्र श्रद्धे सूर्याचन्द्रमसा अस्मे अभिचक्षे तितुरं[5] कं चरतः ।

(आम्हा) मानवाचे प्रभो, तीन भूलोक अथवा (स्वर्गलोक) तीन देदीप्यमान प्रदेश असे तुझ्या सामर्थ्याचे त्रिगुणित प्रमाण आहे. ह्या अखिल भुवनापेक्षाही तू ज्यास्ती मोठा झाला आहेस. हे इन्द्रा, फार प्राचीनकाळापासून तुला जन्मतः कोणीच शत्रु नाही. ८

देवामध्ये आम्ही प्रथम तुला हवन करितो. युद्धात तूच विजय मिळविणारा निघालास. असा हा इन्द्र ह्या (स्तवन) कर्त्यास आघाडीस व भाग्यशाली करो व आम्हास (गायनीचा) लाभ व्हावा म्हणूनच तो आमचा रथ सर्वांच्यापुढे नेवो. ९

हे उदार देवा, लहान युद्धात व मोठमोठ्या संग्रामात तू जय मिळवितोस, पण कधीही संपत्ति बळकावून बसत नाहीस. तू उग्र आहेस, तथापि आमच्या संरक्षणार्थ तू सज्ज व्हावेस म्हणून तुला आम्ही ज्यास्ती स्फुरण चढवितो. यास्तव हे इन्द्रा, आम्ही जेव्हा जेव्हा तुझे पूजन करू त्या त्या वेळी आमचा उत्कर्ष करीत जा. १०

इन्द्र आम्हास नेहमी मंगल आशिर्वचन देणारा असो. (ह्या योगाने) आमच्या मार्गात कोणतेही विघ्न न येता (स्वर्गस्थ) आम्हास सामर्थ्याची प्राप्ति होईल. ह्या आमच्या विनंतीस मित्र व वरुण व त्याचप्रमाणे अदिति, सिंधु, पृथिवी व द्युलोक ह्यांचेही अनुमोदन असो. ११ (१५)

## सूक्त १०३.

॥ ऋषि–आङ्गिरस कुत्स । देवता–इन्द्र ॥

येथे दृग्गोचर होणाऱ्या त्या तुझ्या श्रेष्ठ सामर्थ्याचा[1] विद्वान् लोकांनी प्राचीनकाळी अति उच्च गौरव[2] केला होता. तुझ्या शक्तीचा एक अंश पृथिवीवर दृष्टीस पडतो व एक अंश स्वर्गलोकी अनुभवास येतो. आणि ज्याप्रमाणे युद्धकाळी (लढाईचे) एक निशाण दुसऱ्याजवळ जाऊन मिळते त्याप्रमाणे (तुझ्या शक्तीचे ते दोन्ही भाग तुझे ठायी) एकत्र होतात. १

---

८ नृपते, तिस्र भूमी, त्रीणि रोचना, ओजस त्रिविष्टिधातु प्रतिमानं । इदं विश्वं भुवनं अति ववक्षिथ । इन्द्र, सनात् जनुषा अशत्रुः असि ।

९ देवेषु प्रथमं त्वा हवामहे । पृतनासु त्वं समहि बभूथ । सः इन्द्रः नः कारुं उपमन्युं उद्भिदं,[15] प्रसवे[16] रथं पुरः कृणोतु ।

१० मघवन् अर्भेषु महत्सु च आजा त्वं जिगेथ, धना न रुरोधिथ । त्वा उग्रं अवसे सं शिशीमसि[17] । अथ इन्द्र, हवनेषु नः चोदय ।

११ इन्द्रः विश्वाहा नः अविता अस्तु । अपरिह्वृता वाजं सनुयाम ।

१ तत् ते इदं परमं इन्द्रियं कवयः पुरा दधिरे[1] अधारयन्त[2] अस्य इदं अन्यत् क्षमा, अन्यत् दिवि । समना इव केतुः इस पृच्यते ।

त्यानें पृथिवीचें धारण करून तिचा विस्तार केला, आणि आपल्या **वज्रानें ( वृत्रास )** मारून त्यानें उदकाचा मार्ग मोकळा केला. त्या उदार देवानें **अहीचा वध केला,** त्याने **रोहिणाचा** उच्छेद केला व त्याने आपल्या सामर्थ्यानें **व्यंसास** मारिलें. २

आपलें वज्र[3] घेऊन व आपल्या सामर्थ्यावर विश्वास ठेवून त्याने दहा शत्रूंच्या[4] पुरांचा विध्वंस करीत त्यांच्या सैन्यास पायाखालीं तुडविलें. हे वज्रधर इन्द्रा, तूं ( सर्व ) जाणत अस त्यामुळें शत्रूवर आपलें आयुध सोड[5] व तुझ्यावर विश्वास टाकणाऱ्या ( भक्तांचे ) बल व वैभव वृद्धिंगत कर. ३

वज्रधारी व उदार **इन्द्रानें** दस्यूंचा वध करण्याकरितां वाचेवर चाल **करून जात** असता आपली कीर्ति वाढवून जें नाव मिळविलें तेंच प्रशंसनीय नाव त्या **औदार्यशील देवाने** ह्या मानवी काळांतसुद्धा आपल्या भक्तांच्या हितासाठीं[6] राखलें आहे. ४

त्याचें हें विस्तृत व अतिशय वृद्धि पावलेलें ( सामर्थ्य ) अवलोकन करा व त्या इन्द्राच्या शक्तीवर विश्वास ठेवा. त्यानेंच धेनूंची प्राप्ति करून घेतली, अश्व मिळविले, औषधि संपादन केल्या, उदकें जिंकून आणलीं व अरण्याचा ताबा घेतला. ५ (१६)

वाटेंत अडविणाऱ्या ( तस्करा ) प्रमाणें जो शूर अभक्तांचा प्रथम आदरसत्कार करून मागाहून त्यांच्या संपत्तीचा भंग करीत इकडे आगमन करितो त्या अनेक पराक्रम करणाऱ्या, सामर्थ्यवान, बलशाली, व सत्यशक्तियुक्त ( इन्द्राकरितां ) आपण सोमरस तयार केला पाहिजे. ६

---

२ स पृथिवीं धारयत् पप्रथत् च । वज्रेण हत्वा अपः निः ससर्ज । अहिं अहन् रौहिणं अभिनत्, मघवा शचीभिः व्यंसं अहन् ।

३ जातूभर्मा, ओजः श्रद्दधानः पुरः विभिन्दन् दासीः वि अचरत् । वज्रिन्, विद्वान् दस्यवे हेतिं अस्य इन्द्र, आर्यं सहः द्युम्नं वर्धय ।

४ वज्री सूनु दस्युहत्याय उपप्रयन् श्रवांसि यत् नाम दधे ह तत् कीर्तेन्य नाम मघवा इमा मानुषा युगानि ऊचुषे बिभ्रत् ।

५ तत अस्य इदं भूरि पुष्टं पश्यत । इन्द्रस्य वीर्याय श्रत् धत्तन । सः गाः अविन्दत्, सः अश्वान् अविन्दत, स ओषधीः, स अपः, सः वनानि ।

६ यः शूरः परिपन्थी इव आदृत्य वेदः, आदाय विभजन्, एति, भूरिकर्मणे, वृषभाय, वृष्णे, सत्यशुष्माय सोमं सुनवाम ।

हे **इन्द्रा,** निद्रित[७] असलेल्या **अहीस** तूं वज्रानें जागें केलेस हे तूं ( **खरोखर** ) **जणूं** काहीं अत्यन्त मोठेंच शूरत्वाचें[८] कृत्य केलें. तू आनंदित झाल्याबरोबर ( अखिल ) देवपत्नी, ( सर्व ) पक्षी, व सकल देव ह्यानाही आनंद झाला. ७

हे **इन्द्रा,** त्या वेळीं तूं **शुष्ण, पिप्रु, कुयव** आणि **वृत्र** ह्याचा वध केलास त्यावेळीं तू शम्बराच्या पुराचाही ( विध्वंस केलास ). ह्या आमच्या प्रार्थनेस **मित्र, वरुण** ह्याचे व त्याचप्रमाणे **अदिति, सिन्धु, पृथिवी** व **द्युलोक** ह्याचेही अनुमोदन असो. ८ (१७)

## सूक्त १०४.

॥ ऋषि-आङ्गिरस कुत्स । देवता-इन्द्र ॥

हे **इन्द्रा,** तूं विराजमान व्हावेस म्हणून हे आसन[१] सिद्ध केलें आहे. **अश्व** जसा ( आनंदानें ) खिंकाळूं[२] लागतो त्याप्रमाणे ( आनंदानें ) ह्याचा स्वीकार कर. पक्ष्याप्रमाणे ( वेगवान् ) असे आपले घोडे ( आतां ) सोड. तुला रात्र असो की दिवस असो ( संतोषानें ) सोमपानार्थ वाहून घेऊन जाणाऱ्या तुझ्या **अश्वांस** तूं ( आता ) मोकळे कर. १

ते पुरुष आपले **सरक्षण** व्हावे ह्या हेतूनें इन्द्राकडे गेले. तेही त्या ( त्याच्याच ) मार्गाकडे जाणार नाहीं काय ? ( सर्व ) देव ( मिळून ) **दुष्ट शत्रूचा** राग शमवोत,[३] आणि आमच्या वर्णाच्या लोकास ते कल्याणाच्या मार्गाकडे घेऊन जावोत. २

दुसऱ्याच्या मनातले जाणणाऱ्या ( त्या कपट्यानें ) पाण्यांत फेंस -- ( खरोखर ) पाण्यात फेसचफेस--भरून ठेवला; ( त्या ) **कुयवाच्या** बायकामात्र दुधानें स्नान करितात. **शिफेच्या** भोवऱ्यात[४] त्या बुडून मरून जावोत. ३

---

७ इन्द्र, यत् ससन्तं वज्रेण अबोधय. तत् प्र इव वीर्य चकर्थ । हर्षितं त्वा अनु पत्नी, वयः, विश्वे देवास च त्वा अनु अमदन् ।

८ इन्द्र, यदा शुष्णं, पिप्रुं, कुयवं, वृत्रं अवधीः शबरस्य पुर वि ।

१ इन्द्र ते निषदे योनिः अकारि । वयं विमुच्य, दापा वस्तो. प्रपित्वे वहीयसः अश्वान् अवसाय, स्वान.[?] अर्वा न त आ नि षीद ।

२ त्ये नरः ऊतये इन्द्रं गु. तान् अवन. सद्य नि जगम्यात् नु देवास दासस्य मन्युं श्नथन,[?] ते न वर्णं सुविताय आ वक्षन् ।

३ केतवदा उदन फेन त्मना अव भरते, त्मना अव भरते । कुयवस्य योषे क्षीरेण स्नात ते शिफाया प्रवणे हत स्याता ।

**आयु** वर आकाशात होता. त्याच्या नाभिस्थलांने सर्व दिसेनासे[४] केलें होतें. परंतु आपल्या पुरातन सामर्थ्यांनें ( **इन्द्र** ) त्यातून ( सहज ) तरून गेला व त्याचेवर त्या शूरानें आपला अधिकार प्रस्थापित केला. त्या वीराच्या पत्नी ज्या **अजंसी** व **कुलिशी** त्यांनीं उदकामध्यें गति उत्पन्न करून त्या ( **आयूस** ) पाण्यानें भरून टाकलें. ४

ज्या अर्थी त्या दुष्ट राक्षसाचा मार्ग दृष्टीस पडूं लागला आहे व आपल्या घराची माहिती असणारी स्त्री ज्याप्रमाणे तिकडे जाते त्याप्रमाणे तो थेट तिकडे निघाला आहे,[६] त्या अर्थी हे उदार देवा, आम्हास अपाय होऊं देऊं नकोस व ज्याप्रमाणे एखादा विषयासक्त पुरुष[७] आपली संपत्ति उडवून टाकतो त्याप्रमाणे आम्हास टाकून देऊं नकोस. ५ (१८)

हे **इन्द्रा,** सूर्य, उदकें, निष्पापपणा व सर्व जीवात प्रशंसनीय स्थिति ह्याचा आम्हास लाभ व्हावा म्हणून तू आमच्याजवळ अस. आम्ही अगदी आत ( गाठ मारून ) ठेवलेल्या संपत्तीचा[९] नाश तूं होऊं देऊं नकोस. प्रत्यक्ष शरीरवळच असा जो तू श्रेष्ठ देव त्याचेवर आमचा विश्वास आहे. ६

हे **इन्द्रा** माझी अशी ( मनःपूर्वक ) समजूत आहे कीं आम्हीं तुजवर विश्वास ठेवला आहे. तूं सामर्थ्यवान् आहेस म्हणूनच तू अतिशय संपत्तीकडे आमची प्रेरणा कर. अनेक भक्तांनी ज्यास पाचारण केलें आहे असे ( हे **इन्द्र**देवा ), आम्हास क्षुधा लागेल तेव्हा अन्न[९] पाणी[१०] ( पुरवितांना ) आमचें घर बांधण्याचें तसेंच अपुरें ठेवून मात्र ते आम्हास देऊं नकोस. ७

हे इन्द्रा, आमचा वध करूं नको, आम्हास टाकू देऊं नकोस; हे सामर्थ्यवान् व उदार ( **इन्द्रा** ), गर्भांत असलेल्या आमच्या संतत्तीचा[११] नाश करूं नकोस—अनेक शिशूनासुद्धा जी एकदम जन्म[१२] देतात अशी अंडी तूं फोडूं नकोस. ८

---

४ उपरस्य आयोः नाभिं युयोप.[४] पूर्वाभिः प्र तिरते । शूरः राष्टि । अजसी कुलिशी, वीरपत्नी. पयः हिन्वाना भरन्ते ।

५ यत् दस्योः त्या नीथा प्रति अदर्शि. सदनं जानती ओक अच्छ न, गात्, अध, मघवन्, नः मा चर्कृतात् इत, निष्षपी[७] मघा[८] इव, न मा परमा परा दाः ।

६ इन्द्र, सः त्वं नः सूर्ये, सः अप्सु, अनागास्त्वे, जीवशंसे आ भज । न अन्तरां भुजं मा आ रिरिषः ते महते इन्द्रियाय श्रद्धितं ।

७ अध ते अस्मै धत् अधायि मन्ये; वृषा महते धनाय चोदस्व । पुरुहूत इन्द्र, न क्षुध्यद्भ्य, वयः[९] आसुति,[१०] अकृते योनौ, मा दाः ।

८ इन्द्र न मा वधीः, मा परा दाः न प्रिया भोजनानि ता प्र मोषीः मघवन् शक्र, न आण्डा[११] मा निः भेत । सहजानुषाणि[१२] न पात्रा मा भेत ।

इकडे ये. सोमाची तुला ( अत्यंत ) आवड आहे असे म्हणतात. ( म्हणून ) हा सोमरस येथे ओतला आहे तो पी व आनंदित हो. तू अनेक स्थले व्यापून टाकली आहेस. तूं ( हा सोमरस ) पोटात ( घालून ) सामर्थ्यवान् हो. जेव्हा आम्ही तुला हाक मारू तेव्हा आमच्या पित्याप्रमाणे ( आमची हाक ) तू ऐक. • ९ (१९)

## सूक्त १०५.

॥ ऋषि-आङ्गिरस कुत्स । देवता-अग्नि ॥

चन्द्रमा जलांतून धांवत जात आहे व हा सुंदर पंखाचा ( पक्षी ) आकाशांत धांवत आहे. ज्याचे पदर सोन्याचे आहेत अशा ह्या विजाना सुद्धां तुमचे स्थान कोणते तें ( नेमके ) माहीत नाही. हे द्युलोक व भूलोक हो, ही माझी प्रार्थना लक्ष्यांत घ्या. १

आपल्या इष्टार्थाची इच्छा करणाऱ्या मनुष्यास इच्छित वस्तु प्राप्त होते, आणि भार्येस पतीची भेट होते. ती दोघे वीर्यसंपन्न अशा उदकास प्रेरणा करितात व ते ( परस्परास ) देऊन त्यापैकी प्रत्येकजण ( स्वतःस ) आनंद प्राप्त करून देतो. हे द्युलोक व भूलोक हो, ही माझी प्रार्थना लक्ष्यात घ्या. २

हे देव हो, हे तेज स्वर्गापासून कधीही च्युत न होवो. आम्हास हितकारी असा जो सोम तो जेथे नाही अशा ठिकाणी आम्ही कधीही नसावे. हे द्युलोक व भूलोक हो, ही माझी प्रार्थना लक्ष्यात घ्या. ३

मी ( सर्वात ) शेवटच्या यज्ञास ( एक प्रश्न ) विचारितो. तो ( सर्वांचा ) दूत असल्यामुळे त्याचे उत्तर देईल. ते पूर्वीचें सत्य कोठे नाहीसे झाले? कोणत्या नवीन मनुष्याचे जवळ तें ( गेले ) आहे? हे द्युलोक व भूलोक हो, ही माझी प्रार्थना लक्ष्यात घ्या. ४

---

९ अर्वाङ आ इहि । त्वा सोमकाम आहु ; अयं सुतः; तस्य पिब । उरुव्यचाः जठरे आ वृषस्व । हूयमानः पिता इव नः शृणुहि ।

१ चन्द्रमाः अप्सु अन्तः सुपर्णः दिवि आ धावते । हिरण्यनेमयः विद्युतः वः पदं न विन्दन्ति । रोदसी मे अस्य वित्तं ।

२ अर्थिनः वै अर्थं इत् ऊम्, जाया पतिं आ युवते । वृष्ण्यं पयः तुजाते, परिदाय रसं दुहे ।

३ देवाः, अदः स्वः दिवः परि मो सु अव पादि । शम्भुवः सोम्यस्य शूने कदा चन मा भूम ।

४ अवमं यज्ञं पृच्छामि । सः दूतः तत् वि वोचति । पूर्व्यं ऋतं क्व गतं? तत् कः नूतनः तत् बिभर्ति?

द्युलोकाच्या तिन्ही देदीप्यमान प्रदेशांत जे निवास करितात अशा हे देवांनो, तुमचें सत्य कोणतें, व तुमचे असत्य कोणतें? तुम्हांस (मी) पूर्वी अर्पण केलेली आहुति कोठे गेली? हे द्युलोक व भूलोक हो ही माझी प्रार्थना लक्ष्यात घ्या. ५ (२०)

तुमचे सत्याचें परिपालन[२] कोणते? वरुणाची (अमृत) दृष्टि कोणती? श्रेष्ठ अर्यमाच्या मार्गाने, आम्ही आमचे वाईट चिंतणाऱ्या[३] लोकाना दाद न देता, कसे पुढें जाऊं? हे द्युलोक व भूलोक हो, ही माझी प्रार्थना लक्ष्यात घ्या. ६

जो मी पूर्वी सोमरस सिद्ध करून अनेक (स्तोत्रे) म्हणत होतों तोच मी होय, परंतु एखाद्या तृषित मृगाला ज्याप्रमाणे लांडगा खाऊन टाकतो त्याप्रमाणे (आतां) मला चिंता खाऊन[४] टाकीत आहेत. हे द्युलोक व भूलोक हो, ही माझी प्रार्थना लक्षात घ्या. ७

ज्याप्रमाणे सवतीसवती (जमल्या म्हणजे त्या दोन्हीकडून नवऱ्यास) छळूं लागतात त्याप्रमाणें माझ्या (कृश झालेल्या) बरगड्या मला दोहोंकडून टोचीत आहेत हे अर्थ सामर्थ्यवान् देवा, मी तुझी स्तुति गाणारा असून ज्याप्रमाणे उंदीर (कोष्ट्याच्या भागांत) दोरे खाऊन टाकतात त्याप्रमाणे मला चिंता[५] खाऊन[६] टाकीत आहेत. हे द्युलोक व भूलोक हो, ही माझी प्रार्थना लक्ष्यात घ्या. ८

हे जे (सूर्याचे) सात (रंगाचे) किरण पसरलेले आहेत त्यांच्याच खाली माझी (उघडी) पडली आहे. आप्त्य त्रिताला हे माहीत आहे व कोणी तरी त्यास मायाळु भेटावा म्हणून तो प्रार्थना[७] करीत आहे. हे द्युलोक व भूलोक हो, माझी प्रार्थना लक्षात घ्या. ९

---

५ अमी ये देवा. दिव त्रिपु रोचने आ स्थन, व ऋतम् क अ त दा? व प्रत्ना आहुति क?

६ व: ऋतस्य धर्णसि कत्? वरुणस्य चक्षण कत? ... अर्यम्ण पथ. दूढ्य का अति क्रामेम?

७ य पुरा सुते कानि चित् वदामि स अह अस्मि। त मा, ... तृष्णज मृग न, आध्य व्यन्ति[४]।

८ सपत्नी. इव पर्शव मा अभित. स तपन्ति। श क्रतो ते स्तोतार मा आध्य शिश्नां न नि अदा ...

९ अमी ये सप्त रश्माय तत्र मे नाभि: आतता। आप्त्य ... त ... वद। स जामित्वाय रेभति।

जे हे पांच प्रबल[10] देव विस्तीर्ण द्युलोकाच्या मध्यमार्गी विराजमान झाले आहेत ते माझी स्तुति श्रवण करून देवाच्या समुदायात परत गेले. हे द्युलोक व भूलोक हो, ही माझी प्रार्थना लक्ष्यात घ्या. १० (२१)

द्युलोकांच्या सीमान्तप्रदेशावर[11] हे सुंदर पंखाचे पक्षी विराजमान झालेले आहेत व ते ह्या विस्तीर्ण उदकामधूनही तरून जाणाऱ्या लांडग्यास, मार्गातून हांकून लावीत आहेत हे द्युलोक व भूलोक हो, ही माझी प्रार्थना लक्ष्यात घ्या. ११

हे देवहो, प्रशंसनीय व (भक्ताचे) कल्याण करणारें असे ते उत्तम स्तोत्र अगदी नवे आहे. (ह्या पहा) महानद्या (आपल्या प्रवाहाबरोबर) (देवाच्या) नीतिनियमनाचा प्रसार करीत आहेत व सूर्याने (चोहोकडे) सत्य पसरले आहे. हे द्युलोक व भूलोकहो, ही माझी प्रार्थना लक्ष्यात घ्या. १२

हे अग्निदेवा, तुझे देवांच्याबरोबर तें (सर्वप्रसिद्ध) नातं आहे, व त्याची (सर्वत्र) प्रशंसाही होत आहे. (ह्यास्तव) तूं जसा मनूच्या यज्ञात विराजमान[12] झाला होतास तसा येथें आमच्या करिता विराजमान हो, व अत्यंत प्रज्ञाशील असल्यामुळे तू देवांना आमचा यज्ञ पोंचीव. हे द्युलोक व भूलोकहो, ही माझी प्रार्थना लक्ष्यात घ्या. १३

सर्व देवांत अत्यंत प्रज्ञाशील व बुद्धिमान् असा हा अग्निदेव, मनूच्या यज्ञाप्रमाणे आमच्या यज्ञात स्थित होऊन, आमचे हवि देवांकडे पोचवितो. कारण हवि पोचविण्याचे[13] काम त्याचेच आहे. हे द्युलोक व भूलोकहो, ही माझी प्रार्थना लक्ष्यात घ्या. १४

---

१० ये अमी पञ्च उक्षण[10] महः दिवः मध्ये तस्थुः प्रवाच्य सध्रीचीनाः देवत्रा नि ववृतुः नु ।

११ एते सुपर्णाः दिवः आरोधने[11] मध्ये आसते । ते यहृतीः अपः तरन्तं वृकं पथः सेधन्ति ।

१२ देवाः, तत् उक्थ्यं हितं सुप्रवाचनं नव्यं । सिन्धवः ऋतं अर्षन्ति, सूर्यः सत्यं ततान ।

१३ अग्ने, देवेषु तव त्यत् उक्थ्यं आप्यं अस्ति । सः विदुष्टरः मनुष्वत् नः आ सत्तः[12] देवान् यक्षि ।

१४ देवेषु विदुष्टरः मेधिरः होता अग्निः देवः मनुष्वत् आ सत्तः देवान् अच्छ हव्या सुषूदति[13] ।

**वरुण** हाच स्तोत्र रचण्याची स्फूर्ति देतो, ( व म्हणून ) ( चांगला ) मार्ग[१२] कोणता ह्याचे ज्ञान असणाऱ्या त्या देवाची आम्ही प्रार्थना करितों. ( भक्तांचे ) हृदय व अन्तःकरण प्रकट व्हावयास तोच लावतो. ( खरोखर आज ) नीतीचा ( पुन्हां ) नवीन उदय होवो. हे द्युलोक व भूलोकहो, ही माझी प्रार्थना लक्ष्यांत घ्या. १५ (२२)

**आदित्याचा** जो हा आकाशांतील मार्ग ( सर्वांचे ) स्तुतीस पात्र होईल अशा रीतीने तयार करण्यांत आलेला आहे त्याचे अतिक्रमण, हे देवहो, तुम्हासही करता आले नाहीं व हे मर्त्यहो, तुमच्याही तो दृष्टीस पडत नाहीं. हे द्युलोक व भूलोकानो ही माझी प्रार्थना लक्ष्यांत घ्या. १६

**त्रित** विहिरींत पडला[१३] म्हणून आपल्या रक्षणाकरिता तो देवांना हांक मारीत आहे. **बृहस्पतीनें** त्याचा संकटापासून[१४] बचाव करून त्याची ती हाक ऐकिली. हे द्युलोक व भूलोकानो, ही माझी प्रार्थना लक्ष्यात घ्या. १७

मी मार्गानें जात असतां मला एकदां एका लाल रंगाच्या लांडग्याने पाहिले. मग ( काम करून करून) पाठींत[१५] कळ आलेल्या सुताराप्रमाणें तो हळू[१६] हळू उठला व (माझेमागे) चालूं लागला. हे द्युलोक व भूलोकानो ही माझी प्रार्थना लक्ष्यात घ्या. १८

ह्या स्तोत्राच्या योगानें इन्द्राची कृपा संपादन करून आम्ही आपल्या पदरच्या सर्व योद्ध्यांसह, आपल्या संकटांतून सुरक्षितपणें पार पडूं. ह्या आमच्या प्रार्थनेस **मित्र** व **वरुण** त्याचप्रमाणे **अदिति, सिन्धु, पृथिवी** व **द्युलोक** ह्यांचेही अनुमोदन असो. १९ (२३)१५)

---

१५ वरुणः ब्रह्म कृणोति । त गातुविद[११] ईमहे । हृदा मतिं ऊर्णोति । ऋत नव्यः जायतां ।

१६ देवाः, असौ य आदित्य दिवि पन्था प्रवाच्य कृतः स. न अतिक्रमे । मर्तासः, त न पश्यथ ।

१७ कूपे अवहित.[१] त्रित. ऊतये देवान् हवते । बृहस्पति. अहूरणात्[१] उरु कृण्वन् तत् शुश्राव ।

१८ पथा यन्त मा अरुण वृकः सकृत् ददर्श हि । पृष्ठ्यामयी[१] तष्टा इव निचाय्य[१] उत् जिहीते ।

१९ एना आगूषेण इन्द्रवन्त. सर्ववीरा. वय वृजने अभि स्याम ।

## अनुवाक १६.

### सूक्त १०६.

॥ ऋषि–आङ्गिरस कुत्स । देवता–इन्द्र ॥

आम्ही आपल्या संरक्षणाकरिता **इन्द्र, मित्र, वरुण, अग्नि, मरुद्गण** व **अदिति** ह्यांना आमंत्रण करितो. प्रत्यक्ष वैभवच अशा ह्या उदार देवांनो, ज्याप्रमाणे एखाद्या गाडीस अडचणीच्या[1] जागेतून काढावें त्याप्रमाणे आम्हांस सर्व संकटांतून बाहेर काढा. १

हे देवहो, तुम्हा सर्वांस उद्देशून जो आम्ही यज्ञ करीत आहों तत्प्रीत्यर्थ इकडे या. हे देवहो, दुष्टांचें हनन करून आमचें कल्याण करणारे व्हा. प्रत्यक्ष वैभवच अशा उदार देवांनो, ज्याप्रमाणे एखाद्या गाडीस अडचणीच्या जागेतून काढावें त्याप्रमाणे आम्हांस सर्व संकटांतून बाहेर काढा.[2] २

स्तुति करण्यास सर्वथैव योग्य असे **पितर** आमचें संरक्षण करोत आणि नीतिनियमनास उत्तेजन देणाऱ्या व देवांना जन्म देणाऱ्या दोघी **देवी**ही आमचें संरक्षण करोत. प्रत्यक्ष वैभवच अशा उदार देवांनो ज्याप्रमाणे एखाद्या गाडीस अडचणीच्या जागेतून काढावें त्याप्रमाणे आम्हांस सर्व संकटांतून बाहेर काढा. ३

सामर्थ्यवान् **नराशंसा**चें येथें स्तवन करीत, ज्याचेजवळ वीरांचा निवास असतो अशा **पूषा**देवास, उत्तम उत्तम हवींनीं आम्ही आळवीत आहों. प्रत्यक्ष वैभवच अशा उदार देवांनो, ज्याप्रमाणे एखाद्या गाडीस अडचणीच्या जागेतून काढावें त्याप्रमाणें आम्हांस सर्व संकटांतून बाहेर काढा. ४

हे **बृहस्पति**देवा, आम्हांकरितां सदोदित ( सर्व ) मार्ग सुलभ कर. मानवास हितकारक असें जें कांही सौख्य तुला शरण येणाऱ्याकरिताच तूं राखून ठेवलेलें असशील त्याची आम्ही तुझेपाशीं याचना करितों. प्रत्यक्ष वैभवच अशा उदार देवांनो, ज्याप्रमाणे एखाद्या गाडीस अडचणीच्या जागेतून बाहेर काढावें त्याप्रमाणे आम्हांस सर्व संकटांतून बाहेर काढा. ५

---

१ इन्द्रं, मित्रं, वरुणं, अग्निं मारुतं शर्धः, अदितिं, ऊतये हवामहे । सुदानवः वसवः, दुर्गात् रथं न, विश्वस्मात् अंहसः नः निः पिपर्तन ।

२ आदित्याः, सर्वतातये ते आ गत । देवाः वृत्रतूर्येषु शंभुवः भूत ।

३ सुप्रवाचनाः पितरः नः अवन्तु, उत ऋतवृधा देवपुत्रे देवी ।

४ वाजिनं नराशंसं इह वाजयन् क्षयद्वीरं पूषणं सुम्नैः ईमहे ।

५ बृहस्पते, सदं इत् नः सुगं कृधि । यत् ते शं यो: मनुर्हितं तत् ईमहे ।

कूपात पडलेल्या[३] कुत्स ऋषीनें, आपल्या रक्षणासाठीं, वृत्राचा वध करणाऱ्या सामर्थ्यवान् इन्द्राचा धावा केला. प्रत्यक्ष वैभवच अशा उदार देवानो, ज्याप्रमाणें एखाद्या गाडीस अडचणीच्या जागेतून बाहेर काढावें त्याप्रमाणें आम्हास सर्व संकटातून बाहेर काढा. ६

( सर्व ) देवांसह **अदिति**देवी आमचें संरक्षण करो आणि **आमचा** पालनकर्ता देवही, आम्हाकडे ( यत्किंचित् ) दुर्लक्ष न करिता, आमचें संरक्षण करो. ह्या आमच्या प्रार्थनेस **मित्र** आणि **वरुण** आणि त्याचप्रमाणें **अदिति, सिन्धु, पृथिवी** व **द्युलोक** ह्यांचेही अनुमोदन असो. ७ (२४)

## सूक्त १०७.

॥ ऋषि–आङ्गिरस कुत्स । देवता–इन्द्र ॥

यज्ञ हा देवांची उत्तम कृपा[१] संपादन करून घेण्यास साधनीभूत होत असतो. हे **आदित्य**हो, तुम्ही ( आम्हास ) सौख्य अर्पण करणारे व्हा. जी तुमची अनुग्रहबुद्धि संकटातून उत्तम संरक्षण[२] करीत असते ती आमच्याकडेच वळो. १

**अंगिरसां**च्या स्तोत्रांनी ज्याचें स्तवन झालेलें आहे असे देव ( आम्हावर ) कृपा करण्याकरिता आमच्याकडे येवोत. इन्द्र आपल्या ( सर्व ) सामर्थ्यासह, **मरुत्**देव ( इतर सर्व ) **मरुतां**सह, व **अदिति** ( सर्व ) आदित्यांसह ( येथे येवो व ) आम्हास सौख्य अर्पण करो. २

ही आमची स्तुति **इन्द्र** गोड करून घेवो. ही **वरुण** गोड करून घेवो. ही **अर्यमा** गोड करून घेवो. व ही **सविता**ही गोड[३] करून घेवो. ह्या आमच्या विनंतीस **मित्र** व **वरुण** व त्याचप्रमाणें **अदिति, सिन्धु, पृथिवी** व **द्युलोक** हेही अनुमोदन देवोत. ३

---

६ कर्ते निवाह्ळः कुत्सः वृत्रहणं शचीपतिं ... ऊतये अह्न् ।

७ देवी अदितिः देवैः नः नि पातु । त्राता देवः अप्रयुच्छन् त्रायताम् ।

१ यज्ञः देवानां सुम्नं प्रति एति । आदित्यासः, मृळयन्तः भवत । या अंहोः चित् वरिवोवित्तरा असत् सा सुमतिः अर्वाची आ ववृत्यात् ।

२ अङ्गिरसां सामभिः स्तूयमानाः देवाः अवसा नः उप आ गमन्तु । इन्द्रियैः इन्द्रः, मरुद्भिः मरुतः आदित्यैः अदितिः नः शर्म यंसत् ।

३ तत् नः इन्द्रः, तत् वरुणः, तत् अग्निः, तत् अर्यमा, तत् सविता चनः[३] धात् ।

## सूक्त १०८.

॥ ऋषि- आङ्गिरस कुत्स । देवता- इन्द्राग्नि ॥

हे **इन्द्र** आणि **अग्नि**देवहो, जो तुमचा अत्यन्त आश्चर्यकारक रथ (मार्गक्रमण करीत असता) अखिल विश्वाचें अवलोकन करीत असतो त्या रथांत[1] दोघेही एकत्र बसून (येथे) या व हा सोमरस काढून ठेवला आहे त्याचें प्राशन करा. १

हे **इन्द्र** आणि अग्निदेवहो, हे सर्व जगत् आपल्या विस्तीर्ण आकारामुळें जसें खोलपर्यंत[2] पसरलेलें आहे तसा हा सोम तुम्ही प्राशनास भरपूर पुरून तुमच्या मनास सर्वतोपरी आनंद-कारक होवो. २

तुम्ही खरोखर उत्कृष्ट कीर्तीचें उत्तम नाव मिळविलें आहे व वृत्राचें हनन करणारे तुम्ही (खरोखर) उत्कृष्ट रीतीनें एकत्र असतां. तेव्हां (ह्या यज्ञात) उत्कृष्ट रीतीनें विराजमान होऊन, हे सामर्थ्यवान इन्द्र आणि अग्निदेवहो, तुम्ही ह्या सामर्थ्यप्रद सोमरसाचें प्राशन करा. ३

हे **इन्द्र** आणि अग्निदेवहो, अग्नि प्रदीप्त केल्यावर ज्या तुम्हास भूषणें[3] चढविली आहेत, ज्यांचेकरितां यज्ञचमस वर उचलण्यांत येत आहेत, व जे तुम्ही दर्भासनावर विराजमान झालेले आहां, ते ह्या तीव्र सोमरस सिद्ध केल्याबरोबर आम्हांवर कृपा करण्याची इच्छा धरून इकडे या. ४

हे **इन्द्र** आणि **अग्नि**देवहो, जी वीरकर्में (आजपर्यंत) तुम्ही केलीं, जीं (नानाप्रकारचीं) रूपें तुम्हीं दाखविलीं, व जे (अनेक) पराक्रम तुम्ही गाजविले त्यांचे व जी तुमची आमच्याशीं कृत्यें पुरातन काळापासून प्रख्यात आहेत त्या सर्वांचें स्मरण ठेवून ह्या (आम्ही) सिद्ध केलेल्या सोमरसाचें प्राशन करा. ५ (२६)

---

१ इन्द्राग्नी, यः वां चित्रतमः रथः विश्वानि **भुवनानि** अभिचष्टे **तेन सरथं** तस्थिवांसा आ यात अथ सुतस्य सोमस्य पिबत ।

२ इन्द्राग्नी, यावत् इदं विश्वं भुवनं **उरुव्यचा** **वरिमता गभीरं अस्ति तावान्** अयं सोमः पातवे अस्तु युवभ्यां **मनसे** अरं अस्तु ।

३ सध्र्यक् भद्रं नाम चक्राथे हि, उत **वृत्रहनौ सध्रीचीना** स्थः **वृषणा इन्द्राग्नी, सध्र्यचा** निषद्य वृष्णः सोमस्य आ वृषेथां ।

४ इन्द्राग्नी, अग्निषु समिद्धेषु **आनजाना,** **यतस्रुचा, बर्हिः** **तिस्तिराणा, तीव्रैः सोमैः परिषिक्तेभिः,** सोम-नसाय अर्वाक् आ यात ।

५ इन्द्राग्नी, यानि वीर्याणि, यानि **रूपाणि उत वृष्ण्यानि चक्रथुः या वां प्रत्नानि शिवानि सख्या,** तेभिः **सुतस्य सोमस्य पिबत ।**

ज्या अर्थी प्रथम तुमच्या (दर्शनाची) आवड मनात धरून मी म्हणालो—"हा **सोम** आमच्याच (यज्ञातील) उपासकांनी तुला अर्पण केला पाहिजे"—त्या अर्थी त्या माझ्या खऱ्या भक्तीकडे पाहून (तुम्ही) या व ह्या (आम्ही) सिद्ध केलेल्या सोमरसाचे प्राशन करा. ६

हे यज्ञार्ह **इन्द्र** आणि **अग्नि**देवहो, जरी तुम्ही आपल्या मंदिरात, एखाद्या विद्वान् भक्ताच्या (घरी), अथवा एखाद्या राजाच्या (यज्ञात) आनंद करीत बसला असाल तरी तेथूनही, हे सामर्थ्यवान् देवांनो, (इकडे) या व (आम्ही) तयार केलेल्या सोमरसाचे प्राशन करा. ७

हे **इन्द्र** आणि **अग्नि**देवहो, जरी तुम्ही **यदु, तुर्वश, द्रुह्यु, अनु** अथवा **पूरू** ह्यांचे सदनात असला तरी तेथूनही, हे सामर्थ्यवान् देवांनो, (इकडे) या व (आम्ही) तयार केलेल्या सोमरसाचें प्राशन करा. ८

हे **इन्द्र** आणि **अग्नि**देवहो, जरी तुम्ही पृथिवीच्या अगदीं खालच्या प्रदेशात असला अथवा मधल्या किंवा वरच्या प्रदेशात असला तरी तेथूनही, हे सामर्थ्यवान् देवांनो, (इकडे) या व आम्ही तयार केलेल्या सोमरसाचे प्राशन करा. ९

हे **इन्द्र** आणि **अग्नि**देवहो, जरी तुम्ही पृथिवीच्या अगदी वरच्या प्रदेशात असला अथवा मधल्या किंवा खालच्या प्रदेशात असला तरी तेथूनही, हे सामर्थ्यवान् देवांनो (इकडे) या व आम्हीं तयार केलेल्या सोमरसाचे प्राशन करा. १०

---

६ यत् प्रथम वां वृणानः अब्रव "अयं सोमः नः असुरैः विहव्यः," तां सत्यां श्रद्धां अभि आ यात हि।

७ यजत्रा इन्द्राग्नी, यत् स्वे दुरोणे, यत् ब्रह्माणि राजनि वा मदथः, अतः, वृषणौ, परि आ यात हि।

८ इन्द्राग्नी, यत् यदुषु तुर्वशेषु, यत् द्रुह्युषु, अनुषु, पूरुषु स्थः, अतः, वृषणौ, परि आ यात हि।

९ इन्द्राग्नी, यत् अवमस्यां पृथिव्यां, मध्यमस्यां उत परमस्यां स्थः, अतः, वृषणौ, परि आ यात हि।

१० इन्द्राग्नी, यत् परमस्यां पृथिव्यां, मध्यमस्यां उत अवमस्यां स्थः, अतः, वृषणौ परि आ यात हि।

**हे इन्द्र** आणि **अग्नि**देवहो, जरी तुम्हीं स्वर्गात, पृथिवीवर, वनस्पतीमध्यें अथवा उदकात असलां तरी तेथूनही, हे सामर्थ्यवान् देवानो, (इकडे) या व आम्ही तयार केलेल्या सोमरसाचें प्राशन करा. ११

**हे इन्द्र** आणि **अग्नि**देवहो, तुम्ही सूर्योदयाचे वेळीं जरी स्वर्गलोकाच्या मध्यभागीं वसून आनंदानें हवीचे सेवन करीत असला तरी तेथूनही, हे सामर्थ्यवान् देवानो (इकडे) या व आम्ही तयार केलेल्या सोमरसाचें प्राशन करा. १२

**हे इन्द्र** आणि **अग्नि**देवहो, ह्याप्रमाणें सोमरसाचें प्राशन करून आमचेकरिता सर्व वैभव जिंकून घेऊन या. ह्या आमच्या विनंतीस **मित्र** व **वरुण** ह्यांचें व त्याचप्रमाणें **अदिति, सिंधु, पृथिवी,** व **द्युलोक** ह्यांचेंही अनुमोदन असो. १३ (२७)

## सूक्त १०९.

॥ ऋषि-आङ्गिरस कुत्स । देवता-अग्नि ॥

मनामध्यें वैभवाची इच्छा ठेवून मी (मला कोणी) ज्ञातिबांधव अथवा आप्त (मदत करितील काय म्हणून त्यांना) शोधावयास[1] लागलो. हे **इन्द्र** आणि **अग्नि**देवहो, तुमच्या मनाची प्रवृत्तिही माझेविषयीं अन्यप्रकारची नाहीं, व (म्हणूनच) हें जोरदार स्तोत्र मी तुमचे सन्मानार्थ रचिलें आहे. १

खरोखर मेहुण्यापेक्षा[2] अथवा एखाद्या गुणहीन जावयापेक्षांही आपण आम्हांला सढळपणानें द्रव्य देणारे आहात असें मी ऐकलें आहे. ह्यासाठीं हे **इन्द्र** आणि **अग्नि**देवहो, तुम्हांस सोमरस अर्पण करून मी हें नूतन स्तोत्र रचीत आहे. २

---

११ इन्द्राग्नी, यत् दिवि स्थः, यत् पृथिव्यां, यत् पर्वतेषु, ओषधीषु अप्सु आ अवर्णां परि आ यात हि।

१२ इन्द्राग्नी, सूर्यस्य उदिता यत् दिवः मध्ये स्वधया मादयेथ, अत... वर्णां, परि आ यात हि।

१३ इन्द्राग्नी, एव सुतस्य पपिवांसा अस्मभ्यं धनानि सजयत।

१ इन्द्राग्नी, मनसा वस्यः इच्छन् ज्ञास:[1] उत वा सजातान् वि ... हि। युवत् प्रमतिः मह्य अन्या न अस्ति। सः वाजयन्ती धियं वा अतक्षम्।

२ स्यालात्[2] उत वा विजामातुः घ ना भूरिदावत्तरा अश्रव हि। ... इन्द्राग्नी, युवभ्यां सोमस्य प्रदत्या नव्यं स्तोमं जनयामि।

आमचा वंशविच्छेद[3] न होवो अशी प्रार्थना करणारे व आपल्या वाडवडिलांचे सामर्थ्य आपल्या संततीच्या अंगीं उतरावें अशी इच्छा बाळगणारे जे सामर्थ्यवान् पुरुष सौख्याचा उपभोग घेत असतात ते केवळ **इन्द्र** आणि **अग्नि** ह्यांच्याच कृपेमुळेच होय. ( कारण ते पहा, सोमरस काढण्याकरितां त्यानी आणलेले ) यज्ञपाषाण सोमरसपात्राच्या जवळच ठेवलेले ( दिसत ) आहेत. ३

हे **इन्द्र** आणि **अग्नि** देवांनो, हे दिव्य सोमरसपात्र तुमच्या संतोषाकरिता मोठ्या हौसेनें सोमरस काढून घेत आहे. तर हे **अश्विनी** देवहो, आपले मंगल हस्त—आपले सुंदर कर—सरसावून धावत या व ( हा सोमरस ) उदकात घालून त्यावर मधुर रसाचे सिंचन करा. ४

हे **इन्द्र** आणि **अग्नि** देवतानो, मी असे ऐकले आहे की दुष्टांचे हनन करण्याचे कामीं आणि वैभव अर्पण करण्याचे प्रसंगीं आपण ( सर्वांहून ) ज्यास्त अधिकार[4] चालविता. तेव्हां हे अनेक स्थली संचार करणाऱ्या देवांनो, ह्या यज्ञात कुशासनावर अधिष्ठित होऊन ह्या सोमरसाने संतुष्ट व्हा. ५ (२८)

हे **इन्द्र** आणि **अग्नि** देवहो, एकमेकांस युद्धार्थ आह्वान[5] करणाऱ्या पुरुषापेक्षा, पृथिवीपेक्षा, द्युलोकापेक्षा, महानद्यापेक्षा, पर्वतापेक्षां, आणि ह्यावाचून जे कोणते दुसरे लोक उरले असतील त्यांच्यापेक्षांही तूं श्रेष्ठपणात अधिक आहेस. ६

ज्याचे बाहु वज्राप्रमाणे बळकट आहेत अशा हे **इन्द्र** आणि **अग्नि** देवांनो, आमची भरभराट करा, आम्हास शिकवा व आपल्या सामर्थ्याचे योगानें आमचें संरक्षण करा. हेंच खरोखर ते सूर्याचे रश्मि की ज्यांच्या स्वरूपांत[6] आमचे वाडवडील जाऊन मिळाले. ७

---

३ रश्मीन्[3] मा छेत्र इति नाधमानाः पितॄणां शक्तीः अनुयच्छमानाः वृषणः इन्द्राग्निभ्यां क मदन्ति । ता ह अद्री धिषणायाः उपस्थे ।

४ इन्द्राग्नी, देवी धिषणा युवाभ्यां मदाय उशती सोम सुनोति । अश्विना, तौ भद्रहस्ता सुपाणी आ धावत, अप्सु मधुना पृक्त ।

५ इन्द्राग्नी, वृत्रहत्ये. वसुनः विभागे, युवा तवस्तमा[4] शुश्रव । प्र चर्षणी, तौ अस्मिन् यज्ञ बर्हिषि आसद्य मादयेथां ।

६ इन्द्राग्नी, पृतनाहवेषु[5] चर्षणिभ्य , पृथिव्याः, दिवः च प्र रिरिचाथे । महित्वा सिन्धुभ्यः प्र, गिरिभ्यः अन्या विश्वा भुवना अति ।

७ वज्रबाहू इन्द्राग्नी, अस्मान् आ भरत, शिक्षत, शचीभि. अवत । इमे नु ते सूर्यस्य रश्मय, येभिः नः पितरः सपित्व आसन् ।

शत्रूंची नगरे उध्वस्त करणाऱ्या हे **वज्रधारी इन्द्र** आणि **अग्निदेवानो,** आम्हांस सन्मार्गास न्या व आमचे हवि स्वीकारून आमचे संरक्षण करा. ह्या आमच्या प्रार्थनेस **मित्र, वरुण,** व तसेच **अदिति, सिन्धु, पृथिवी** व **द्युलोक** ह्याचेंही अनुमोदन असो. ८ (२९)

## सूक्त ११०.

॥ ऋषि–आङ्गिरस कुत्स । देवता–इन्द्र ॥

माझे ( योजिलेले ) कृत्य[१] समाप्त झालें आणि तथापि ते मी पुन्हा करीत आहें, **कारण** ही ( पहा ) एक अत्यंत मधुर स्तुति ( **ऋभूंच्या** ) गौरवार्थ मी गात आहे. हा येथे सर्व देवांस उद्देशून ( सोमरसाचा ) समुद्र ( भरून ) ठेवलेला आहे. हे ऋभूनो, तो सोम 'स्वाहा' असा उच्चार करून तुम्हास अर्पण केल्याबरोबर तुम्ही ( त्याचा स्वीकार करा. व ) तृप्त व्हा. १

ज्या वेळी अज्ञानापासून ( सर्वथैव ) निर्मुक्त[२] व माझे ( जणू ) कोणी आप्तच असे तुम्ही पुराण पुरुष ( हवींच्या ) उपभोगाची[३] आवड धरून ( ... प्राप्तीच्या ) उद्योगास लागला त्या वेळी, हे **सुधन्व्याच्या** पुत्रांनो, आपल्या ( पराक्रमाच्या ) कृत्याच्या श्रेष्ठपणामुळेच तुम्हास त्या उदार **सविता** देवाच्या सदनात जाता आले. २

ज्यास कधीही गुप्त ठेवणे शक्य नाही अशा त्या **सवित्याचें** यश वर्णन करण्याचे ज्या वेळी ही श्रम घेतले त्या वेळी मात्र **सवित्यानें** तुम्हास अमरत्व अर्पण केले. त्या उदार ( **त्वष्टा** ) त्याचा जो पिण्याचा एकच रस होता त्याचे तुम्ही चार चमस केले. ३

सत्कर्माचे मोठ्या उत्साहाने आचरण करीत देवाची[४] उपासना करणारे ( **ऋभु** ) मानव असून सुद्धां अमरत्वास जाऊन पोचले. हे **सुधन्व्याचे** पुत्र **ऋभु** सूर्याचीही दर्शन प्राप्त होणाऱ्या योग्यतेस चढून, एका वर्षाच्या आत, ( दुसऱ्यांना त्यांची स्तोत्रे गावी अशा पदवीस ) चढले. ४

---

८ पुरदरा इन्द्राग्नी, अस्मान् शिक्षत, भरेषु अवत ।

१ मे अप[१] तत तत् ऊं पुनः तायते । स्वादिष्टा धीतिः उचथाय शस्यते । अय इह विश्वदेव्यः समुद्र, ऋभव स्वाहाकृतस्य स तृप्णुत ऊं ।

२ यत् अपाकाः,[२] मम के चित् आपयः, प्रांचः आभोगय[३] इच्छतः प्र ऐतन, सौधन्वनास, चरितस्य भूमना, दाशुप सवितु. गृह अगच्छत ।

३ यत् अगोह्य श्रवयन्त. ऐतन तत् सविता वः अमृतत्व आ असुवत् । त्य चित् असुरस्य भक्षण चमस एक सन्त चतुर्वय अकृणुत ।

४ शमी तरणित्वेन विव्री[४] वाघत मर्तासः सन्तः अमृतत्व अनशु. सौधन्वनः सूरचक्षस ऋभवः सवत्सरे . . . अपृच्यन्त ।

अमर अशा देवाच्या समुदायामध्येंसुद्धा आपली कीर्ति वाढावी व (अशा रीतीनें) अत्यंत उत्कृष्ट यश[5] आपणास प्राप्त व्हावें अशी इच्छा धारण करणाऱ्या **ऋभूंना** (अखेर) (मानवाकडून) स्तुति प्राप्त होऊन त्यांनी, ज्याप्रमाणें शेताची मोजणी करावी त्याप्रमाणें, आपल्या तेजस्वी हत्याराने[6] उघड्या तोंडाच्या[7] त्या एकाच यज्ञपात्राची मोजणी केली. ५ (३०)

(ह्या **ऋभूंची** श्रेष्ठ पदवी) लक्ष्यात घेऊन अंतरिक्षात वास करणाऱ्या ह्या वीराना आपण, पळीने घृत अर्पण केल्याप्रमाणे, (एक) स्तोत्र[8] अर्पण करूं या. ह्याच (परम) पित्याशीं ते आपल्या उत्साहपूर्वक कृतींनी ऐक्य पावले व सामर्थ्याचा लाभ करून घेऊन दिव्य रजोलोकावर आरूढ झाले. ६

**ऋभु** हाच आमचा आपल्या सामर्थ्यामुळे नवीन आवेश चढलेला **इन्द्र** होय; **ऋभु** हाच आपल्या शक्तीमुळे व संपत्तीमुळें आमचें निधान व आमचा (उदार) दाता होय. हे देवहो, आपल्या कृपेनें आम्ही, ज्या दिवसावर आमचें निरंतर प्रेम राहील अशा एखाद्या दिवशी, भक्तिहीन लोकांच्या सैन्यावर[9] विजय मिळवूं. ७

हे **ऋभूहो**, तुम्हींच (तुमच्या) चर्मापासून एक (खरोखरी जिवंत) गाय बनविली व मातेची व तिच्या वत्साची गाठ घालून दिली. हे **सुधन्व्याच्या** पुत्रांनो, तुम्हीं अद्भुत कृति करून आपल्या वयस्क मातापितरांस पुन्हा तरुण केलें. ८

हे **इन्द्रा**, पराक्रमामुळें जेथें लाभ होण्याचा संभव असेल अशा युद्धात आपल्या सामर्थ्यानें आमचें रक्षण[10] कर आणि **ऋभूंसहवर्तमान** (येऊन) आम्हास आश्चर्यकारक असें सौख्य अर्पण कर. ह्या आमच्या प्रार्थनेस **मित्र** आणि **वरुण**, आणि त्याप्रमाणें, **अदिति**, **सिंधु**, **पृथिवी** व **द्युलोक** ह्यांचेही अनुमोदन असो. ९ (३१)

---

५ असर्त्येपु श्रव. इच्छमानाः उपम[5] नाधमाना., उपस्तुता ऋभवः तेजनेन[6] एक जेहमान[7] पात्र क्षेत्र इव वि ममु ।

६ ये ऋभवः अस्य पितु सश्चिरे, वाज, दिवः रजः अरुहन्, अन्तरिक्षस्य नृभ्य., स्रुचा इव घृत मनीषा, विद्मना[8] आ जुहवाम ।

७ ऋभु न शवसा नवीयान इन्द्र, ऋभुः वाजेभिः वसुभिः वसुः ददिः देवा:, अवसा प्रिये अहनि असुन्वता पृत्सुती[9] अभि तिष्ठेम ।

८ ऋभव, चर्मण गा नि अपिंशत, वत्सेन मातरं पुन. स असृजत । सौधन्वनासः नरः, स्वपस्यया जिव्री पितरा युवाना अकृणोतन ।

९ इन्द्र, वाजसातौ वाजेभि. नः अविड्ढि,[10] ऋभुमान चित्र राध. आ दर्षि ।

## सूक्त १११.

॥ ऋषि–आङ्गिरस कुत्स । देवता–इन्द्र ॥

ज्ञानामुळें[1] ज्यास कुशलता प्राप्त झाली आहे अशा हे **ऋभूंनो**, तुम्हीं सुंदर रथ व इन्द्रास वाहून नेणारे सामर्थ्यवान् अश्व निर्माण केले. तुम्ही आपल्या मातापितरास तारुण्ययुक्त ( नूतन ) आयुष्य दिले व वत्सासाठीं त्याचेचजवळ सदोदित राहील अशी माता उत्पन्न केली. १

हे ( **ऋभूंनो** ) आपल्या सामर्थ्यानें आम्हास यज्ञयाग करण्यासाठीं आयुष्य[2] द्या आणि आमचे अंगीं पराक्रम व बल यावें म्हणून आम्हास उत्तम संतति व ( पोटभर ) अन्न द्या. ( शिवाय ) आम्ही आपल्या पदरच्या सर्व शूर पुरुषांसह ( निर्विघ्नपणाने ) ( ह्या जगात ) नरती करावी म्हणून आमच्या सेनेच्या अंगी जोमदारपणा उत्पन्न करा. २

हे **ऋभूंनो**, आमची अभिवृद्धि करा, आमच्या रथांची अभिवृद्धि करा व आमच्या अश्वांची अभिवृद्धि करा. तुम्ही आमची सदोदित अशी विजयशाली अभिवृद्धि केली पाहिजे की जिच्यामुळे आमचे नातलग अथवा परके— कोणीही आमच्याशी युद्ध करण्यास पुढे येवो— त्याचा पराजयच[3] होत जावा. ३

आमचे संरक्षणार्थ मी **ऋभूंचा** अधिपति **इन्द्र** ह्यास व त्याचप्रमाणें **ऋभु, वाज, मरुत्**, उभयता **मित्र** आणि **वरुण**, व दोघे **अश्विन**, ह्या देवासही सोमपान करण्याकरिता बोलावतो. आम्हास ( अनेक ) लाभ, बुद्धिशालित्व व विजयीपणा ही प्राप्त होतील अशा रीतीने ते आमची अभिवृद्धि करोत. ४

आम्हास हवि अर्पण करण्याचे सामर्थ्य यावें म्हणून **ऋभु** आम्हास ( अनेक ) लाभ[5] घडवो आणि समरांगणात विजयी होणारा **वाज** आमचे संरक्षण करो. ह्या आमच्या प्रार्थनेस **मित्र** व **वरुण** आणि त्याचप्रमाणे **अदिति, सिन्धु, पृथिवी** व **द्युलोक** ह्यांचेही अनुमोदन असो. ५ (३२

---

१ विद्मनापसः, सुवृत रथ तक्षन, इन्द्रवाहा, वृषण्वसू हरी तक्षन । ऋभवः, पितृभ्यां युवन् वयः तक्षन् । वत्साय सचाभुव मातरं तक्षन् ।

२ यज्ञाय नः ऋभुमत् वयः आ तक्षत, क्रत्वे दक्षाय सुप्रजावती इषं । यथा सर्ववीरया विशा क्षयाम तत् शर्धाय इन्द्रियं सु धासथ ।

३ नरः ऋभवः, अस्मभ्यं सातिं, रथाय सातिं, अर्वते सातिं आ तक्षत । पृतनासु जामिं अजामिं सक्षणिं जत्री सातिं नः स महेत ।

४ ऊतये ऋभुक्षणं इन्द्रं, ऋभून्, वाजान्, मरुतः, उभा मित्रावरुणा, अश्विना सोमपीतये नूनं आ हुवे । ते नः सातये, धिये, जिषे नः हिन्वन्तु ।

५ ऋभुः भराय सातिं सं शिशातु । समर्यजित् वाजः अस्मान् अविष्टु ।

## सूक्त ११२.

॥ ऋषि–आङ्गिरस कुत्स । देवता–द्यावापृथिवी अग्नि अश्विन ॥

**द्युलोक** आणि **भूलोक** ह्यांनीं आमच्या प्रार्थनेकडे प्रथम लक्ष्य[1] द्यावें म्हणून मी त्याचें स्तवन करितों व त्या सुंदर कान्तीनें युक्त असलेल्या देदीप्यमान अग्नीनें इकडे येत असतां आमच्या कामना परिपूर्ण कराव्या म्हणून मी त्याचेंही स्तवन करितों. हे अश्विनहो तुमच्या स्तुतिकर्त्यांनें तुम्हांस सोमरस अर्पण केला असतां ज्या आपल्या ( भक्तजन ) रक्षक सामर्थ्यांनीं तुम्ही त्यास[3] आपल्या [illegible] [illegible][2] करिता ती सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही येथें आगमन करा. १

( भक्तजनांची ) तुम्हाला आठवण होऊन तुम्ही त्याना आपलें औदार्य दाखविण्यास प्रवृत्त व्हावें म्हणून ते तुम्हास ( सोमरस ) अर्पण करीत तुमच्या काय काय आज्ञा बाहेर पडतात त्याची जणूं काय वाटच[4] पहात तुमच्या रथासोवती एकणकटे तिष्ठत बसलेले आहेत. हे **अश्विन**हो, ( भक्तजनाना ) त्याचे अभीष्ट प्राप्त व्हावें म्हणून त्यांची बुद्धि ज्या आपल्या ( भक्तजन ) रक्षक सामर्थ्यांनीं तुम्ही ( उचित ) कर्मांचे ठिकाणीं निमग्न करिता तीं सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही येथें आगमन करा. २

( त्या ) दिव्य अमृतामुळें तुम्हास ( नवीन ) उत्साह येत असल्याकारणानेंच ह्या सर्व लोकांवर तुम्ही अधिकार चालवीत राहिला आहा. हे शूर **अश्विन**हो, ज्या आपल्या ( भक्तजन ) रक्षक सामर्थ्यांनीं तुम्ही कधीं न विणाऱ्या[5] अशा [illegible] भरपूर दूध आणलें तीं सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही येथें आगमन करा. ३

चोहोकडे परिभ्रमण करणारा व दोन मातापासून जन्म पावलेला असा ( पुरुष ) ज्या तुमच्या ( भक्तजन ) रक्षक सामर्थ्यामुळें [illegible] पराक्रमाच्या साहाय्याने ( सर्व ) शीघ्रगामी लोकात जास्ती शीघ्रगामी [illegible] आहे व ज्या सामर्थ्याचे योगानें **त्रिमन्तु** प्रज्ञावान् होण्यास समर्थ झाला तीं [illegible] बरोबर घेऊन हे अश्विनहो तुम्ही येथें आगमन करा. ४

ज्या तुमच्या (भक्तजन) रक्षक सामर्थ्यामुळें तुम्ही बंधनात[6] पडलेल्या व पाशांत[7] सांपडलेल्या **रेभ** व **वन्दन** ह्यांच्या [illegible] उदकातून बाहेर काढलें व ज्यांच्या योगानें ( तुमच्या ) [illegible] ( [illegible] ) निमग्न असणाऱ्या **कण्वाचें** तुम्ही संरक्षण केलें तीं आपली सामर्थ्यें [illegible] तुम्ही येथें आगमन करा. ५ (३३)

---

१ पूर्वचित्तये द्यावापृथिवी, [illegible] अग्नि यामन इष्टये, [illegible] । अश्विना, याभिः भरे कारं अशाय जिन्वथः ताभिः ऊतिभिः सु आ गत । २ युवो दानाय सुभरा असश्चतः वचसः न रथं मन्तवे आ तस्थु अश्विना, याभिः इष्टये कर्मन् धियः अवथ ताभिः ऊतिभिः सु आ गत । ३ दिव्यस्य अमृतस्य मज्मना तासां विशां प्रशासने युवं क्षयथ नरा अश्विना, याभिः अस्व धेनुं पिन्वथः ताभिः ऊतिभिः सु आ गत ।

४ याभिः परिज्मा द्विमाता तनयस्य मज्मना तूर्षु तरणिः विभूषति, याभिः त्रिमन्तुः विचक्षणः अभवत् ताभिः ऊतिभिः अश्विना, सु आ गत । ५ अश्विना, याभिः निवृतं सितं रेभं वन्दनं अदभ्यं दृशे उत् ऐरयत, याभिः प्र सिषासन्तं कण्वम् आवत ताभिः ऊतिभिः सु आ गत ।

**अन्तक** चालतां[१] चालता थकून[२] गेला असता ज्या आपल्या (भक्तजन) रक्षक सामर्थ्यांमुळें तुम्हीं त्यास हुषारी आणली, (दुःखितास) दुःखविमुक्त करणाऱ्या ज्या आपल्या सामर्थ्यांमुळें तुम्हीं **भुज्यूचे** अंगी (नवीन) उत्साह उत्पन्न केला व ज्याचे योगानें तुम्हीं **कर्कन्धु** व **वय्य** ह्यांना तरतरी आणली तीं सामर्थ्यें बरोबर घेऊन, हे **अश्विनहो**, तुम्ही येथें आगमन करा. ६

ज्या तुमच्या (भक्तजन) रक्षक सामर्थ्यांमुळे तुम्हीं **शुचन्तीला** द्रव्यानें भरलेलें असें गृह[३] (अर्पण केले), ज्यांचे योगाने तुम्हीं दाहक तापही, अत्र ला सोसता येईल इतका (सौम्य), (केला) व ज्यांचे योगानें तुम्हीं **पृश्निगु** आणि **पुरुकुत्स** ह्यांचें संरक्षण केलें, तीं आपलीं सामर्थ्यें बरोबर घेऊन, हे **अश्विनहो**, तुम्हीं (येथें) आगमन करा. ७

(भक्तजन) रक्षक ज्या आपल्या सामर्थ्यांमुळे, हे बलवान् **अश्विनहो**, तुम्हीं अंध व पंगु[४] असलेल्या अशा **परावृजाला** पहाण्याची व चालण्याची शक्ति दिली व ज्याचे योगानें तुम्हीं (हिंसक प्राण्याच्या) भक्ष्यस्थानीं पडलेल्या लावी पक्षिणीस (त्याच्यापसून) सोडविलें तीं आपलीं सामर्थ्यें बरोबर घेऊन इकडे आगमन करा. ८

ज्या आपल्या (भक्तजन) रक्षक सामर्थ्यांमुळें तुम्हीं माधुर्ययुक्त नद्यांस पूर[५] आणला, ज्यांचे योगानें, हे जरारहित **अश्विनी** देवहो, तुम्हीं वसिष्ठाची भरभराट केली व ज्यांचे योगानें तुम्हीं **कुत्स**, **श्रुतर्य** आणि **नर्य** ह्यांचे संरक्षण केलें, तीं आपली सामर्थ्यें बरोबर घेऊन (इकडे) आगमन करा. ९

**अथर्व्याच्या** कुलांत उत्पन्न झालेल्या धनवान् **विश्पलेचा** ज्या आपल्या (भक्तजन) रक्षक सामर्थ्यांमुळें तुम्हीं युद्धात हजारों माणसें लढत असता त्यातूनही बचाव केला आणि तुमच्यावर प्रेम[६] करणाऱ्या ज्या **अश्वकुलातील** **वशाचें** तुम्हीं संरक्षण केलें तीं आपलीं सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही (इकडे) आगमन करा. १० (३४)

---

६ याभिः आअरणे जसमानं अन्तक, याभिः अव्यथिभिः भुज्यु जिजिन्वथुः, याभिः कर्कंधुं वय्यं च जिन्वथ. ताभिः ऊतिभिः, अश्विना सु आ गत ।

७ याभिः शुचन्तिं धनसां सुषंसद, तप्तं घर्मं अत्रये ओम्यावन्तं, याभिः पृश्निगुं पुरुकुत्सं आवत ताभिः ऊतिभिः, अश्विना, सु आ गत ।

८ वृषणा अश्विना, याभिः शचीभिः अन्धं श्रोणं परावृजं चक्षसे एतवे कृथः, याभिः प्रसितां वर्तिकां अमुचतं ताभिः ऊतिभिः सु आ गत ।

९ याभिः मधुमत सिन्धुं असश्चत, अजरौ, याभिः वसिष्ठं अजिन्वत, याभिः कुत्सं श्रुतर्यं नर्यं आवत, ताभिः ऊतिभिः, अश्विना, सु आ गत ।

१० अथर्व्यं धनसां विश्पलां याभिः सहस्रमीळ्हे आजौ अजिन्वत, प्रेणिं अश्व्यं वशं याभिः आवतं ताभिः ऊतिभिः, अश्विना, सु आ गत ।

हे अत्यंत उदार अश्विनहो, ज्या आपल्या ( भक्तजन ) रक्षक सामर्थ्यांमुळें **उशिजाच्या** कुळात जन्म पावलेल्या **दीर्घश्रवा** ( नावाच्या ) व्यापाऱ्यासाठी मेघाने मधुर ( जलाची ) वृष्टि केली व ज्याचे योगाने तुमची स्तुति करणाऱ्या **कक्षीवानाचें** तुम्ही रक्षण केलें तीं आपलीं सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही ( इकडे ) या. ११

**हे अश्विनहो**, ( भक्तजन ) रक्षक अशा ज्या तुमच्या सामर्थ्यांनी तुम्ही **रसा** ( नावाच्या ) नदीला जलप्रवाह वाहवून पूर आणला, ज्या ज्यामुळे तुम्ही अश्व नसलेल्या रथाला विजयी करण्याकरिता त्याचा बचाव केला आणि ज्या ज्यामुळें **त्रिशोक** ( आपल्या घराकडे ) धेनु घेऊन जाण्यास समर्थ झाला, ती तुमची ( सर्व ) सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही ( इकडे ) या. १२

**हे अश्विनहो**, ( भक्तजन ) रक्षक अशा ज्या तुमच्या सामर्थ्यांमुळें तुम्हास फार दूरच्या प्रदेशांत सूर्याचे सभोवती फिरता येतें, ज्याच्यामुळें **मंधाता** भूमीचें स्वामित्व मिळविण्याच्या प्रयत्नांत असता तुम्हीं त्याचें रक्षण केलें आणि ज्याच्यायोगानें विद्वान् **भरद्वाजाचें**ही तुम्ही परिपालन केलें तीं तुमचीं ( सर्व ) सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही इकडे या. १३

**हे अश्विनहो**, ( भक्तजन ) रक्षक अशा ज्या तुमच्या सामर्थ्यांमुळें तुम्ही **शम्बराचा** वध करण्याचे प्रसंगी ( त्या ) श्रेष्ठ **अतिथिग्वाचें, कशोजूचें** व **दिवोदासाचें** रक्षण केलें व ज्याचे योगाने ( शत्रूंच्या ) पुरांचा भेद करीत असता तुम्ही **त्रसदस्यूचा** बचाव केला, तीं तुमची ( सर्व ) सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही इकडे या. १४

**हे अश्विनहो**, ( भक्तजन ) रक्षक अशा ज्या तुमच्या सामर्थ्यांमुळें ( सोमरसाचे ) अतिशय पान करणाऱ्या **वम्रास, उपस्तुतास**, व पत्नीचा लाभ करून घेणाऱ्या **कलीस** तुम्ही सन्मान प्राप्त करून देता व ज्याचे योगाने **व्यश्व** व **पृथि** ह्याचे तुम्ही संरक्षण केलें तीं तुमचीं ( सर्व ) सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही ( इकडे ) या. १५ (३५)

---

११ सुदानू अश्विना, याभिः औशिजाय दीर्घश्रवसे वणिजे कोशः मधु अक्षरत, याभिः स्तोतारं कक्षीवन्तं आवत ताभिः, ऊतिभिः, अश्विना, सु आ गत ।

१२ अश्विना, याभिः उग्रः क्षोदसा रसां पिपिन्वथुः, याभिः अनश्वं रथं जिषे आवत, याभिः त्रिशोकः उस्रियाः उदाजत, ताभिः ऊतिभिः सु आ गत ।

१३ अश्विना, याभिः परावति सूर्यं परियाथः, क्षैत्रपत्येषु मधातारं आवत, याभिः विप्रं भरद्वाजं प्र आवत ताभिः ऊतिभिः सु आ गत ।

१४ अश्विना, याभिः शम्बरहत्ये महां अतिथिग्वं, कशोजुवं, दिवोदासं आवत, याभिः पूर्भिद्ये त्रसदस्युं आवत, ताभिः ऊतिभिः सु आ गत ।

१५ अश्विना याभिः विपिपानं वम्रं, उपस्तुतं, वित्तजानिं कलिं दुवस्यथः, याभिः व्यश्वं उत पृथिं आवत, ताभिः ऊतिभिः सु आ गत ।

हे शूर **अश्विन**हो (भक्तजन) रक्षक अशा ज्या तुमच्या सामर्थ्यामुळें तुह्मीं प्राचीन कालीं, शयु, **अत्रि** व **मनु** ह्यांची भरभराट व्हावी अशी इच्छा धारण केली, आणि ज्यांचे योगानें तुम्हीं **स्यूमरश्मी**करिता बाण[८] सोडले, तीं तुमचीं (सर्व) सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही (इकडे) या. १६

हे **अश्विन**हो (भक्तजन) रक्षक अशा ज्या तुमच्या सामर्थ्यामुळें **पठर्वा** हा आपला मार्ग[९] क्रमीत असता आपल्या शरीराच्या भव्यतेमुळे, इन्धनानें प्रज्वलित केलेल्या अग्नीप्रमाणें, देदीप्यमान दिसला, आणि ज्याच्या योगानें मोठमोठ्या युद्धामध्येंही तुम्हीं **शर्याता**चें संरक्षण केलें तीं तुमचीं सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही इकडे या. १७

हे **अश्विन**हो, (भक्तजन) रक्षक अशा ज्या तुमच्या सामर्थ्यामुळें तुम्हीं **अंगिरसा**च्या स्तुतीने संतोष[१०] पावला व जेथे गाईंचा समुदाय कोंडून ठेवला होता अशा गुहेमध्यें (सर्वांच्या) पुढे होऊन शिरला आणि ज्याच्या योगानें तुम्हीं शूर **मनू**ला अन्नसामग्री देऊन त्याचे संरक्षण केले, ती तुमचीं सामर्थ्ये बरोबर घेऊन तुम्ही इकडे या. १८

हे **अश्विन**हो, (भक्तजन) रक्षक अशा ज्या तुमच्या सामर्थ्यामुळें तुम्हीं **विमदास** भार्या मिळवून दिली, ज्यांच्यामुळें ताम्रवर्ण धेनूंस तुम्ही (आपल्या आज्ञा मानावयास) शिकविलें व ज्याच्या योगाने तुम्हीं **सुदेव्याला सुदासा**कडे घेऊन आला त्या तुमच्या सामर्थ्यासह तुम्ही इकडे या. १९

हे **अश्विन**हो, (भक्तजन) संरक्षक अशा ज्या तुमच्या सामर्थ्यामुळे तुम्ही हवी अर्पण करणाऱ्या भक्ताने कल्याणप्रद[११] होता, ज्याच्या योगानें तुम्ही **भुज्यु** आणि **अध्रिगु** ह्यांचे संरक्षण करता, आणि ज्यांच्यामुळे तुम्हीं उत्तम हवि देणाऱ्या **ऋतस्तुभे**ला सौख्यामध्ये (ठेविता) तीं तुमचीं सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही इकडे या. २० (३६)

---

१६ नरा अश्विना, याभि. पुरा शयवे, याभि. अत्रये, याभि मनवे गातु ईषथुः, याभि स्यूमरश्मये शारीः[८] आजत, ताभिः ऊतिभि सु आ गत ।

१७ अश्विना, याभि पठर्वा जठरस्य मज्मना अग्निः न[९] चित इद्धः अग्निः न अदीदेत्, याभिः महाधने शर्यात अवथः ताभि. ऊतिभि सु आ गत ।

१८ अश्विना, याभि अंगिर मनसा निरण्यथः,[१०] गोअर्णसः विवरे अग्र गच्छथः, याभिः शूर मनु इषा समावत ताभिः ऊतिभिः सु आ गत ।

१९ अश्विना, याभि विमदाय पत्नी नि ऊहथु, याभि. वा घ अरुणीः अशिक्षत, याभिः सुदेव्य सुदासे ऊहथुः ताभिः ऊतिभि सु आ गत ।

२० अश्विना, याभिः ददाशुषे शताती[११] भवथः, याभि भुज्यु, याभिः अध्रिगु अवथः, याभिः सुभरां ऋतस्तुभ ओम्यावतीं, ताभिः ऊतिभि सु आ गत ।

**हे अश्विन**हो, ज्या आपल्या ( भक्तजन ) रक्षक सामर्थ्यांनीं तुम्हीं शरसंधानप्रसंग[११] **कृशानूची** वहावा करविली, ज्याचे योगाने तुम्हीं त्या तरुण पुरुषाचा अश्व वेगानें धावत असतां त्याचें संरक्षण केलें व ज्याचे योगानें तुम्हीं भ्रमराना त्याना आवडता मध आणून देतां तीं तुमचीं सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही ( इकडे ) या. २१

**हे अश्विन**हो, ज्या आपल्या ( भक्तजन ) रक्षक सामर्थ्यांनीं तुम्हीं **धेनूंच्या** प्राप्तीकरितां युद्ध करणाऱ्या त्या वीराचा, त्यास युद्धांत भूमि व संतति मिळवून देऊन, उत्कर्ष करविला, आणि ज्याचे योगानें तुम्हीं रथ व अश्व ह्यांचें संरक्षण करितां, तीं आपलीं सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही ( इकडे ) या. २२

**हे अश्विन**हो, ज्या आपल्या ( भक्तजन ) रक्षक सामर्थ्यांमुळें तुम्हीं **अर्जुनी**चा पुत्र **कुत्स** व त्याच प्रमाणें **तुर्वीति** व **दभीति** ह्यांचें संरक्षण केलें व ज्यांचे योगानें तुम्हीं **ध्वसन्ति** व **पुरुषन्ति** ह्यांचेंही परिपालन केलें तीं आपलीं सामर्थ्यें बरोबर घेऊन तुम्ही ( इकडे ) या. २३

हे शत्रूंचा नाश करणाऱ्या पराक्रमी **अश्विनी** देवानो, आम्हांवर कृपाळू होऊन स्तुति व प्रार्थना सफल[१३] करा. सूर्याची[१४] प्रभा फाकली नाहीं तोंच आमच्या संरक्षणासाठीं मी तुमचा धावा करीत आहे. ह्यासाठीं आम्हांस सामर्थ्य अर्पण करून आमची भरभराट करा. २४

**हे अश्विन**हो, आमच्या सौख्यात कधींही खंड[१५] पडूं न देतां रात्रंदिवस आमचें संरक्षण करा. ह्या आमच्या प्रार्थनेस **मित्र** आणि **वरुण** आणि त्याचप्रमाणें **अदिति, सिंधु, पृथिवी,** व **द्युलोक** ह्यांचेंही अनुमोदन असो. २५ (३७) (७)

---

२१ अश्विना, याभि: असने[११] कृशानु दुवस्यथ:, याभि: यून: अर्वत जवे आवतं, यत् सरड्भ्य: प्रिय मधु भरथ: ताभि ऊतिभि सु आ गत ।

२२ अश्विना, याभि: गोषुयुध नर नृषाह्ये क्षेत्रस्य तनयस्य साता जिन्वथ:, याभि: रथान्, याभि: अर्वत: अवथ: ताभि: ऊतिभि: सु आ गत ।

२३ शतक्रतू अश्विना, याभि: आर्जुनेय कुत्स, तुर्वीतिं, दभीतिं प्र आवतं, याभि: ध्वसंतिं पुरुषन्ति आवत, ताभि. ऊतिभि सु आ गत ।

२४ दस्रा वृषणा अश्विना, अस्मे न. वाच मनीषां अप्नस्वती[१३] कृत, अद्यूत्ये[१४] अवसे वां नि ह्वये वाजसातौ न: वृधे च भवतं ।

२५ अश्विना, अरिष्टेभि:[१५] सौभगेभि द्युभि: अक्तुभि: अस्मान परिपात ।

## सातवा अध्याय समाप्त ॥

# अध्याय ८.

## सूक्त ११३.

॥ ऋषि-आङ्गिरस कुत्स । देवता-उषा ॥

हें सर्व तेजांतील श्रेष्ठ **तेज** अवतीर्ण झालें आहे. हा आश्चर्यकारक व सर्वव्यापी **प्रकाश**[1] उदय पावला आहे. **सवित्यास** जन्म[2] देण्याकरिताच ही ( **उषा** ) प्रादुर्भूत झाली आहे व म्हणून **रात्रीनें** तिचेकरिता ( चटकन ) जागा केली. १

आपलें शुभ्रवर्ण बालक घेऊन ही शुभ्र व देदीप्यमान ( **उषा** ) प्राप्त झाली आहे. कृष्णवर्ण ( **रात्रीनें** ) आपली सर्व निवासस्थानें इच्याकरिता मोकळीं करून ठेवलीं आहेत. परस्परांशीं समान नात्याच्या अशा ह्या एकमेकींस अनुसरणाऱ्या[3] ( दोघी ) अमर देवता, ( जगताचा ) वर्ण **पालटीत,** आकाशमार्गानें संचार करीत असतात. २

ह्या दोघी भगिनींचा मार्ग अनन्त आहे. देवाच्या आज्ञेस अनुसरून त्या पाळीपाळीनें त्या मार्गानें संचार करितात. एका विचारानें चालणाऱ्या परंतु स्वरूपांत भिन्न अशा ह्या सुंदर[4] ( दोघीजणी ), **रात्र** आणि **उषा,** ( कोठेंच ) थांबत अथवा विश्रान्ति घेत नाहींत. ३

देदीप्यमान, व माधुर्ययुक्त सत्याचा लाभ घडविणारी ही आश्चर्यकारक ( **उषा** ) दिसूं लागली आहे. हिनें आमच्या ( गृहाचीं ) द्वारें उघडलीं आहेत. ( सर्व ) जगास ( आपापल्या उद्योगाकडे ) प्रवृत्त[5] करून तिनें आम्हाकरिता धनें खुलीं केलीं आहेत, व तिनें सर्व प्राणिमात्रास जागृत केलें आहे. ४

---

१ इदं ज्योतिषां श्रेष्ठं ज्योतिः आ अगात् । चित्रः विभ्वा प्रकेतः[1] अजनिष्ट । यथा **सवितुः सवाय**[2] एव प्रसूता रात्री उषसे योनिं अरैक् ।

२ रुशद्वत्सा रुशती श्वेत्या आ अगात् । कृष्णा अस्याः सदनानि अरैक् ऊं । **समानबन्धू अनूची**[3] **अमृते** वर्णं आ मिनाने द्यावा चरतः ।

३ स्वस्रोः अध्वा समानः अनन्तः । देवशिष्टे तं अन्यान्या चरतः **समनसा विरूपे सुमेके**[4] **नक्तोषसा न** मेथेते, न तस्थतुः ।

४ भास्वती, सूनृतानां नेत्री चित्रा अचेति । नः दुरः वि आवः । जगत् प्रार्प्य[5] नः रायः **वि अख्यत्** । **उषाः विश्वा भुवनानि अजीगः** ।

ह्या उदार उषेनें सर्व प्राणिमात्रास जागृत केले आहे, ह्या हेतूने की जो (वाटसरू रस्त्यात) आडव्यातिडवा[6] निजला असेल त्याने चालू लागावें, त्याचप्रमाणे तुम्हांपैकी कोणी भोग्यवस्तूकरिता प्रयत्न करावा, कोणी इष्टार्थलाभासाठी झटावें, कोणी धनप्राप्त्यर्थ खटपट करावी, व ज्यास अल्प[7] दिसत असेल त्यास स्पष्ट रीतीनें दिसू लागावें. ५ (१)

तुम्हांपैकी कोणी सामर्थ्य मिळविण्याचा प्रयत्न करावा, कोणी कीर्तीकरिता खटपट करावी, कोणी आपला उच्च इष्ट हेतु तडीस जावा म्हणून झटावें, कोणी आपल्या (आवडत्या) योजनेच्या सिद्धीस जाऊन पोचावें आणि प्रत्येकास आपआपल्या भिन्न भिन्न चरितार्थाचा मार्ग दिसावा म्हणून ह्या उषेनें सर्व प्राणिमात्रास जागृत केलें आहे. ६

शुभ्र वस्त्रे परिधान केलेली व पृथिवीवरील सर्व वैभवाची स्वामिनी अशी ही देदीप्यमान द्युलोककन्या दृग्गोचर झाली आहे. हे मंगलप्रद उषे आज येथे आपला उज्ज्वल प्रकाश पाड. ७

आपला उज्ज्वल प्रकाश (सर्वत्र) पाडीत, (सर्व) प्राण्यांस आपआपल्या कार्यास प्रवृत्त करीत व कोणी मृतवत् (शय्येवर) पडले असता त्यांस जागृत करीत ही शाश्वतपणें पुढे येणाऱ्या (सर्व) उषातील पहिली उषा मागे गेलेल्या उषांच्या मार्गाने चालली आहे. ८

हे उषे, तूं अग्नीस प्रदीप्त होण्यास सिद्ध केलेंस, सूर्याच्या नेत्राच्या योगाने (जगतास) प्रकाशित केलेंस, व यज्ञव्यापृत होण्यास इच्छिणाऱ्या (सर्व) मानवास तू जागृत केलेंस हे देवाच्यावर तुझे मोठेच उपकाराचें कृत्य झालें. ९

---

५ जिह्मश्ये चरितवे, त्व आभोगये इष्टये राये, दभ्रं पश्यद्भ्यः उर्विया विचक्षे उषाः विश्वा भुवनानि अजीग ।

६ त्व क्षत्राय, त्व श्रवसे, त्व महीयै इष्टये, त्व अर्थं इव इत्यै, विसदृशा जीविता अभिप्रचक्षे, उषाः विश्वा भुवनानि अजीगः ।

७ शुक्रवासा, विश्वस्य पार्थिवस्य वस्वः ईशाना, व्युच्छन्ती युवतिः एषा दिवः दुहिता प्रति अदर्शि। सुभगे उष, अद्य इह व्युच्छ ।

८ व्युच्छन्ती, जीव उदीरयन्ती, मृत कचन बोधयन्ती, शश्वतीनां आयतीनां प्रथमा उषाः परायतीनां पाथः अनु एति ।

९ उषः, यत् अग्नि समिधे चकर्थ, यत् सूर्यस्य चक्षसा वि आवः, यत् यक्ष्यमाणान् मानुषान् अजीगः, तत् देवेषु भद्र अप्नः चकर्ष ।

ज्या **उषा** पूर्वी प्रकाशून गेल्या आणि खरोखर ज्या पुढे प्रकाशणार आहेत, त्यापैकीं प्रत्येक किती थोडा वेळ आपणाजवळ राहणारी आहे बरें ? (जी) **उषा** ( येते ती ) मोठ्या करुण स्वानें तिच्या अगोदर येऊन गेलेल्या उषाविषयीं शोक करिते व आपला प्रकाश प्रकट करीत इतर **उषां**ची सोबत भेटली की त्यास मिळतें. १० (२)

ज्या मानवांनी पूर्वकालीन **उषेस** प्रकाशताना पाहिले ते मानव गेले. ही **उषा** आता आमचे दृष्टीस पडत आहे व जे पुढे येणाऱ्या **उषां**ना पाहतील ते लोकही मार्ग क्रमीत आहेत. ११

हे **उषे,** द्वेष्ट्याचा निःपात करणारी, सत्याचे परिपालन करणारी, सत्यासाठी जन्म घेणारी, उत्कृष्ट वैभवाने युक्त, माधुर्यपरिपूर्ण असे सत्य भाषण करणारी, अत्यंत मंगल, देवांचे हवि घेऊन येणारी व अत्यंत श्रेष्ठ अशी तू आपला उज्ज्वल प्रकाश ( येथे ) पाड. १२

ही **उषो**देवी प्राचीन कालापासून एकसारखी प्रकाशत आहे, त्या उदार देवतेनें ह्याप्रमाणे आजही आपला प्रकाश पाडला आहे व तसेच ती इतउत्तरही प्रकाशित होईल. ही जरा व मृत्यु ह्याच्या पीडेपासून मुक्त अशी **उषा** आपल्या मार्गांनी गमन करीत असते. १३

आपल्या आभरणांनी मंडित अशी ही **उषा** द्युलोकाच्या दिगन्तींचे प्रदेशात प्रकाशली आहे. ह्या देवीनें ( जगताचा ) कृष्ण देह शुभ्र केला आहे. आरक्त रक्तवर्ण अश्वांच्या योगानें ( सर्वास ) जागृत करीत ही **उषा** आपल्या उत्तम रीतीनें सिद्ध केलेल्या रथात आरूढ होऊन येत आहे. १४

---

१० याः व्यूषुः, याः च नून विउच्छान् कियति इत् समया आ भवाति? वावशाना पूर्वाः अनु कृपते, प्रदीध्याना अन्याभिः जोष एति ।

११ ये मर्त्यासः पूर्वतरां उषस व्युच्छन्तीं अपश्यन् ते ईयुः । अस्माभिः ऊ प्रतिचक्ष्या अभूत् नु । ये अपरीषु पश्यान् ते यन्ति ।

१२ उषः, यवयद्द्वेषाः, ऋतपाः, ऋतेजाः, सुम्नवरी, सूनृता. ईरयन्ती, सुमङ्गली., देववीतिं बिभ्रती श्रेष्ठतमा अद्य इह व्युच्छ ।

१३ देवी उषा. पुरा शश्वत् वि उवास, अथो मघोनी अद्य इदं व्यावः, अथो उत्तरान् द्यून् अनु व्युच्छात. अजरा अमृता स्वधाभिः चरति ।

१४ अञ्जिभिः दिवः आतासु वि अद्योत् । देवी कृष्णां निर्णिजं अप आवः । अरुणेभिः अश्वैः प्रबोधयन्ती उषाः सुयुजा रथेन आयाति ।

(सर्वांच्या) आवडीचे पोषक पदार्थ आपलेबरोबर आणून ही प्रज्ञावती **उषा** आपलें आश्चर्यकारक तेज प्रकट करीत . . . ज्या अविनाशी **उषा** (आतापर्यंत) प्रकाशून गेल्या त्यांपैकीं शेवटची[10] व (पुढे) प्रकाशमान होणाऱ्या **उषां**पैकीं पहिली अशा ह्या **उषे**ने येथें आपली प्रभा पसरली आहे. १५ (३)

चला उठा;[11] आपला चैतन्यदायक प्राण आला आहे. अंधकार पळून गेला आणि प्रकाशाचें आगमन होत आहे. सूर्यास आपला प्रवास करता यावा म्हणून (ह्या **उषे**नें) (त्याचेकरितां) मार्ग मोकळा करून दिला आहे. जेथें (सर्व लोक) आपल्या आयुष्याची वृद्धि करून घेतात अशा स्थलीं आपण येऊन पोंचलो आहों. १६

देदीप्यमान **उषा**ची स्तुति करीत हा स्तोता—हा उपासक—त्याच्या सन्मानार्थ (उत्तम) गाणीं गुंफून[12] तीं गात असतो. ह्यास्तव हे उदार देवी, तूं ह्या स्तोत्याकरितां आज प्रकाशित हो व आह्मांवर सततीनें युक्त अशा (दीर्घ) आयुष्याची प्रभा पाड. १७

गोधनाची व अश्वाची प्राप्ति करून देणाऱ्या व सर्व वीराना पूज्य अशा ज्या **उषा,** हवि अर्पण करणाऱ्या मानवाकरितां सुप्रकाशित होतात, त्याचेप्रत हा त्यांचा सोमयागी उपासक, हीं उत्तम स्तोत्रें वायूप्रमाणें उच्चरवानें गाइल्याबरोबर, जाऊन प्राप्त होवो. १८

देवांची माता, अदितीचें बल, यज्ञाचा ध्वज, व श्रेष्ठ अशी जी ती तूं आम्हाकरितां प्रकाश. (आमच्या यज्ञाची) प्रशंसा करीत आमचें स्तोत्र श्रवण करून उज्ज्वल कांतीनें युक्त हो. हे सर्वांस प्रिय असणारे (**उषे**), ह्या लोकांत आम्ही रहात असतां आम्हांस नवीन जीवन अर्पण कर. १९

---

१५ वार्याणि पोष्या आवहन्ती चेकिताना चित्रं केतुं कृणुते. ईयुषीणां शश्वतीनां उपमा[10] विभातीनां प्रथमा उषाः वि अश्वैत्।

१६ उत् ईर्ध्वं,[11] । न. असुः आ अगात्, तमः अप प्र अगात्, ज्योति; आ एति । सूर्याय यातवे पंथां अरैक्। यत्र आयुः प्रतिरन्ते अगन्म ।

१७ विभातीः उषसः स्तवानः रेभ. वह्निः वाचः स्यूमना[12] उत् इयर्ति । तत् मघोनि गृणते अद्य उच्छ, अस्मे प्रजावत् आयु नि दिदीहि ।

१८ गोमत. अश्वदाः सर्ववीराः याः उषसः दाशुषे मर्त्याय व्युच्छन्ति सोमसुत्वा सूनृतानां वायोः इव उदर्के ताः अश्नवत् ।

१९ देवानां माता, अदिते. अनीक, यज्ञस्य केतुः, बृहती वि भाहि । प्रशस्तिकृत् नः ब्रह्मणे वि उच्छ; विश्ववारे जनं नः आ जनय ।

पूजन व स्तवन करणाऱ्या उपासकासाठीं जें मंगल व आश्चर्यकारक बल उषा घेऊन येत असतील त्यास **मित्र, वरुण, अदिति, सिन्धु, पृथिवी व द्युलोक** ह्या सर्वांचें अनुमोदन असो २० (४)

## सूक्त ११४.

॥ ऋषि–आङ्गिरस कुत्स । देवता–रुद्र ॥

जो प्रत्यक्ष पराक्रमच आहे, जो जटाभारानें[1] मंडित आहे व ज्याचा आश्रय अखिल वीर करीत असतात अशा रुद्रदेवास आम्ही ह्या स्तुति अर्पण करीत आहोंत. ह्या योगानें आमच्या (सर्व) द्विपाद व चतुष्पाद प्राण्यांचें कल्याण होईल व ह्या ग्रामांतील सर्व (जन) अभिवृद्धि पावून (सर्व) त्रासांतून मुक्त होतील. १

हे रुद्रा, आम्हास सौख्य दे व आम्हास आनंद (होईल असें) कर. ज्या तुझा सर्व शूर पुरुष आश्रय करितात त्या तुला वन्दन करून आम्ही तुझी सेवा करूं. तुझा आश्रय करणाऱ्या (भक्तासच) प्राप्त होण्यास योग्य अशा ज्या कल्याणाची (आमचा पिता मनु ह्यानें इच्छा केली तें, हे रुद्रा, तुझ्या मार्गदर्शकत्वाखालींच[2] आम्हास प्राप्त होईल. २

हे उदार[3] रुद्रा, ज्याचा आश्रय सर्व वीर पुरुष शोधतात अशा तुझ्या कृपेचा लाभ आम्हास देवाची उपासना केल्यामुळेंच प्राप्त होईल. आमच्या (कुटुंबांतील) (सर्व) माणसांकरिता उत्तम उत्तम वैभव घेऊन तूं (इकडे[4]) ये. आमच्या (पदरचे) (सर्व) शूर लोक खुशाल राहून आम्ही तुला हवि अर्पण करूं. ३

अतिशय त्वेषयुक्त, यज्ञ सिद्धीस नेणारा, वक्रगतीनें मंडित व प्रज्ञाशील अशा रुद्रास आम्ही आपल्या संरक्षणाकरितां निमंत्रण करितों. तो देवांचा कोप आम्हांपासून दूर घालवो. त्याच्या कृपेचीच आम्ही इच्छा करीत आहोंत. ४

---

२० ई जानाय शशमानाय यत् भद्र चित्र अप्र.” उषसः वहन्ति तत् नः मित्रः वरुणः ममहंतां ।

१ तवसे कपर्दिने[1] क्षयद्वीराय रुद्राय इमाः मतीः प्र भरामहे, यथा द्विपदे चतुष्पदे श असत्, अस्मिन् ग्रामे विश्व पुष्ट अनातुर ।

२ रुद्र, न मृळ उत नः मयः कृधि । क्षयद्वीराय ते नमसा विधेम । यत् च योः च श पिता मनुः आयेजे तत्, रुद्र, तव प्रणीतिषु[2] अश्याम ।

३ मीढ्वः[3] रुद्र, क्षयद्वीरस्य तव सुमतिं ते अश्याम । अस्माकं विशः इत् सुक्षयन् आचर[4] । अरिष्टवीराः ते हविः जुहुवाम ।

४ वय त्वेष यज्ञसाधं वंकु कविं रुद्र अवसे नि ह्वयामहे । दैव्यं हेळः अस्मत् आरे अस्यतु । अस्य सुमतिं इत् वयं आ वृणीमहे ।

देदीप्यमान, जटाधारी व त्वेषयुक्त रूप ( धारण करणार ) अशा त्या स्वर्गलोकातील वराहास वन्दन करून आम्ही बोलावीत आहोंत. तो आपले हातात ( सर्वांना ) हवींगी वाटणारी औषधें धारण करून आह्मास सौख्य, अभय व सुरक्षितपणा अर्पण करो. ५ (५)

मधुराहून मधुर व संतोषप्रदायक असें हे स्तोत्र ( आम्ही ) मरुतांचा पिता जो रुद्र त्याचेकरिता गात आहोत. म्हणून हे अमर देवा, तू आम्हा मानवास योग्य अशा भोग्य व पोषणाच्या वस्तु अर्पण कर व आम्हास व आमच्या मुलाबाळास सौख्य दे. ६

हे रुद्रा, आमच्यातील जे थोर असतील अथवा जे लहान असतील, जे मोठे होत असतील अथवा जे मोठे झाले असतील, त्यापैकी कोणासही ( इजा पोचू देऊ ) नकोस. आमचा पिता आणि आमची माता ह्यांना मारूं नकोस व आम्हास प्रिय जी आमची शरीरें त्यानाही इजा पोचूं देऊं नकोस. ७

आमच्या मुलाबाळास, आमच्या नोकरास, आमच्या धेनूंस आणि आमच्या अश्वांस इजा पोचूं देऊं नकोस. हे रुद्रा, तूं क्रुद्ध होऊन आमच्या पदरच्या शूर पुरुषास मारूं नकोस. आम्ही हवि अर्पण करून नेहमी तुझे पूजन करीत असतो. ८

ज्याप्रमाणे गुराखी ( गुरें ) जमा करितो त्याप्रमाणे मी तुझ्या सन्मानार्थ ( अनेक ) स्तोत्रें एकत्र करीत आहे. हे मरुतांच्या पित्या, तू आम्हास उत्कृष्ट अभय अर्पण कर. तुझी कृपा मंगलप्रद व अत्यंत सुखदायक आहे व ह्याचमुळे मी तुझ्या कृपाप्रसादाचीच केवळ याचना करितो. ९

---

५ अरुष कपर्दिन त्वेष रूप दिव वराह नमसा नि ह्वयामहे । वार्याणि भेषजा हस्ते बिभ्रत् शर्म वर्म छर्दिः अस्मभ्य यसत् ।

६ स्वादो स्वादीय वर्धन इद वच मरुता पित्रे रुद्राय उच्यते । अमृत नः मर्तभोजन च रास्व, त्मने तोकाय तनयाय मृळ ।

७ रुद्र, नः महान्त उत न अर्भक, न. उक्षन्त उत नः उक्षित, न पितर उत मातर, न प्रियाः तन्वः मा रिरिषः ।

८ नः तोके तनये, न. आयौ, न. गोषु, न. अश्वेषु मा रिरिष. । रुद्र, भामितः नः वीरान् मा वधीः हविष्मन्तः त्वा सद इत् हवामहे ।

९. पशुपाः इव ते स्तोमान् आ अकर । मरुता पित. अस्मे सुम्न रास्व । ते सुमतिः भद्रा मृळयत्तमा हि, अथ वय ते अवः इत् वृणीमहे ।

धेनु व पुरुष ह्यांचा वध करणारं तुझं (शस्त्र) दूर राहो, व, हे (सर्व) वीर पुरुषांना आश्रयभूत असलेल्या देवा, तुझ्याजवळील उत्कृष्ट वैभव मात्र आम्हांकरितां असो. हे देवा, तूं आम्हांस सौख्य दे आणि आमचा कैवार घेऊन बोल, आणि तू द्विगुणित (सामर्थ्यवान्) असल्यामुळे, आम्हांस सुरक्षितपणा अर्पण कर. १०

त्या (रुद्रानें) आमचें रक्षण करावें अशी इच्छा बाळगून हें नमस्कृतिपूर्ण स्तोत्र आम्हीं गाइलें आहे, व म्हणून तो रुद्र, मरुतांसहवर्तमान, आमची हाक श्रवण करो. ह्या आमच्या प्रार्थनेस मित्र, वरुण आणि त्याचप्रमाणें अदिति, सिन्धु, पृथिवी आणि द्युलोक हेही आपलें अनुमोदन देवोत. ११ (६)

## सूक्त ११५.

॥ ऋषि–अङ्गिरस कुत्स । देवता–सूर्य ॥

**मित्र, वरुण** आणि **अग्नि** ह्यांचें (जणू काही) नेत्रच असें हें देवांचें आश्चर्यकारक बल उदय पावलें आहे! स्थावर जंगम वस्तूंचा (जणूं काहीं) प्राणच अशा ह्या **सूर्यानें** द्युलोक, भूलोक व अन्तरिक्ष ह्यांना व्यापून टाकलें आहे. १

जसा एखादा मनुष्य (आपणास प्रिय अशा) एखाद्या तरुणीच्या मागोमाग जाऊं लागतो त्याप्रमाणें हा सूर्य देदीप्यमान अशा ह्या **उषोदेवीच्या** पाठीमागें चालत असून, ज्या ठिकाणीं भक्तिमान् लोक आपलें आयुष्यक्रमण करीत असतात अशा मंगल स्थानीं त्याचें मंगल करण्याकरितां जात आहे. २

सूर्याचे अश्व मंगलप्रद, आश्चर्यकारक, अनेक[1] प्रकारच्या रंगाचे व आनंददायक आहेत. सूर्यास नमन करून त्यांनीं द्युलोकाचा पृष्ठभाग व्यापून टाकला आहे. ते द्युलोक व भूलोक ह्यांचेभोंवतीं निमिषमात्रांत जाऊं शकतात. ३

---

१० ते गोघ्न उत पुरुषघ्न आरे । क्षयद्वीर, ते सुम्न अस्मे । अस्तु देव नः मृळ च अधि ब्रूहि च, अव द्विबर्हाः नः शर्म च यच्छ ।

११ अवस्यवः अस्मै नमः अवोचाम । मरुत्वान् रुद्रः नः हव शृणोतु ।

१ मित्रस्य वरुणस्य अग्नेः चक्षुः देवानां चित्रं अनीकं उत् अगात् । जगतः तस्थुषः च आत्मा सूर्यः द्यावापृथिवी अन्तरिक्षं आ अप्रा ।

२ यत्र देवयन्तः युगानि वितन्वते भद्रं प्रति भद्राय, मर्यः योषां न, सूर्यः रोचमानां देवीं उषसं पश्चात् अभि एति ।

३ सूर्यस्य हरितः अश्वाः भद्राः, चित्राः, एतग्वाः,[1] अनुमाद्यासः । नमस्यन्तः दिवः पृष्ठं आ अस्थुः । द्यावापृथिवी सद्यः परियन्ति ।

सूर्याची तीच दिव्य शक्ति, तेंच त्याचें श्रेष्ठत्व होय की ( मनुष्याचें ) काम[4] चाललें असतां त्याने मध्येच आपले ( सर्वत्र ) पसरलेले ( किरणजाल ) काढून घेतले. ( रात्र व सूर्य ह्याचे ) एकत्र निवासाचें स्थान ( जे हे जग ) त्याचेपासून ( गमन करण्याकरितां ) जेव्हां ह्यानें आपले अश्व जोडलेले असतात तेव्हां रात्र आपलें आच्छादन सर्व ( विश्वावर ) पसरते. ४

मित्र आणि वरुण, ह्याचे दृष्टीस आपले रूप पडावें म्हणून सूर्य व स्वर्गलोकाच्या सीमान्त-प्रदेशावर प्रकट करतो. त्याचे अश्व एकेवेळीं त्याचें देदीप्यमान अनन्त तेज[3], तर दुसरेवेळीं त्याची कृष्ण कान्ति ( ह्याचें प्रदर्शन करण्याकरितां त्यास जगासमोर ) आणतात. ५

हे देवहो, आज सूर्योदय झाल्याबरोबर तुम्ही आम्हास पातकापासून व निंदेपासून मुक्त करा. ह्या आमच्या प्रार्थनेस मित्र आणि वरुण, आणि त्याचप्रमाणे अदिति, सिंधु, पृथिवी व द्युलोक ह्याचेही अनुमोदन असो. ६ (७) (११)

## अनुवाक १७.

### सूक्त ११६.

॥ ऋषि-कक्षीवान् । देवता-अश्विन ॥

ज्या सत्यस्वरूप देवांनी बालवयाच्या विमदाकडे त्याच्या पत्नीस सेनाप्रमाणे वेगवान् अशा रथांत घालून आणले त्या ( देवाच्या ) सन्मानार्थ मी जणू काहीं कुशासनच तयार करीत आहे. ( कारण पहा ) ज्याप्रमाणें वायु हा मेघोदकाची प्रेरणा करितो त्याप्रमाणें मीही त्यास ( अनेक ) स्तोत्रें अर्पण करीत आहें. १

ज्याचें उड्डाण अतिशय जोराचें असतें आणि ज्याचा वेग अतिशय तीव्र असतो असे ( तुमचे अश्व ) अथवा देवाचें प्रोत्साहनपर शब्द हेच कायते तुम्हास ( ह्या यज्ञात ) आणीत असतात. ( परतु ) हे सत्यस्वरूप देवानो, तुमचा रासभसुद्धा ( इतका सामर्थ्यवान् आहे की ) स्वत: यम ज्या ठिकाणी ( जातीने ) लढत होता अशा युद्धात त्याने हजारो शत्रूंना जिंकले होतें. २

४ सूर्यस्य तत् देवत्व तत् महित्व कर्तो ' मध्या विततं स जभार यदा सधस्थात् हरितः अयुक्त इत् रात्री सिमस्मै वासः तनुते आत् ।

५ मित्रस्य वरुणस्य अभिचक्षे द्योः उपस्थे तत् रूप सूर्यः कृणुते । अन्यत् हरितः अस्य अनन्त रुशत् पाजः,[3] अन्यत् कृष्ण स भरति ।

६ देवा', अद्य सूर्यस्य उदिता अहस अवद्यात् निः पिपृत ।

१ यौ अर्भगाय विमदाय सेनाजुवा रथेन जायां निऊहथुः, नासत्याभ्यां बर्हिः इव प्र वृञ्जे । वातः भ्रिया व स्तोमान् इयर्मि ।

२ वीळुपत्मभिः आशुहेमभि. वा देवानां जूतिभिः शाशदाना । तत्, नासत्या, यमस्य प्रधने आजा रासभः सहस्र जिगाय ।

हे **अश्विन**हो, ( जसा ) एखादा मृत मनुष्य ( हें ऐहिक ) वैभव सोडून ( देऊन निघून ) जातो त्याप्रमाणें खरोखर त्या **तुग्रानें भुज्यूला** उदकाच्या प्रवाहांत टाकून दिलें होतें. पण अन्तरिक्षांतून उड्डाण करणाऱ्या व उदकाच्या स्पर्शापासून अलिप्त राहणाऱ्या अशा नौकांत बसवून त्यास तुम्ही सुरक्षितपणें घेऊन आलां. ३

हे सत्यस्वरूप देवहो, तीन दिवस व तीन रात्रीं ह्याहूनही ज्यास्त वेळपर्यंत ( एकसारखें ) धांवणाऱ्या व पक्ष्यांप्रमाणें ( चपल अशा अश्वांच्या ) साहाय्यानें तुम्हीं **भुज्यूला** तीन रथांत बसवून—ह्या रथांना शंभर खूर होते व सहा घोडे जोडलेले होते—तुम्हीं त्यास उदकानें भरलेल्या अशा समुद्राच्या पलीकडे कोरड्या जमीनीवर घेऊन गेला. ४

हे **अश्विन**हो, जिला शंभर वल्हीं लागत होती अशा नौकेंत बसलेल्या **भुज्यूला** तुम्हीं त्याच्या घरीं ( सुखरूप ) पोचता केला हा तुमचा समुद्रावरचा मोठाच पराक्रम होय; कारण त्या समुद्राचा आरंभ कोठें झाला, त्याला टेका कशाचा असतो व त्याला ताब्यांत आणावें कसें हे कांहींच समजत नव्हतें. ५ (८)

हे **अश्विन**हो, तुम्हीं, सदोदित समाधान ( उत्पन्न करणारा ) असा जो शुभ्रवर्ण अश्व, **अघाश्वा**ला दिला ते तुमचें श्रेष्ठ दातृत्व ( खरोखर ) वर्णन करण्याजोगें होतें. **पेदूचा** उत्कृष्ट अश्व सन्मान करण्यास सदैव पात्र असा झाला. ६

**पज्रा**च्या कुळांत उत्पन्न झालेल्या **कक्षीवाना**नें तुमची स्तुति केल्यावरोबर तुम्हीं त्याला अतिशय कुशाग्र बुद्धि अर्पण केली आणि भाड्याप्रमाणें' आकार असलेल्या एका सामर्थ्यवान् अश्वाच्या खुरापासून तुम्हीं सुरेचे शंभर कुंभ निर्माण केले. ७

---

३ अश्विना, क. चित् ममृवान् रयिं न तुग्रः ह भुज्युं उदमेघे अव अहाः । अन्तरिक्षप्रुद्भिः अपोदकाभिः नौभिः त ऊहथुः ।

४ नासत्या, तिस्रः क्षपः त्रिः अहा अतिव्रजद्भिः पतगैः, त्रिभिः शतपद्भिः षडश्वैः रथैः, आर्द्रस्य समुद्रस्य पारे धन्वन् ऊहथुः ।

५ अश्विनौ, शतारित्रा नाव आतस्थिवांस भुज्यु यत् अस्त उहथुः तत् अनारंभणे अनास्थाने अग्रभणे समुद्रे अवीरयेथां ।

६ अश्विना, शश्वत् इत् स्वस्ति य श्वेत अश्व अघाश्वाय ददथुः तत् वां महि दात्रं कीर्तेन्य भूत् । पेद्वः शर्यः वाजी सद इत् हव्य. ।

७ नरा, पज्रियाय स्तुवते कक्षीवते युव पुरधिं अरदत । वृष्ण' अश्वस्य कारोतरात्' शफात् सुरायाः शतं कुम्भान् असिचत ।

तुम्हीं थंडोसा उत्पन्न करून तापदायक अग्निचें निवारण केलें आणि त्या ( अत्रीस ) ( उत्तम ) पेयाच्या योगाने तकवा उत्पन्न करणारें असे नवीन बल त्याचे अंगीं उत्पन्न केले. अत्रीला खालीं खळग्यात फेंकून दिले असता तुम्हीं त्याला त्याच्या सर्व माणसासह सुखरूप ठेवून ( त्यांतून ) वर काढलें. ८

हे सत्यस्वरूप अश्विनहो, तुम्ही ती विहीर वर आणली व तिचें तोंड वेडें वांकडें असल्यामुळें तिचा तळ ( फिरवून तो ) पृष्ठभागावर आणला. नंतर गौतमास हजारों प्रकारची संपत्ति देण्याकरिताच की काय, त्याच्या तृषित अनुचराकरिता पाण्याचे ( लोटच्या ) लोट वाहूं लागले. ९

हे सत्यस्वरूप ( अश्विनहो, ) जसें ( एखाद्याच्या अंगावरचे ) चिलखत काढून टाकावें त्याप्रमाणे तुम्हीं वृद्ध च्यवनावरची वार्धक्याची कळा काढून टाकली. त्या ( बिचाऱ्यास ) सर्वांनीं सोडून दिले असता तुम्हीं त्याचे आयुष्य वाढविलें व त्यास तरुण वयाच्या कुमारिकांचा पति केलें. १०(९)

हे सत्यस्वरूप व शूर ( अश्विनहो, ) ती तुमची कृपा ( खरोखर ) प्रशंसनीय, सौख्यप्रद व हितकारक होय कीं जिच्या योगानें तुम्हीं ज्ञानवान् देवांनीं, दृष्टिआड होऊन नाहींसा झालेला धनाचा ठेवाच जणूं काही, वन्दनासाठीं ( शोधून ) बाहेर काढला. ११

हे शूरहो, ज्याप्रमाणे मेघगर्जना पर्जन्यवृष्टि होणार असें प्रसिद्ध करिते त्याप्रमाणें, ( मला वैभवाची ) प्राप्ति व्हावी म्हणून मी तुमच्या शौर्याच्या त्या कृत्याची ( सर्वत्र ) प्रसिद्धि करितो कीं ज्याच्या योगानें अथर्वाच्या वंशातील दध्यंचानें अश्वाचे शिर धारण करून तुमच्चेबरोबर मधुर संभाषण केले. १२

---

८ हिमेन घ्रंस अग्निं अवारयेथां । पितुमतीं ऊर्जं अस्मै अधत्त । अश्विना, ऋबीसे अवनीत अत्रिं सर्वगणं स्वस्ति उत् निन्यथुः ।

९ नासत्या, अवत परा अनुदेथां, जिह्मबार उच्चाबुध्न चक्रथुः । गोतमस्य तृष्यते पायनाय, आप , सहस्राय राये, क्षरन् ।

१० उत नासत्या, जुजुरुष च्यवानात् द्रापि इव वव्रि प्र अमुंचतं । दस्रा, जहितस्य आयुः प्र अतिरत कनीन पति इत् अकृणुत ।

११ नासत्या नरा, तत् वां वरुथ शस्य राध्य अभिष्टिमत् च यत् विद्वांसा दर्शतात् अपगूळ्ह निधि इव वन्दनाय उत् ऊपथु. ।

१२ नरा, तन्यतु. वृष्टि नसनये वा तत् उग्र दस. आविः कृणोमि, यत् आथर्वणः दध्यङ् ह अश्वस्य शीर्ष्णा वा ई मधु उवाच ।

हे सत्यस्वरूप **अश्विनहो,** आपण आपले दीर्घ मार्ग क्रमण करीत असतां ( **वध्रिमतीनें** ) अनेक स्तोत्रें गाऊन कर्तृत्ववान व अनेकांचे पोषण करणारे जे तुम्हीं त्या तुम्हास हवि अर्पण केले. आपणही तीं जणूं कांहीं **वध्रिमती**ची आज्ञाच असें समजून तिचीं स्तोत्रें ऐकिलीं व तिला **हिरण्यहस्त** ( नावाचा ) पुत्र दिला. १३

हे सत्यस्वरूप देवांनो, ती लावीपक्षीण लांडग्याच्या अगदीं मुखाजवळ गेली असतांना तुम्हीं तिला सोडविली व हे अनेक ( भक्ताचें ) पोषण करणाऱ्या ( **अश्विनहो,** ) **कवीनें** तुमची कृपा भाकल्याबरोबर तुम्हीं त्यास पाहण्याचे सामर्थ्य दिलें. १४

एकाद्या पक्ष्याचा ज्याप्रमाणें पंख तुटावा त्याप्रमाणें **खेला**च्या युद्धांत रात्रीचे वेळेस (**विश्पले**चा ) पाय तुटला. पण ( लढाई ) सुरू झाल्याबरोबर तिला ( समरांगणावर वाटेल तेथें ) जातां यावें म्हणून तुम्हीं तिला लगेच लोखंडाचा पाय बसविला. १५(१०)

ऋज्राश्वानें एका लांडगीला ( खाऊ घालण्यासाठीं ) शभर मेंढे कापले असतां त्याच्या पित्यानें त्याला आंधळें केलें. ( परंतु ) ( शत्रूंचा ) संहार करणाऱ्या हे सत्यस्वरूप **वैद्यराजानों,** तुम्हीं त्याला पुन्हा दिसूं लागावें म्हणून, कोणताही अडथळा न येऊं देतां, त्याचे नेत्र ( पुन्हा [illegible] ) करून ठेवले. १६

आपल्या ( चपळ ) अश्वाच्या योगानें ( शर्यत ) जिंकणारी सूर्याची दुहिता, तुमचा रथ हेंच जणूं कांहीं पैजेचें ठिकाण असें समजून, तुमच्या रथावर चढली. सर्व देवतांनीही त्यास अन्तःकरण पूर्वक मान्यता दर्शविली व हे सत्यस्वरूप देवानो, आपण ( अशा रीतीनें ) मोठ्या वैभवानें मंडित दिसूं लागला. १७

---

१३ नासत्या, वां महे यामन पुरंधि करा पुरुभुजा अजोहवीत वध्रिमत्या. तत् शासुः इव श्रुत हिरण्यहस्त, अश्विना, अदत्त ।

१४ नरा नासत्या, वृकस्य आस्नः अभीके वर्तिका युव अमुमुक्त । उतो, पुरुभुजा, युव ह कृपमाण कवि विचक्षे अकृणुत ।

१५ वेः इव पर्ण, खेलस्य आजा, परितक्म्याया चरित्र अच्छेदि । धने हिते सर्तवे आयसीं जङ्घा विश्पलाय प्रति अधत्त ।

१६ शत मेषान वृक्ये चक्षदान त ऋज्राश्व पिता अन्ध चकार । नासत्या दस्रा भिषजौ, विचक्षे अनर्वन् तस्मै अक्षी आ अधत्त ।

१७ अर्वता जयन्ती सूर्यस्य दुहिता वा रथ कार्ष्म इव अतिष्ठत । विश्वे देवा हृद्भि अनु अमन्यन्त । नासत्या, श्रिया स सचेथे ।

ज्यावेळीं, हे **अश्विन**हो, **दिवोदास** आणि **भरद्वाज** ह्यांचे साठीं तुम्हीं त्वरेनें[4] त्यांचे गृहाकडे गेला, त्यावेळीं जो रथ तुमचे बरोबर होता त्यानें पुष्कळ धन आणलें. त्यास एक वृषभ व एक नक्र असे जोडलेले होते. १८

दिवसातून तीन वेळ तुम्हांस हविर्भाग अर्पण करणाऱ्या **जन्हूच्या** वंशजाकडे, हे सत्यस्वरूप देवहो, तुम्हीं जमीन जुमला, मुलेबाळें वगैरे वैभव व ज्यांत उत्तम पराक्रम गाजविण्याची शक्ति आहे असें आयुष्य घेऊन अतिशय सामर्थ्यासह, (दोघेही) एका विचारानें गेलां होतां. १९

हे जरारहित व सत्यस्वरूप देवांनो, **जाहुषा**ला चोहोंकडोन (शत्रूंचा) वेढा पडला असतांना तुम्ही त्यास आक्रमण करण्यास सुलभ अशा रजोलोकांतून रात्रीं घेऊन गेलां. पाषाणाचा भेद करणाऱ्या रथांत बसून तुम्ही पर्वतांतून सुद्धा मार्ग काढला. २० (११)

हे **अश्विन**हो, **वशा**ला हजारों (प्रकारच्या संपत्तीचा) लाभ व्हावा म्हणून तुम्हीं एका दिवसात त्यास युद्ध करण्याची शक्ति आणली. हे सामर्थ्यवान् (देवांनो,) तुम्हीं इन्द्राचें साहाय्य घेऊन **पृथुश्रवा**च्या दुष्ट शत्रूचे हनन केलें. २१

**ऋचत्का**चा पुत्र जो **शर** त्याची तृषा शांत करण्याकरितां तुम्ही खोल विहिरींतून पाणी बाहेर काढलें. थकलेल्या[5] **शयू**करिताही तुम्ही न विणाऱ्या धेनूचे अंगीं भरपूर दूध उत्पन्न केलें. २२

---

१८ अश्विना, यत् दिवोदासाय भरद्वाजाय ह्यन्ता[4] वर्ति. अयात, सचनः रथः रेवत् उवाह । वृषभः च शिंशुमारः च युक्ता ।

१९ अन्हः त्रिः भाग दधतीं जन्हावीं सुक्षत्र स्वपत्य रयिं सुवीर्य आयु आ वहन्ता वाजैः समनसा उप अयात ।

२० अजरयू नासत्या, विश्वतः परिविष्ट जाहुष सुगेभिः रजोभि नक्त ऊहथुः । वि भिन्दुना रथेन पर्वतान् वि अयात ।

२१ अश्विना, सहस्रा सनये एकस्या वस्तोः वश रणाय आवत । वृषणौ, इन्द्रवन्ता पृथुश्रवसः दुच्छुनाः अरातीः निः अहत ।

२२ आर्चत्कस्य शरस्य चित् पातवे नीचात् अवतात् वाः उच्चा चक्रथुः । जसुरये[5] शयवे चित् शचीभिः स्तर्यं गां पिप्यथुः ।

हे सत्यस्वरूप देवांनो, कृष्णाच्या कुलांत उत्पन्न झालेल्या व सरळ वर्तनाच्या ( विश्वकानें ) तुमचें स्तवन करून तुमच्या साहाय्याची याचना केली. त्यामुळें ज्याप्रमाणे हरवलेलें गुरुं आपल्या धन्यास सांपडावें त्याप्रमाणें तुम्ही (त्याचा पुत्र) विष्णापू ह्याची व विश्वकाची भेट करवून विष्णापूस त्याचे स्वाधीन केलें. २३

दहा रात्री व नऊ दिवसपर्यंत अमंगळ रीतीनें पाण्याच्या खालीं बद्ध करून ठेवलेला व त्यामुळें पीडा पावत असलेला आणि सर्वांग चिंब होऊन क्लेश भोगीत असलेला जो रेभ त्याला तुम्हीं, ज्याप्रमाणें (पात्रांतून) सोमरस वर काढून घ्यावा त्याप्रमाणें, (पाण्यांतून) बाहेर काढलें. २४

हे अश्विनहो, मीं तुमचीं महत्कृत्यें येथें वर्णन केलीं आहेत. ह्याकरिता (तुमच्या कृपेनें) मला उत्तम धेनु व शूर मनुष्यें ह्यांची प्राप्ति होऊन मी ह्या ( गृहाचा ) वैभवशाली यजमान होईन. माझी दृष्टि शाबूत राहून आणि मला दीर्घ आयुष्य प्राप्त होऊन, हे अश्विनहो, ज्याप्रमाणें एखादा मनुष्य आपल्या सदनात ( आनंदानें ) प्रवेश करितो त्याप्रमाणें माझा वार्धक्यदशेंत ( आनंदानें ) प्रवेश होवो. २५(१२)

## सूक्त ११७.

॥ ऋषि-कक्षीवान् । देवता-अश्विन ॥

हे अश्विनहो, मधुर सोमरसानें तुम्हांस आनंद व्हावा म्हणून हा (तुमचा) पुरातन सेवक तुमची उपासना करीत आहे. आम्ही आपला हवि पवित्र दर्भावर ठेवला आहे व आमची स्तुतिही तुमचेप्रत जाऊन पोंचली आहे. ह्याकरिता (आम्हांस पुरेल इतके) अन्नसाहित्य व ( अनेक प्रकारचे ) सामर्थ्य बरोबर घेऊन इकडे या. १

हे अश्विनहो, मनापेक्षाही चपळ असा तुमचा रथ सुंदर अश्वांनीं युक्त होऊन सर्व लोकांचेकडे येत आहे. ज्या ( रथांत ) बसून तुम्ही सदाचारी पुरुषाच्या गृहाकडे जात असता त्यात विराजमान होऊन, हे शूरहो, आमचेसाठीं ( आमच्या ) गृहाकडे या. २

---

२३ नासत्या, ऋजूयते अवस्यते स्तुवते कृष्णियाय विश्वकाय शचीभिः, नष्ट पशु न, विष्णाप्व दर्शनाय ददथुः ।

२४ दश रात्रीः नव द्यून् अशिवेन अप्सु अन्तः अवनद्ध श्नथित विप्रुत उदनि प्रवृक्त रेभ स्रुवेण सोम इव उत् निन्यथुः ।

२५ अश्विना, वां दंसांसि प्र अवोच । सुगवः सुवीरः अस्य पतिः स्यां । उत पश्यन् दीर्घं आयुः अश्नुवन् जरिमाण अस्त इव जगम्यां ।

१ अश्विना, मध्वः सोमस्य मदाय प्रत्नः होता वां विवासते । रातिः बर्हिष्मती, गीः विश्रिता; नासत्या इषा वाजैः उप यात ।

२ अश्विना, यः वां मनसः जवीयान् स्वश्वः रथः विशः आजिगाति, येन सुकृतः दुरोण गच्छथः, तेन, नरा, अस्मभ्य वर्तिः यात ।

हे सामर्थ्यवान् वीरांनो, पहिल्याप्रमाणे (आमची) (उत्कर्षाकडे) प्रेरणा करून आणि त्या अभद्र दानवाच्या सर्व दुष्कृत्यांना मोड करून तुम्ही त्या पाचही प्रकारच्या लोकास प्रिय अशा **अत्रि** ऋषीस, त्याच्या सर्व माणसांसहवर्तमान, अतिशय भयंकर गुहेमधून बाहेर काढलें. ३

**रेभ** ऋषि पाण्यांत बुडून जाऊन, दुष्ट (लोकांच्या) कृतीमुळे, एखाद्या घोड्याप्रमाणें जलांत अदृश्य होऊन गेला होता. तरी पण, हे सामर्थ्यवान् वीरानो, तुम्ही अद्भुत कृति करून त्याचा बचाव केला. तुमची कृत्यें कितीही पुरातन असली तरी तीं कधींही जुनी होत नाहीत. ४

(शत्रूचा) संहार करणाऱ्या हे **अश्विनी** देवानो, विनाशाच्या जणु पायथ्याशीं लोंबत पडलेला व तसेच सूर्याप्रमाणें अंधकारात असलेला सुंदर द्रव्यसंचय, सुवर्ण ज्याप्रमाणें (उकरून) बाहेर काढतात त्याप्रमाणे, **वंदना**च्या कल्याणार्थ तुम्ही बाहेर काढला. ५(१३)

हे शूर व सत्यस्वरूप देवांनो, **पज्र**कुळात जन्मलेल्या **कक्षीवाना**कडून स्तुति व्हावी असेंच तें तुमचे कृत्य होते; कारण परिभ्रमण करीत असतां तुम्हीं एका सामर्थ्यवान् अश्वाच्या खुरापासून लोकांचे हित करीत। मधुर रसाचे शंभर घट उत्पन्न केले. ६

हे वीरांनो, **कृष्ण**वंशोत्पन्न **विश्वका**नें तुमचे स्तवन केलें म्हणून तुम्हीं त्यास (त्याचा पुत्र) **विष्णापू** शोधून दिला आणि पित्याच्या घरीं (राहून राहून) वृद्ध होत चाललेल्या **घोषे**लाही हे **अश्विन**हो, तुम्ही (पति पाहून) दिला. ७

---

३ वृषणा नरा, अनुपूर्वं चोदयन्ता, अशिवस्य दस्यो मायाः मिनन्ता पांचजन्यं अत्रिं ऋषिं गणेन अंहसः ऋबीसात् मुंचथ ।

४ वृषणा नरा अश्विना, दुरेवैः अश्वं न अप्सु गूहळ विप्रुतं रेभं ऋषिं दसोभिः रिणीथः वां पूर्व्या कृतानि न जूर्यन्ति ।

५ दस्रा अश्विना, निर्ऋतेः उपस्थे न सुषुप्वांसं, सूर्यं न तमसि क्षियन्तं दर्शतं रुक्मं न वन्दनाय शुभे उत् ऊपथुः ।

६ नरा नासत्या, पज्रियेण कक्षीवता शस्यं तत् वां, परिज्मन्, वाजिनः अश्वस्य शफात् जनाय मधूनां शतं कुम्भान् असिंचतं ।

७ नरा, स्तुवते कृष्णियाय विश्वकाय विष्णाप्वं ददथुः पितृषदे दुरोणे जूर्यन्त्यै घोषायै चित् पतिं अदत्तं ।

हे **अश्विन**हो, तुम्हीं **श्यावाला रुशती** नावाची भार्या दिली आणि **कण्वास गृहसौख्य** अर्पण केलें. हे सामर्थ्यवान् देवानो, ते **तुमचें कृत्य खरोखर वर्णन करण्याजोगें आहे** की तुम्हीं **नृपदा**च्या पुत्रास कान दिले. ८

अनेक प्रकारचीं रूपे धारण करणाऱ्या हे **अश्विन**हो, तुम्हीं **पेदू**करिता असा **अश्व** आणिला की जो सहस्रावधि वैभवें जिंकून आणण्याजोगा होता, ज्याचें सामर्थ्य मोठें होतें, ज्याला कोठेंही जोड मिळण्याजोगी नव्हती, जो सर्पाचा वध करणारा होता, ज्याची कीर्ति फार पसरली होती आणि जो संकटातून बचाव करण्याजोगा होता. ९

हे अत्यंत उदार देवानो, हेच तुमचे कीर्तिमान् पराक्रम होत; द्युलोकात अथवा भूलोकात स्तुतिस्तोत्रें हेंच तुमचें निवासस्थान असतें हे **अश्विन**हो, ज्या अर्थी **पज्र** हे तुमचा धावा करीत आहेत त्या अर्थी विपुल अन्नसामग्री घेऊन इकडे या व ह्या विद्वान् स्तुतिकर्त्याला सामर्थ्य अर्पण करा. १० (१४)

( सर्व विश्वाचें ) पोषण करणाऱ्या व सत्यस्वरूप अशा हे **अश्विनी** देवानो, जेव्हा **माना**नें तुमची पुत्रासारखी स्तुति केली त्या वेळीं त्या विद्वान् उपासकास सामर्थ्य अर्पण करून तुम्हीं **अगस्त्या**नें केलेल्या स्तोत्रानें संतोष मानीत **विश्पले**ला ( तिच्या व्यथेपासून ) बरी केली. ११

हे **अश्विन**हो, हे सामर्थ्यवान् द्युलोकपुत्रानो, **शयू**चें संरक्षण करणारे असे तुम्हीं **काव्याची** सुंदर स्तुति ग्रहण करण्याकरिता ( त्यावेळीं ) कोठें निघाला होता की ( त्यावेळीं ), जसा एखादा सोन्याचा हांडा ( उकरून ) बाहेर काढावा त्याप्रमाणे ( गुप्त ठेवलेलें भांडार ), तुम्हीं दहाव्या दिवशीं बाहेर काढलें ? १२

---

८ अश्विना, युवं श्यावाय रुशतीं अदत्तं । **कण्वाय क्षोणस्य महः । वृषणा तत् वां कृतं प्रवाच्यं यत् नार्षदाय** श्रवः अधि अधत्तं ।

९ पुरु वर्पांसि दधाना अश्विना, पेदवे **आशुं सहस्रसां वाजिनं अप्रतीतं अहिहनं श्रवस्यं तरुत्रं अश्वं** नि ऊहथुः ।

१० सुदानू, एतानि वां श्रवस्या **रोदस्योः ब्रह्म आंगूषं** सदनं अश्विना यत् वां पज्रासः **हवते इषा च** यातं विदुषे च वाजं ।

११ भुरणा नासत्या अश्विना, **मानेन सूनो.** गृणाना विप्राय वाजं रदन्ता, अगस्त्ये ब्रह्मणा **ववृधाना,** विश्पलां सं अरिणीतं ।

१२ अश्विना, दिवः वृषणा नपाता, **शयुत्रा,** काव्यस्य सुष्टुतिं कुह यान्ता हिरण्यस्य **इव कलशं दशमे** अहन् निखातं उत् ऊपथुः ।

हे अश्विनहो, वृद्धावस्था येत चाललेल्या च्यवनास तुम्हीं आपल्या सामर्थ्यानें पुन्हा तरुण केलें. हे सत्यस्वरूप देवानो, सूर्याच्या कन्येनेंही (आपल्या सर्व) वैभवासह आरूढ होण्यासाठीं तुमच्याच रथाची निवड केली. १३

हे तारुण्ययुक्त देवानो, आपल्या प्राचीन पद्धतीस अनुसरून तुम्हांस तुग्रासंबंधानें पुन्हा कळवळा आला. तुम्हीं भुज्यूला, आपल्या पक्ष्यांप्रमाणें (दिसणाऱ्या) चपळ[1] अश्वांचे साहाय्यानें, मोठमोठ्या लाटा चालत असताही समुद्रांतून बाहेर काढिलें. १४

हे अश्विनहो, तुग्राच्या पुत्रानें तुमचें पूजन केलें. त्यास समुद्रावर (कामगिरीवर) पाठविले असता तो (बिलकुल) न घाबरता गेला. हे सामर्थ्यवान् देवानो, उत्तम रीतीनें सिद्ध केलेल्या व मनाप्रमाणे वेगवान् असलेल्या अशा आपल्या रथात घालून तुम्हीं त्यास सुखरूप बाहेर काढिलें. १५ (१५)

हे अश्विनहो, ज्या वेळीं तुम्हीं लावी पक्षिणीला लांडग्याच्या मुखांतून सोडविली त्या वेळीं तिने तुमचें पूजन केलें. तुम्हीं आपल्या विजयी (रथात) बसून पर्वताच्या शिखराचा भेद करून गेला आणि विष्णापूच्या पुत्रास विष वालून मारून टाकलें. १६

(ऋज्राश्वाने) लांडगीला (खाऊ) घालण्यासाठीं (तिला) शंभर मेंढे आणून दिल्यामुळें त्याच्या दुष्ट बापानें त्यास आंधळें केलें असता (तुम्हीं त्यावर अनुग्रह करून) त्यास डोळे दिले आणि त्या बिचाऱ्यास दृष्टि यावी म्हणून (त्याच्या नेत्रात) तुम्हीं प्रकाश उत्पन्न केला. १७

---

१३ अश्विना, जरन्तं च्यवानं युव शचीभिः पुनः युवानं चक्रथु. । नासत्या, सुर्यस्य दुहिता श्रिया सह युवोः रथं अवृणीत ।

१४ युवाना, पूर्व्येभिः एवैः युव तुग्राय पुनर्मन्यौ अभवत । निभि ऋज्रेभि[1] अश्वैः अर्णसः समुद्रात् भुज्यु नि ऊहथुः ।

१५ अश्विना, तौग्र्यः वां अजोहवीत समुद्र प्रऊळ्हः अव्यथि. जगन्वान । रुपणा. सुयुजा मनोजवसा रथेन तं स्वस्ति निः ऊहथुः ।

१६ अश्विवा, यत् वृकस्य आस्नः र्भ अमुचत वर्तिका वां अजोहवीत । जयुषा अद्रे सानु वि ययथु । विश्वाचः जात विषेण अहत ।

१७ अश्विनौ, वृक्ये शत मेषान् चक्षाण अशिवेन पित्रा तम' प्रणीत ऋज्राश्वे अक्षी आ अधत्त । अन्धाय विचक्षे ज्योतिः चक्रथु ।

त्या काळी ... या अन्ध ( ऋज्राश्वा ) साठी अतिशय ( कळवळ्याने[२] ) प्रार्थना केली— "हे अश्विनहो, हे सामर्थ्यवान् देवानो, हे वीरहो, ऋज्राश्वाने ( माझेकरिता ), एखाद्या तारुण्याच्या ( ... आलेल्या ) वल्लभाप्रमाणे, एकशे एक मेंढे मला कापून खावयाला घातले. १८

हे अश्विनहो, ( भक्तजन ) संरक्षक असे तुमचे सामर्थ्य विशाल व सौख्यप्रद आहे. हे धैर्यशाली देवानो, तुम्ही पण[३] मनुष्यासमुद्धा पुन्हा ... करिता; ह्याच कारणाकरिता पुरंधीनेसुद्धा तुम्हालाच आमंत्रण केले. हे सुगानो, तुम्ही आपल्या सामर्थ्यासह तिचे रक्षणार्थ तिकडे गेलां. १९

शत्रूंचा संहार करणाऱ्या हे अश्विनी देवानो, तुम्ही शयूकरिता, कधी दूध[४] न देणाऱ्या, कधीं न विणाऱ्या व अतिशय कृश झालेल्या गाईचे अंगी भरपूर दूध आणले. तुम्ही आपल्या सामर्थ्याने पुरुमित्राची कन्या विमदास ... ( करून ) दिली. २० (१६)

( शत्रूंचा ) संहार करणाऱ्या हे अश्विनहो, नांगराच्या योगाने धान्य पेरीत, मानवाच्याकरिता अन्नसामग्री निर्माण करीत, आणि ( आपल्या ) वज्राच्या योगाने दुष्टांचे निर्दालन करीत, तुम्ही भक्तिमान् लोकांकरिता विपुल प्रकाश उत्पन्न केला. २१

हे अश्विनहो, अथर्वाचा पुत्र जो दध्यञ्च् त्यास तुम्ही अश्वाचे शिर लावले. ( नंतर ) त्या सत्य वर्तनाच्या पुरुषाने तुम्हास असे एक मधुर ( गुह्य ) सांगितले की जे केवळ त्वष्टादेवास विदित होते व जे तुम्हास ( मोठे ) रहस्य असे वाटले. २२

---

१८ सा वृकीः अन्धाय शुनं भरं अह्वयत्—"अश्विना, वृषणा, नरा, कनीनः इव जारः ऋज्राश्वः शतं एकं च मेषान् चक्षदानः" ।

१९ अश्विना, वां ऊतिः महीं मयोभू, उत, धिष्ण्या, स्नामं स रिणीथ. अध युवां इत् पुरंधिः युवां इत् अह्वयत् वृषणौ अर्वाचि ... गी अगच्छत ।

२० दस्रा अश्विना, शयवे अधेनुं, ... स्तर्यं, विषक्तां गां अपिन्वतं । युवं शचीभिः पुरुमित्रस्य योषां विमदाय जाया नि ऊहथुः ।

२१ दस्रा अश्विना, युवं वृकेण यवं वपन्ता, मनुषाय इषं दुहन्ता, बकुरेण दस्युं अभि धमन्ता आर्याय उरु ज्योतिः चक्रथुः ।

२२ दस्रा अश्विना, आथर्वणाय दधीचे अश्व्यं शिरः प्रति ऐरयतं । यत् वां अपिकक्ष्यं यत् त्वाष्ट्रं, ऋतवन् सः वां मधु प्र वोचत् ।

हे विज्ञानशाली देवांनो, तुमच्या कृपेचीच मी नेहमीं याचना करितों. हे अश्विनहो, माझ्या सर्व स्तुतींचें (प्रेमानें) ग्रहण करा. हे सत्यस्वरूप देवांनो, आम्हास अपत्यसहित व कीर्तियुक्त असें विपुल वैभव अर्पण करा. २३

हे उदार व शूर अश्विनहो, तुम्हीं वध्रिमतीला हिरण्यहस्त (नावाचा) पुत्र दिला. हे अत्यंत दातृत्वशील अश्विनीदेवांनो, श्यावाचें शरीर तीन ठिकाणी विच्छिन्न झालें असता तुम्हीं त्यास पुन्हा चैतन्यदशेकडे घेऊन गेला. २४

हे अश्विनहो, हीं तुमचीं पुरातन महत्कृत्यें (अनेक) मनुष्यांनीं वर्णन केलेलीं आहेत. हे सामर्थ्यवान् देवांनो, तुमचे स्तोत्र गात आम्हीं आपल्या कुलांतील वीर पुरुषांसह (आमच्या) यज्ञाची कीर्ति वाढवूं. २५ (१७)

## सूक्त ११८.

॥ ऋषि-कक्षीवान् । देवता-अश्विन ॥

हे बलशाली अश्विनहो, जो मानवाच्या मनापेक्षांसुद्धा चपळ आहे, ज्यास तीन वन्धुरा आहेत, व ज्याचा वेग वाऱ्याप्रमाणें आहे असा तुमचा स्वकीय तेजानें शोभणारा व सुखावह रथ, त्यास जोडलेल्या श्येनपक्ष्यांच्या योगानें उड्डाण करीत, इकडे येवो. १

हे अश्विनहो, तीन वन्धुरांनीं युक्त, त्रिकोणाकृति, व तीन चाकें असलेल्या अशा आपल्या सुंदर रथांत बसून इकडे या. (आमच्या) गाईंच्या अंगीं भरपूर (दूध) उत्पन्न करा आणि (आमच्या) अश्वांस चपलता आणा. आमच्याकरितां आमच्या (कुलांतील) वीर पुरुषांची भरभराट करा. २

---

२३ कवी सदा वां सुमति आ चके अश्विना, मे विश्वाः धियः प्र अवत । नासत्या, बृहन्त अपत्यसाच श्रुत्यं रयिं अस्मे ररथा ।

२४ सुदानू नरा अश्विना, रराणा वध्रिमत्या हिरण्यहस्तं पुत्रं अदत्त । अश्विना, त्रिधा ह विकस्तं श्यावं जीवसे उत् ऐरयत ।

२५ अश्विना, एतानि वां पूर्व्याणि वीर्याणि आयवः अवोचन् । वृषणा, युवभ्यां ब्रह्म कृण्वन्तः सुवीरासः विदथं आ वदेम ।

१ वृषणा अश्विना, यः वां रथः मर्त्यस्य मनसः जवीयान्, त्रिवन्धुरः, वातरंहाः, स्ववान्, सुमृळीकः, श्येनपत्वा अर्वाक् यातु ।

२ अश्विना, त्रिवन्धुरेण, त्रिवृता, त्रिचक्रेण सुवृता रथेन अर्वाक् आ यात । नः गाः पिन्वतं, अर्वतः जिन्वत, अस्मे वीरं वर्धयत ।

( शत्रूंचा ) संहार करणाऱ्या हे देवानो, आपल्या सरळ[3] गतीच्या सुंदर रथांत आरूढ होऊन सोमपाषाणाचा ( हा सुंदर ) ध्वनि श्रवण करा. हे अश्विनहो, प्राचीन विद्वान् लोक आपणास "क्लेशहरणार्थ सत्वर गमन करणारे" असे का म्हणत होते बरे? ३

हे अश्विनहो, तुमच्या रथास जोडलेले, व उड्डाण करण्यात प्रवीण असलेले असे तुमचे चपल श्येनपक्षी तुम्हास ( इकडे ) घेऊन येवोत. हे सत्यस्वरूप देवानो, द्युलोकांतील गृध्राप्रमाणे ते ( आमचे ) परिपालन करणारे आहेत आणि ( आमचेसाठी ) ते ( आमच्या ) उपजीविकेची सामग्री घेऊन येत असतात. ४

हे शूरहो, ती प्रेमळ[4] युवति—सूर्याची कन्या—येथे तुमच्या रथावर आरूढ होत आहे. तुमचे सुंदर[5] अश्व—ते तुमचे उड्डाण करणारे देदीप्यमान पक्षी—तुम्हास इकडे घेऊन येवोत. ५ (१८)

( शत्रूंचा ) संहार करणाऱ्या हे सामर्थ्यवान् देवानो, तुम्ही आपल्या अद्भुत कृतींनी वन्दनास वर आणले व आपल्या सामर्थ्याने रेभाला वरती उचलून काढले. तुम्ही तुग्राच्या पुत्रास समुद्रातून पलीकडे घेऊन गेला व च्यवनास फिरून तरुण केले. ६

हे अश्विनहो, खाली तप्त स्थली नेलेल्या अत्रीस तुम्ही सामर्थ्य व साह्य अर्पण केले. आंधळा[6] बनलेल्या अत्रीची सुंदर स्तुति ग्रहण करून तुम्ही त्यास डोळे दिले. ७

---

३ दस्रा अश्विना, प्रवद्यामना सुवृता रथेन अद्रे इम श्लोक शृणुत । पुराजा. विप्रास. वां अवर्ति प्रति गमिष्ठा. किं अग आहुः ?

४ नासत्या अश्विना, दिव्यास. गृध्रा. न ये आतुर प्रय अभि वहन्ति, रथे युक्तासः पतङ्गा आशव श्येनास वा आवहन्तु ।

५ नरा, जुष्टां युवति सूर्यस्य दुहिता अत्र वा रथ आ तिष्ठत । वां वपुष अश्वा, अरुषा. पतगाः वय, वा अभीके परि वहन्तु ।

६ दस्रा वृषणा, दसनाभि वन्दन उत् ऐरयत, शचीभि ( रेभ ) सौम्यं समुद्रात् निः पारयथ, च्यवान पुनः युवान चक्रथु ।

७ अश्विनौ, तप्त अवनीताय अत्रये ऊर्ज ओमान धत्तं अथ स्तुति जुजुषाणा अपिरिप्ताय कण्वाय युव चक्षुः प्रति अधत्तं ।

हे **अश्विन**हो, त्या पूर्वकालीन **शयूनें** तुमची प्रार्थना[1] केल्याबरोबर तुम्ही (त्याच्या) धेनूचे अंगी भरपूर (दूध) आणलें. तुम्ही **लावी** पक्षिणीस संकटांतून सोडविलें आणि **विश्पले**च्या (पुन्हा) पाय (आणून) बसविला. ८

**हे अश्विन**हो, तुम्ही **पेदू**ला एक **अश्व** दिला की ज्याचा रंग पांढरा होता, ज्यास इन्द्र हांकीत **असे**, जो सर्पांचा वध करण्यास समर्थ होता, सदाचारी लोक **दृष्टीस** पडताच जो (शत्रूचा[1]) पराभव करणारा होता, जो उग्र दिसत **असे**, जो हजारो प्रकारची संपत्ति जिंकून आणीत असे, जो सामर्थ्यवान् होता व ज्याचें शरीरबळ फार फार मोठें होतें. ९

**उच्च** (वंशात) जन्म घेणाऱ्या **हे शूर अश्विन**हो, तुमची प्रार्थना करून **आम्ही** तुम्हास आमचे **संरक्षणार्थ** बोलावीत **आहोंत. आमच्या स्तोत्राचा स्वीकार करून** व **आपल्या** संपत्तीनें भरलेल्या **रथांत** (विराजमान **होऊन**) (**आमचे**) **कल्याणार्थ तुम्ही इकडे** या. १०

हे सत्यस्वरूप देवहो, **आपल्या श्येनास नूतन वेग देऊन** तुम्ही दोघे एक विचारानें **इकडे** या. हे **अश्विन**हो ह्या सनातन **उषेचा प्रकाश दिसूं** लागल्याबरोबर मी तुम्हास हवि **अर्पण** करून तुमचें पूजन **करितों.** ११ (१९)

---

८ अश्विना, नाधिताय[1] **पूर्व्याय शयवे युवं धेनुं अपिन्वतं । वर्तिकां अंहसः निः अमुंचतं, विश्पलायाः** जंघां प्रति **अधत्तं** ।

९ अश्विना, युवं पेदवे श्वेतं, इन्द्रजूतं, **अहिहनं, अर्यः ओहुत्रं,**[1] **अभिभूतिं, उग्रं, सहस्रसां, वृषणं,** वीड्वंगं **अश्वं** अदत्त ।

१० **सुजाता** नरा अश्विना, **नाधमानाः ता वां अवसे सु हवामहे । नः गिरः जुजुषाणा वसुमता रथेन** सुविताय उप आ **यातं** ।

११ नासत्या अश्विना, श्येनस्य जूतेन जवसा सजोषाः अस्मे आ यातं । **शश्वत्तमायाः उषसः** व्युष्टौ **हतहव्यः वां हवे हि** ।

## सूक्त ११९.

ऋषि–कक्षीवान् । देवता–अश्विन ॥

आमचें आयुष्य वाढावें म्हणून (ह्या) हवीकडे मी तुमच्या रथास पाचारण करितों. ह्या रथावर नाना[1] प्रकारच्या योजना केलेल्या आहेत, त्याचा वेग मनाएवढा आहे, त्याचे अश्व चपल आहेत, तो यजनार्ह आहे, त्याच्यावर हजारों निशाणें फडकत आहेत, तो (उत्तम) लाकडाचा[2] केलेला आहे, त्याच्यावर शेकडों प्रकारचें धन भरलेले आहे, त्याची प्रसिद्धि सर्वत्र झालेली आहे व त्याचेपासून (भक्ताचे) उत्तम रीतीने संरक्षण होते. १

हा (तुमचा) रथ चालू लागल्याबरोबर माझी मति खडबडून जागी झाली, (एवढेंच काय) पण तुमचें स्तवन[3] करण्याकरिता (जणु काही) दाही दिशा एकत्र झाल्या आहेत. माझा ऊनऊन[4] हविही मी (जितका होईल तितका) मधुर करीत आहें. (भक्तजन) संरक्षक अशी तुमचीं सामर्थ्यें (माझेकडे) येऊ लागलीं आहेत, व हे **अश्विन**हो, **ऊर्जानी** तुमच्या रथावर आरूढ झाली आहे. २

ज्या वेळीं विजयेच्छु,[5] असे अगणित महान्[6] (योद्धे), आपणांस जयश्री प्राप्त व्हावी म्हणून, ईर्ष्येनें एकमेकाशीं रणांगणात भिडलेले असतात, त्या वेळीं तुमचा रथ (वरून) उतरत[7] येत असता दृष्टीस पडतो व त्या वेळीं, हे **अश्विन**हो, तुम्ही आपल्या चतुर (भक्तास) उत्कृष्ट वैभव अर्पण करिता. ३

पक्ष्यांप्रमाणें (चपल) अशा आपल्या (अश्वांवर) आरूढ होऊन तुम्ही बुडत[8] असलेल्या भुज्यूकडे गेला व त्याच (अश्वाच्या योगानें)— कीं जे रथास स्वतःच नियुक्त होतात— तुम्हीं त्यास आपल्या मातापितराकडे पोंचविलें. हे सामर्थ्यवान् देवानो, त्या (भुज्यूचें) सदन (फार) दूर[9] होतें तरी तेथपर्यंत तुम्हीं गमन केलें. **दिवोदासाचें** तुम्ही किती उत्कृष्ट (तऱ्हेनें) संरक्षण केलें हें तर सर्व प्रसिद्धच आहे. ४

---

१ जीवसे वां पुरुमायं, मनोजुवं, जीराश्वं, यज्ञियं, सहस्रकेतुं, वनिनं, शतद्वसु, श्रुष्टीवान, वरिवोधां रथं प्रयः अभि आ हुवे ।

२ अस्य प्रयामनि धीतिः ऊर्ध्वा प्रति अधायि; शस्मन् दिशः सं आ अयन्ते । घर्मं स्वदामि ऊतयः प्रति यन्ति । अश्विना, ऊर्जानी वां रथं आ अरुहत् ।

३ यत् जायवः अमिताः मखाः शुभे मिथः पस्पृधानासः रणे सं अग्मत, अह युवोः रथः प्रवणे चेकिते, यत्, अश्विना, सूरिं वरं आ वहथः ।

४ विभिः युवं भुरमाणं भुज्युं गतं, स्वयुक्तिभिः पितृभ्यः आ निवहन्ता । वृषणा, विजेन्यं वर्तिः आ यासिष्टं; दिवोदासाय वां महि अवः चेति ।

हे **अश्विनहो**, जो तुमचा रथ तुम्ही स्वतः मौजेने[१०] जोडला होता त्यास केवळ तुमचा हुकूमच त्याच्या सीमेपर्यंत घेऊन गेला. तुम्ही पति व्हावे अशी इच्छा करणारी जी सुंदर **युवति** तुमच्याकडे तुमच्याशी मित्रत्व जोडण्याकरिता आली होती तिने ( शेवटी ) तुम्हांसच पति म्हणून पसत केले. ५(२०)

तुम्ही **रेभाचे** संकटापासून[११] सरक्षण केले आणि तुम्ही थंडी उत्पन्न करून **अत्रीचा** तप्त दाह शान्त केला. तुम्ही **शयूच्या** धेनूचे अंगी कसदार असे दूध उत्पन्न केले व **वन्दनास** तुमचेकडून दीर्घ आयुष्याचा लाभ झाला. ६

( शत्रूचा ) सहार करणाऱ्या हे कर्तृत्वशाली[१२] देवांनो, ( एखाद्या जुन्या ) गाडीची दुरुस्ती करावी त्याप्रमाणे जरेने जर्जर[१३] झालेल्या **वन्दनास** तुम्ही पुन्हा ( तारुण्याचा ) तजेला दिला. तुम्ही स्तुतींनी सतुष्ट होऊन त्या विद्वान् उपासकास जर्मानीतून जिवत उत्पन्न केले. तुमची येथ ( स्तुति ) करणाऱ्या ह्या भक्ताकरिताही आश्चर्यकारक कृत्ये घडोत. ७

पित्याने टाकल्यामुळे कष्ट भोगीत असलेल्या व ( म्हणून ) दूरच्या प्रदेशात तुमची करुणा भाकणाऱ्या ( **भुज्यूकरिता** ) तुम्ही ( धावत ) गेला. जेव्हा तुम्ही ( त्याचे ) समीप होतां तेव्हा तुमचे ( भक्त ) सरक्षक सामर्थ्य फार उज्ज्वल व तुमचे साहाय्य मोठे आश्चर्यकारक दिसले. ८

त्या मधुमक्षिकेने तुमची फार मधुर स्तोत्रांनी स्तुति केली आणि सोमपान करून तुम्ही संतुष्ट व्हावे म्हणून **उशिजाचा** पुत्रही तुम्हास पाचारण करीत आहे. तुम्ही **दध्यचाचेही** मन संतुष्ट करीत आहा. अश्वाच्या शिराने तुमच्याशी संभाषण केले होते. ९

---

५ अश्विना, वपुषे[१०] युवायुज युवोः रथं वाणी अस्य शर्ध्य यमतु । वां पतित्व सख्याय आ जग्मुषी जेन्या योषा युवां पती अवृणीत ।

६ युव रेभं परिषूतेः[११] उरुष्यथः, अत्रये हिमेन परितम घर्म । युव शयो. गांव अवस पिन्वथुः, वन्दनः दीर्घेण आयुषा प्र तारि ।

७ दस्रा करणा[१२], रथ न जरण्यया निर्ऋत[१३] वन्दन युव स इन्वथः । विपन्यया विप्र क्षेत्रात् आ जनथ । वां अत्र विधते दसना प्र भुवन् ।

८ स्वस्य पितु त्यजना निबाधित परावति इयमाण अगच्छत । अभीके युवो ऊती इतः स्वर्वतीः अह अभिष्टय चित्रा अभवन् ।

९, उतस्या भक्षिका वां मधुमत अरपत्, सोमस्य मदे औशिज हुवन्यति । युव दधीचः मन. आ विवासथः अथ अश्व्य शिरः वां प्रति वदत् ।

हे अश्विनहो, तुम्हीं पेदूला जो पांढरा अश्व दिला, तो सर्वांस हवासा वाटण्याजोगा, शत्रूचा[14] पराभव करण्याजोगा, तेजस्वी, युद्धांत शत्रूस अजिंक्य, (सर्वत्र) वाहवा[15] होण्याजोगा व इन्द्राप्रमाणें (सर्व) मानवास भारी असा होता. १०(२१)

## सूक्त १२०.

॥ ऋषि–कक्षीवान् । देवता–अश्विन ॥

हे **अश्विन**हो, तुम्हास कोणता यज्ञ संतोष देतो? तुम्हा दोघाचा आनंद कशात आहे? अज्ञानी मनुष्य (तुमच्या कृपेवाचून) कसें करील? १

अविद्वान असो की अज्ञानी असो कोणी अन्य मनुष्य असो, त्यानें विद्वान् अशा (**अश्वि**नी देवानाच) मार्ग विचारावा. कारण खरोखर मर्त्य (मानवा) संबंधाने अमुक एक गोष्ट त्यांना करिता येणार नाहीं असें आहे काय? २

ते (असे जे) तुम्ही दोघे विद्वान् देव त्याचा आम्ही धावा करीत आहोत. तुम्ही दोघे विद्वान् देव आम्हास (खचित) एखादे (सुंदर) स्तोत्र सुचवाल. ह्या तुमच्या प्रिय (भक्तानें) तुम्हास हवि अर्पण करीत तुमचें पूजन केलेलें आहे. ३

(शत्रूचा) संहार करणाऱ्या हे (**अश्विन**हो), 'वषट्' असा शब्दोच्चार करून अर्पण केलेला जो अद्भुत (हवि) त्याचेविषयीं जणूं काहीं लडिवाळपणानेंच[1] मी देवांना विचारीत आहे. तुम्ही आमचें बलिष्ठ व हल्ला करणाऱ्या शत्रूपासून संरक्षण करा. ४

---

१० अश्विना, युव पेदवे पुरुवारं, स्पृधां[14] तरुतारं, अभिद्युं, शर्यैः पृतनासु दुस्तरं, चर्कृत्यं[15], इन्द्रं इव चर्षणीसह श्वेतं दुवस्यथः ।

१ अश्विना, वां का होत्रा राधत्? वा उभयोः जोषे कः? अप्रचेताः कथा विधाति? ।

२ अविद्वान् अचेताः इत्था अपरं विद्वांसौ इत् दुरः पृच्छेत् । मर्तं अक्रौ नु चित् नु? ।

३ ता वां विद्वांसा हवामहे । ता विद्वांसा नः मन्म वोचेतं । युवाकुः दयमानः प्र आर्चत् ।

४ दस्रा, वषट्कृतस्य अद्भुतस्य पाक्या[1] न देवान् वि पृच्छामि । युवं सह्यसः च रभ्यसः च नः पातं ।

भृगूप्रमाणें ( तुमची भक्ति करणाऱ्या ) घोषाचे मुखात जी स्तुति अणू अतिशय शोभा पावत आहे, व जिच्यायोगानें पज्राचा पुत्र विद्वान् इषयूप्रमाणे तुमचे अर्चन करीत असतो, ( वी तुम्हांस प्रिय होवो. ) ५ (२२)

( तुमचं स्तवन करण्याकरिता ) अतिशय त्वरा[1] करणाऱ्या भक्ताचे स्तोत्र श्रवण करा. ज्यानें तुमचें स्तवन केले तो, हे अश्विनहो, मीच होय. हे मागल्याचे अधिकारी हो, तुम्ही ( इकडे ) दृष्टि द्या. ६

त्या अर्थी विपुल ( संपत्ति ) देणारे तुम्ही व ती नेणारे ही तुम्हीच होता, या अर्थी, हे वैभवस्वरूप देवानो, तुम्ही आमचे उत्तम संरक्षणकर्ते व्हा व दुष्ट लांडग्यापासून आमचे संरक्षण करा. ७

जो आमचा मित्र नाही अशा कोणत्याही मनुष्याशीं आमची गाठ घालू नका आणि आमच्या (घरच्या) दूध देणाऱ्या गाईंना कोठेही त्यांच्या वासरास[3] सोडून घरापासून लांब जाऊं देऊं नका. ८

तुमच्यावर प्रेम असल्यामुळेच ह्या ( भक्तजनानी ) तुमचे मित्रत्व संपादन करण्याकरिता गाईचे दोहन केले आहे. ह्यासाठीं सामर्थ्यपरिपूर्ण असे वैभव व धेनूनीं परिपूर्ण अशी धान्य-समृद्धि आम्हास द्यावयासाठीं काढा. ९

---

५ भृगवाणे घोषे या प्र शोभे न, यया पज्रियः विद्वान् इषयुः न वा यजति ।

६ तकवानस्य[1] गायत्र श्रुत । अश्विना, भद्र चित् वां रिरेभ हि शुभस्पती, अक्षी आ दन् ।

७ यत् महः रन् युव हि आस्त युव वा निरततसत, वसू, ता नः सुगोपा स्यात, न. अघयोः वृकात् पान.

८ कस्मै अमित्रिणे नः मा अभि धात, न. स्तनभुज. धेनव. अशिश्वीः गृहेभ्यः अकुत्र मा गुः ।

९ युवाकु मित्रधितये दुहीयन् । वाजवत्यै राये च नः मिमीत, धेनुमत्यै इषे च नः मिमीतं ।

सामर्थ्यसमृद्ध अशा अश्विनीदेवाचा अश्वावांचून चालणारा रथ मला प्राप्त[४] झाला आहे व त्याचे योगाने मी अतिशय आनंदात[५] आहें. १०

हा सुखकारक रथ ह्या लोकाच्या मागोमाग जाऊन जेथें सोमरस (तयार करून) ठेवला आहे तेथें मला नेहमीं[६] मंदगतीनें घेऊन जावो. ११

निद्रा, आणि, श्रीमंती असून तिचा उपभोग न घेणारा पुरुष, ह्या दोहोंचाही त्या (रथास) फार तिटकारा आहे. दोन्ही लवकर[७] नाशाप्रत जातात. १२ (२३) (१७)

## अनुवाक १८.

### सूक्त १२१.

॥ ऋषि-कक्षीवान् । देवता-विश्वेदेव,-इन्द्र ॥

मानवाचें पालन[१] करणारा (तो इन्द्र) ह्याप्रमाणें सत्वर (इकडे) येऊन भक्तिशील अंगिरसांची स्तुति केव्हा ऐकेल बरें? जेव्हा तो सदनांत (राहणाऱ्या) मानवांकडे येतो तेव्हा तो यज्ञार्ह देव यज्ञाकडे मोठ्या प्रौढतेनें पावले टाकीत जातो. १

त्याने द्युलोकाची स्थापना केली. त्या कुशल[२] वीराने (मानवाना) सामर्थ्याची प्राप्ति व्हावी म्हणून धेनूंच्या (कामनेनें) (सर्वास) पुष्टिकारक अशा उत्कृष्ट द्रव्याची वृष्टि केली. त्या महान (इन्द्राने) आपण निर्माण केलेल्या (प्राणि) समुदायाचे[३]— अश्वाच्या मादीचें व वासराच्या आईचें— अवलोकन केलें. २

---

१० वाजिनीवतोः अश्विनोः अनश्वं रथं असन[४]। तेन अहं भूरि चाकन[५]।

११ अयं समहः रथः जनान् अनु सोमपेयं मा समह[६] तनु ऊह्याते।

१२ अध, स्वप्नस्य अभुजत रेवतः च निः विदे। उभा ता बस्रि[७] नश्यतः।

१ नृन् पात्र[१] इत्था तुरण्यन् देवयतां अंगिरसां गिरः कत् श्रवत्? यत् हर्म्यस्य विशः प्र आ यत्, यजत्रः अध्वरे उरु क्रमते।

२ सः द्यां स्तभीत हि। ऋभुः[२] नरः वाजाय गोः धरुण द्रविणं प्रुषायत्। महिषः स्वजां त्रां[३], अश्वस्य मेनां गोः मातरं, अनु परि चक्षत।

ताम्रवर्ण उषाचे अगोदर सत्वर प्रकाशून[४] त्याने प्रतिदिवशीं अंगिरस् कुलांतील मनुष्यांच्या पूजेचा स्वीकार केला आहे. जे वज्र तो (स्वहस्तात) वागवितो ते त्यानेंच तयार केलें व मानवास उपयुक्त असे जे चतुष्पाद व द्विपाद प्राणी त्याचेसाठी त्यानेच द्युलोकाची स्थापना केली. ३

सोमरसाच्या आनंदात असताना तूं प्रतिबंधात पडलेल्या गाईंचा देदीप्यमान समूह सत्कृत्ये नीट चालण्याकरिता (पुन्हा) आणून दिलास. ज्या वेळीं तिप्पट[५] विशाळ रूप धारण करणाऱ्या ह्या इन्द्राने (पुन्हा) युद्धाकडे[६] मोर्चा फिरविला त्या वेळीं मानवजातीच्या शत्रूंचे (गृहांचे) दरवाजे त्याने फोडून टाकले. ४

ज्या वेळीं अमृताचा पान्हा देणाऱ्या गाईंचे दूध (अर्पण करून) तुझ्या मातापितरांनी तुला तेजस्वी पेय[७] दिलें त्या वेळीं. तुझ्या पोषणाची सत्वर तजवीज करणाऱ्या त्या तुझ्या आईबापांकडून तुला जे सामर्थ्यवर्धक[८] व आल्हाद देणारे दुग्ध मिळालें तें केवळ तुझेचसाठी होतें. ५(२४)

(हा पहा) प्रादुर्भूत झाला. तो वेगवान् देव प्रमुदित होवो उषेनंतर हा सूर्याप्रमाणे प्रकाशित झाला आहे. ह्या (विप्रांनी मिळून) स्तोत्रें[९] व ऊनऊन हवि[१०] ह्याचेसह यज्ञगृहात यज्ञचमसातून खालीं सांडतील इतके सोमरसाचे बिन्दु (स्वतःस) अर्पण करावयास लाविले आहेत. ६

सूर्याच्या यज्ञात हृपभाग बद्ध करून ठेवणारी व सुंदर इंधन घातलेली काष्ठाची[११] रास जेव्हा (प्रदीप्त होण्यास) सिद्ध होते व जेव्हा (सर्व) दिवसाची कामे सुरळीत चालावी म्हणून तू आपला प्रकाश पाडतोस, त्या वेळी रथात आरूढ[१२] होणाऱ्या, पशूस शोधणाऱ्या व (आपल्या कामाकडे) त्वरेने निघणाऱ्या (प्रत्येक) मनुष्याचे (काम होते). ७

---

३ अरणी: पर्वा तुर: रादे अनु ग्रन अङ्गिरसां विशा हव नक्षत् । नियुत वज्र तक्षत्, नर्याय द्विपदे चतुष्पदे द्यां तस्तभत ।

४ अस्य मदे अपिव्रत उस्रियाणां स्वयं अनीक ऋताय दा: यत ह त्रिककुप् प्रसर्गे निवर्तत् मानुषस्य द्रुहः दुर अप व: ।

५ यत सबर्दुघाया: उस्रियाया: पय: (पितरौ) ते शुचि रेक्ण: अयजन्त, तुरणे भुरण्यू पितरौ यत् राध: सुरेत: पय: अनीता, तुभ्य ।

६ अध प्र जज्ञे । तरणि: ममत्तु । अस्या: उपस: सूर: न प्र रोचि, येभि: जरणा स्वेदहव्यै: धाम अभि सुवेण सिचत इन्दु: आष्ट ।

७ सूर. अध्वरे गो. रोधना स्विध्मा वनधिति: यत् अध्वरे अपस्यात, यत् ह कत्व्यान् अनु द्यून् प्रभासि, अभिविशे, पश्विषे, तुराय ।

देदीप्यमान असा जो झरा त्याचे प्राप्त्यर्थ युद्ध करीत असता तूं विशाल द्युलोकांतून आठ घोडे घेऊन आलास, आणि त्या वेळी तुला आनंद होण्याकरिता, कढविलेला,[13] दुग्धामुळे ज्यास्ती तीव्र बनलेला, व तुला हर्ष उत्पन्न करणारा असा पिवळा धमक सोमरस (तुझ्या भक्तांनी) (हातात) यज्ञपाषाण घेऊन तयार केला. ८

अनेक भक्तांनीं पाचारण केलेल्या हे (**इन्द्रा**), ज्या वेळीं **कुत्सा**वर प्रसन्न[14] होऊन तूं अगणित शस्त्रांनी **शुष्णा**स वेढून टाकलेस त्या वेळी द्युलोकातून आणलेला लोखंडाचा गोटा तूं आपल्या **कुशलतेनें**[15] गोफणीनें[16] (**शुष्णावर**) फेंकलास. ९

हे **वज्रधारी** (इन्द्रा), तमानें सूर्यास ग्रासण्याचे[17] पूर्वींच तूं आपले शस्त्र मेघावर फेकलेस. **शुष्णा**चे जे बल सर्व द्युलोकास व्यापून अनिर्बाधपणे राहिले होते त्याचाही तूं नाश करून टाकलास. १० (२५)

हे **इन्द्रा**, चाकावाचून (फिरणारे) ते श्रेष्ठ व सामर्थ्यवान् द्युलोक व भूलोक ह्यांना तुझा पराक्रम पाहून आनंद होतो. तूं (सर्वांहून) वरिष्ठ असल्यामुळे, उदकांत[18] दबा धरून बसलेल्या त्या वराहास— वृत्रास— तूं आपल्या वज्राने चीत केलेस. ११

**इन्द्रा,** ज्या मानवांचे तूं रक्षण करितोस त्यांचा तूं हितकर्ता असल्यामुळे तूं वायूच्या बलवान् व सुलभ रीतीने जोडले जाणाऱ्या अश्वावर आरूढ हो. **उशना काव्याने** जे आनंददायक वज्र तुला दिले ते त्याने तुला उपयोगी[19] पडावे व तूं **वृत्रास** मारावे म्हणून केले होते. १२

---

८ द्युम्नसह उत्स योधान: महः दिव: अष्टा हरी इह आदः, यत् वाताप्य[13] गोरभस ते मन्दिन हरि अद्रिभि: धुक्षन्।

९ पुरुहूत, कुत्साय वन्वन्[14] यत्र अनन्तैः वधै शुष्ण परियासि, दिवः आनीत आय। अश्मान ऋभ्वा[15] गो:[16] प्रति वर्तय:।

१० अद्रिव:, तमस: सूर: अपीते:[17] पुरा यत् हेतिं न फलिग अस्य, शुष्णस्य चित् यत् दिव: परि परिहृत सुग्राथित ओज:, तत् आ अद:।

११ इन्द्र, अचक्रे मही पाजसी द्यावाक्षामा त्वा अनु कर्मन् मदतां। महः त्वं सिरासु[18] आशयान वराहु वृत्र वज्रेण सिस्वप:।

१२ इन्द्र, यान् नृन् अव: नर्य: वातस्य सुयुज: वहिष्ठान त्वं तिष्ठ। उशनो काव्य: य मन्दिन ते दात, पार्य[19] वृत्रहन वज्र ततक्ष।

हे इन्द्रा, तूं सूर्याचे पीतवर्ण अश्व[20] धावविलेस[21] आणि ह्या एतशानेंही चाक ओढलें नाहीं. तुझें पूजन न करणाऱ्या लोकास तूं नव्वद नद्यांचे पलीकडे फेंकून त्यांना एका (मोठ्या) खळग्यांत टाकून दिलेंस. १३

हे वज्रधारी इन्द्रा, आम्हांवर येऊन ठेपलेल्या दुरितापासून व ह्या क्लेशदायक (आपत्तीपासून) आमचें संरक्षण कर. आम्हांस पोटास भरपूर मिळावें, आमची कीर्ति वाढावी, व, आम्हांस मधुर सत्याचा लाभ व्हावा म्हणून ज्या सामर्थ्याच्या योगानें आम्हांस पुष्कळ रथ मिळतील, व (अनेक) अश्व (पदरीं) असल्यामुळें ज्याची (लोकांस) खूण पटेल, असें सामर्थ्य आम्हांस अर्पण कर. १४

तुझी ती कृपाबुद्धि आम्हांवरून उडून न जावो व हे सामर्थ्यवान् देवा, आम्हांस (पुष्कळ) धनधान्य प्राप्त होवो. हे उदार (इन्द्रा), तूं श्रेष्ठ असल्यामुळें आम्हांस धेनूंचा लाभ होत असतां तूं तेथें अस. आम्ही तुला हवि[22] अर्पण करून सर्वजण आनंदांत राहूं. १५(२६)(८)(१)

---

१३ इन्द्र, त्वं सूरः हरितः नृन्[20] रमयः[21] अथ एतशः चक्रं न भरत् अयज्यून् नाव्यानां नवतिं पारं प्रास्य कर्ते अपि अवर्तयः ।

१४ वज्रिवः इन्द्र; अभीके दुरितात् अस्याः दुर्हणायाः त्वं नः पाहि । इषे, श्रवसे, सूनृतायै, रथ्यः अश्वबुध्यान् वाजान् नः प्र यन्धि ।

१५ मा ते सुमतिः अस्मत् मा वि दसत् । वाजप्रमहः इषः सं वरन्त । मघवन्, अर्यः गोषु नः भज; ते मंहिष्ठाः[22] सधमादः स्याम ।

॥ आठवा अध्याय समाप्त ॥

॥ प्रथमअष्टक समाप्त ॥ १ ॥